॥ मराठा तेतुका मेळवावा ॥

— श्रीरामदास

## " दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्रीय "

( सामाजिक व सांस्कृतिक विवेचन )



मद्रास येथील

मराठा एज्युकेशन फंडाचा

# रौप्य महोत्सव स्मारक ग्रंथ



१९३७

प्रकाशक

मराठा एज्युकेशन फंड, मद्रास

[ दोन रुपये

# प्रस्तावना

मद्रास येथील मराठा एज्युकेशन फंडाच्या रौप्यमहोत्सवाचे प्रसंगीं हा लहानसा ग्रंथ वाचकास सादर करण्यात आम्हास फार आनंद होत आहे.

या ग्रंथाचे तीन विभाग पडत आहेत. पहिल्या विभागात महाराष्ट्र एज्युकेशन फंड व इतर संस्था याचा त्रोटक इतिहास, कार्यकारी मंडळाच्या सभासदाची यादी व म. ए. फंडानें ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या दिल्या त्याचीं नावे क्रमाने देण्यात आली आहेत.

दुसऱ्या विभागात, गेल्या शभर वर्षांतील इकडच्या कांहीं प्रसिद्ध महाराष्ट्रीयाचीं चरित्रें दिलीं आहेत. जागेच्या अभावीं सर्व नामांकित व्यक्तींची चरित्रे देणे अशक्य आहे हें कोणीहि कबूल करील. या पुस्तकातील दक्षिण हिंदुस्थानातील नामांकित महाराष्ट्रीयाची यादी परिपूर्ण नसून ती केवळ सूचक आहे, हें वाचकानीं ध्यानात धरावें.

तिसऱ्या विभागात, कांहीं ऐतिहासिक व संस्कृतिविषयक लेख दिले आहेत. यापैकीं कांहीं लेखात साहित्य, कला व संगीत याचा ऊहापोह केलेला आहे, व कांहीं लेखात आर्थिक प्रश्नाचा विचार केला आहे. हे लेख क्षणिक मनोरंजनापेक्षा जास्त उपयुक्त होऊन हा ग्रंथ प्रत्येक सार्वजनिक व खाजगी ग्रंथालयात ठेवण्यास योग्य आहे असे वाचकास वाटेल अशी आशा आहे.

पूर्वींच्या काळीं फोटो काढण्याची कला सध्यासारखी चोहोकडे पसरलेली नव्हती. शिवाय कांहीं लोक फोटो काढून घेण्याविरुद्ध असत. यामुळे आम्हास बऱ्याच नामांकित गृहस्थाचे फोटो या पुस्तकात घालण्यासाठीं मिळाले नाहींत, उदाहरणार्थ, दिवाण रेंङ्गोराव याचा फोटो कोठेंहि उपलब्ध झाला नाहीं. याशिवाय कांहीं व्यक्तींनीं विनयानें किंवा इतर कांहीं खाजगी कारणाने या ग्रंथात आपले फोटो छापण्यास आम्हास परवानगी दिली नाहीं.

या रौप्यमहोत्सवाची आठवण म्हणून मैलापुरातील मोब्रेज रोडवर फंडाच्या मालकीच्या जागेंत "महाराष्ट्र निवास" नावाचे एक सभागृह बांधण्याचें ठरले आहे. इमारतीचे नकाशे, खर्चाचा अंदाज वगैरे सर्व कार्यकारी मंडळानें पसंत केले आहेत. या ग्रन्थात इतरत्र सभागृहाच्या बांधकामाचा नकाशा दिला आहे. ही इमारत चारपांच महिन्यांत बांधून तयार होईल अशी आशा आहे.

याच ग्रन्थाची इंग्रजी आवृत्ति मद्रास येथे छापण्यांत आली आहे. खरोखर ती जास्त विस्तृत आहे. पण मराठी वाचकाच्या सोयीकरिता ही मराठी आवृत्ति तयार करताना महाराष्ट्रातील मराठी वाचकास उपयुक्त व मनोरंजक होईल असाच भाग या मराठी आवृत्तींत ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

या मराठी आवृत्तींत नजरचुकीने कांहीं दोष राहिले असल्यास वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. विशेषतः दक्षिण हिंदुस्थानातील स्थलांचीं व इतर विशेषनामे मराठींत लिहितांना चुका आढळतील, पण मराठी आवृत्तीचीं प्रुफें मद्रासला पाठवून तिकडून तपासून घेण्यास वेळ मिळाला नाहीं.

ही मराठी आवृत्ति फार थोड्या वेळात विशेष मेहनत घेऊन छापून दिली याबद्दल इंदिरा प्रेसचे व्यवस्थापक श्री.ग.गो.दिवाकर याचे आम्ही फार आभारी आहोंत. तसेंच ज्या इतर स्नेह्यानीं हा ग्रंथ लिहिण्याचे कामीं अल्पस्वल्प मदत केली त्याचेंहि आम्ही फार आभारी आहों.

मद्रास
ता. ११-१२-१९३७

एन. आर. केदारी राव
संपादक, रौप्यमहोत्सव ग्रंथ

टी. रामचंद्रराव,
निमंत्रक, रौप्यमहोत्सव कमिटी

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| | प्रस्तावना | पृष्ठ |
| १ | म. फ. फडाचा इतिहास ( श्री. ई. विनायकराव, बी. ए. बी. एल. ) | १ |
| २ | फडाच्या कार्याधिकाऱ्याची यादी ... .... ... | १७ |
| ३ | फंडाकडून शिष्यवृत्त्या मिळालेले विद्यार्थी ... ... | २२ |
| ४ | दक्षिण हिंदुस्थानातील महाराष्ट्रीय रहिवासी (श्री. टी. रामचंद्रराव, बी. ए) | २३ |
| ५ | दक्षिणेतील महाराष्ट्रीय समाजाची आर्थिक चौकशी ( भाग १ ला ) | २९ |
| ६ | ,, ,, ,, ,, ,, ( भाग २ रा ) | ४४ |
| ७ | दक्षिण हिंदुस्थानातील प्रसिद्ध महाराष्ट्रीयांची चरित्रे ... ... | ५३ |
| ८ | सीडेड डिस्ट्रिक्टसच्या राजकीय इतिहासातील मराठ्याची कामगिरी | ८९ |
| ९ | म्हैसुरातील मराठे ( रावसाहेब सी. हयवदनराव बेंगलोर ) | ९५ |
| १० | दक्षिण हिंदुस्थानातील मराठे (रा.ब.आर. कृष्णराव भोसले, | १०१ |
| ११ | दक्षिण हिंदुस्थानी संगीत व महाराष्ट्रीय ( श्री. टी. अप्पाजाराव, बी. ए. बी. एल., अॅडव्होकेट ) | १०४ |
| १२ | तंजावरचे कांहीं मराठी कवि ( श्री. जी. कृष्णराव एम्. एल्. ए. ) | १०६ |
| १३ | तंजावर येथील मराठ्यांच्या कालातील वाङ्मय व कला ... | १०७ |
| १४ | तंजावर येथील मराठ्याच्या सैन्याची व्यवस्था व सरंजाम (आर.एस.एस.) | १११ |
| १५ | कीर्तन ( श्री. टी. बी., गोस्वामी, नरसिंपूरकर, बी. ए. ) | ११३ |
| १६ | भारतवर्षातील दाक्षिणात्य महाराष्ट्रीयानीं केलेली मराठी सारस्वत-सेवा ( श्री. टी. बी. गोस्वामी नरसिंहपूरकर, बी. ए. ) | ११८ |
| १७ | महाराष्ट्र धर्म ( श्री. एन. केदारीराव, एम्. ए. एल. टी. ) | १२५ |

# सुस्वागतम् !

सुजन हो ! शुभदिन अजि पातला ॥
आनंदवि सकला ॥

उज्वल कार्य अहा ! हें अभिनव
संस्थेचा या रौप्यमहोत्सव ॥
जमलों येथें करावयास्तव ॥
शुभदिन आजि आला ॥
रिझवुं मुदित सकळां ॥ १ ॥

युवयुवतींना शिक्षण द्याया ॥
जनानिजनऽ सम धन वेचुनिया ॥
शिक्षणदानें त्या सुखवाया ॥
सुखद हीच वेळा ॥
आनंदवि सकला ॥ २ ॥

संस्थेचे जे स्तंभ खरोखर ॥
ज्याचें यश विस्तीर्ण धरेवर ॥
समाजकार्यी हे अग्रेसर ॥
सफळ जन्म झाला ॥
शुभदिन आजि आला ॥ ३ ॥

आशायुत मन ठेवुनि आजवर ॥
कर्तव्यीं रत निधिधारक जर ॥
ईश यशाप्रत नेइल सत्वर ॥
आशा ही प्रबळा ॥
सकळ भाव अतुला ॥ ४ ॥



# शुद्धिपत्रक

[ अगदीं महत्त्वाचीं अशुद्धें यांत दिलेली आहेत. ]

| अशुद्ध | शुद्ध | पान | ओळ |
|---|---|---|---|
| १९-१२३७ | १९१२-३७ | १ | २ |
| भसा | सभा | ८ | शेवटची |
| कर्जाचा | व्याजाचा | ११ | खालून चार |
| बोलण्यास | बोलणाऱ्या | १२ | ११ |
| १९१२-१७ | १९१२-३७ | १७ | खालून ४ |
| भवानी स्वातिराव | भवानी स्वामीराव | १८ | खालून ४ |
| १९२४-३६,१९३३ | १९२४-३३,१९३६- | २० | १८ |
| कामारे | कोलार | २१ | १ |
| माथावरम् | मायावरम् | २१ | १३ |
| व्याज ३२-० | व्याज ३२-७-६ | परिशिष्ट 'अ' | |
| चालू खात ५३४-२-२ | चालू खाते ५५४-२-२ | ,, | ,, |
| अँन्ड अकांउट | अकाउन्टन्ट अँड | ,, | ,, |
| सूयश | सूर्येश | २२ | शिष्यवृत्त्या |
| टी. ए. एल. नागराजराव | टी. ए. नागराजराव ,, | ,, | ,, |
| कान्डेटा | कन्थोटा | ,, | ,, |
| टी. एन. बालाजीराव | टी. व्ही. बाळाजीराव | ,, | ,, |
| गोपीनाथराव | गोपीनाथराव | ,, | ,, |
| हीं संस्थानें | हीं संस्थानें १४८८ | २४ | ११ |
| कार-सालडर्स | कार-मॉडर्स | २७ | ११ |
| टेक्नॉलॉजिस्ट ३ | टक्नालाजिस्ट | ४२ | १८ |
| एज्युकेशन रौप्य- | एज्युकेशन फंड रौप्य- | प्रश्नपत्रिका | |
| ग्रॅम | ग्रॅम | ४९ | १८ |
| सैदाप्लेट | सैदापेट | ६६ | ९ |
| कर्नल | कर्नूल | ६६ | ११ |
| आग्राहाराम | अग्रहार | ६८ | २२ |
| वेदशाळा | वेधशाळा | ७१ | खालून ४ |
| आल्बम | आल्बर्ट | ७२ | २० |
| निधन पस्वले | निधन पावले | ७६ | खालून ३ |
| वेंकास्वामी | वेंकास्वामींनीं | ७७ | १८ |
| मद्रास, आन्ध | मद्रास, आंध्र | ८१ | १२ |
| रोज | राजे | ९५ | १७ |
| बडाऱ्यांशीं | बड्यारांशीं | ९७ | १५ |

| अशुद्ध | शुद्ध | पान | ओळ |
|---|---|---|---|
| भोगमाची | भागांची | ९७ खालून | ५ |
| मुब्बागल | मुल्बागल | ९८ | १७ |
| ३-११-३७ | ३-११-१६३७ | ९८ | २४ |
| पचनपट्टणातील | चन्नपट्टणांतील | ९८ खालून | ७ |
| तडाव | तलाव | ९९ | ६ |
| मद्वाल | मद्वाल | ९८ | १७ |
| होस्फोट | होस्कोट | ९८ | १९ |
| ज्यातोफखाना | ज्या तोफखाना | १०० | ९ |
| स'फोंजी | सर्फोजी | १०२ | १९ |
| निजामशाहींत | निजामशाही | १०३ | १ |
| वस्याहत् | वसाहत | १०३ | ८ |
| विधान पान | विधान फ. २४ | १०३ | ८ |
| उाजीनावस्था की | उार्जीनावस्था झाली की | १०३ | २२ |
| अमेकलरा सनतना | अकेलरा सनातना | १०५ | २ |
| परमपावन | परमपावना | १०५ | २ |
| कमी कमी | कमी | १०८ | १२ |
| उगम | उत्तम | १०८ खालून | २ |
| पाची | काची | १०९ | २३ |
| अपरितोषात् | आपरितोषात् | ११८ | ७ |
| लेलकाच्या | लेखकाच्या हस्ते | १२४ खालून | ८ |
| क्षतव्य | क्षतव्य | १२४ खालून | १ |
| त्याला | त्या | १२५ | ६ |
| सहना अवतु | सह नाववतु | १२७ खालून | ३ |

दिवाणबहादुर के. कृष्णस्वामीराव, सी. आय. ई.
त्रावणकोरचे दिवाण, पहिले अध्यक्ष म. ए. फंड. १९१२-२३



इ. विनायकराव, बी. ए., बी. एल्., ॲडव्होकेट, मद्रास.
ऑनररी सेक्रेटरी, म. ए. फंड. १९१२-१९३७

# मराठा एज्युकेशन फंड
# पहिल्या पंचवीस वर्षांचा
# इतिहास

( लेखक : श्री. ई. विनायकराव बी. ए. बी. एल.
ऑनररी सेक्रेटरी, म. ए. फंड १९-१९३७ )

[ म. ए. फंड व संलग्न संस्था यांच्या संबंधींचा इतिहासात्मक लेख लिहिण्याचे परिश्रम घेतल्याबद्दल आम्ही लेखकाचे फार आभारी आहोत. श्री. ई. विनायकराव हे गेली पंचवीस वर्षे फंडाचे चिटणीस असल्यामुळे फंडाच्या इतिहासावर लेख लिहिण्यास त्यांच्याइतका लायक लेखक कोणीहि नाहीं हे सांगण्याची आवश्यकता नाहीं. संपादक ]

## १

## उपोद्घात

मराठा एज्युकेशन फंडाच्या पहिल्या पंचवीस वर्षांचा इतिहास लिहिण्याचा सुप्रसंग आणल्याबद्दल मी जगन्नियन्त्याचे प्रथम आभार मानतो. हा इतिहास लिहून फंडाच्या सभासदांनीं दाखविलेली सहानुभूति, सहकार्य व प्रेम यांचा मी अंशतः उतराई होईन अशी आशा आहे.

### तंजावर

हा फंड अस्तित्वात येण्याचीं कारणे सर्व वाचकांना मनोरंजक होतील यात शंका नाहीं. १८९१ सालीं तंजावरच्या राजवाड्याजवळच्या एका घरात जन्मल्यावर वयाचीं बरीच वर्षे तेथेच काढल्यामुळें प्रस्तुत लेखकास तंजावरच्या मराठा समाजाच्या परिस्थितीची चांगलीच माहिती झाली असल्यास नवल नाहीं.

त्या वेळीं तंजावरचे शेवटचे शिवाजी महाराज यांच्या काहीं राण्या त्या राजवाड्यांत आपलीं मर्यादित वर्षासनें व इतर खासगी उत्पन्न यावर काळ कंठीत होत्या. राजघराण्यातील इतर व्यक्ति आपल्या परिवारासह राजवाड्यात राहत असत व जुना थाट कसाबसा ठेवण्याचा प्रयत्न करीत; पण पूर्वींचें ऐश्वर्य व वैभव यांना हा थाट मुळींच शोभणारा नव्हता. अशा कालांतहि राजवाड्याबाहेरील आवारात काहीं हत्ती झुलत असत. सकाळ व सध्याकाळ देवडीवर नौबत व नगारा वाजे. मुख्य दरवाजावर हत्यारी शिपाई असून ते राजघराण्यातील स्त्रियांना घेऊन आतबाहेर जाणाऱ्या घोड्यांच्या किंवा बैलांच्या बंद गाड्यांकडे उदासीन वृत्तीनें लक्षहि देत नसत. शस्त्रागारात उरलेल्या जुन्या बंदुका व हत्यारें साफसूफ करताना काहीं थोडेसें शिपाई क्वचित्काळीं दृष्टीस पडत. सरस्वती-महाल-ग्रंथालयांत ताडपत्रावरील व जुन्या देशी कागदावरील

लेख वाचून त्यांची नक्कल करणारे कांहीं थोडें विद्वान पंडित दृष्टीस पडत. दुसऱ्या कांहीं खोल्यांत जुनीं दप्तरें धूळ खात पडलेलीं असत तेथे कांहीं कारकून दप्तरे लावून सावकाशपणें एखादी जुनी सनद, वंशावळ वगैरे कागद हुडकण्यात गर्क झालेले असत. राजघराण्याचा पूर्वीचा थाट कसा-बसा ठेवण्याचा प्रयत्न होई. खालावलेल्या सांपत्तिक स्थितीस अनुसरून कां होईना, पण राजवाड्यात ज्योतिषी, वैद्य, गवई व पंडित यांचा योग्य तो सत्कार होई. त्या वेळीं निव्वळ प्रवासी व निसर्गशोभा पाहण्यासाठीं फिरणाऱ्यांना राजवाड्यांत प्रवेश नव्हता. मोठ्या महालांत १६७६ ते १८५५ सालापर्यंतच्या महाराजांच्या मोठमोठ्या तसबिरी असत. पण तेथील भयाण शांतता पाहिल्यावर हीं चित्रे तंजावरच्या राजांचा उदयाचा व ऱ्हासाचा दुःखप्रद इतिहास सांगत आहेत असे कोणालाही वाटत असे. दररोज देवडीवरील म्हातारा पहारेकरी प्रत्येक तासाची घंटा उदासीन वृत्तीने वाजवीत राही. एकामागून एक राजकुटुंबातील स्त्रिया इहलोक सोडून गेल्या. एक राणी वारली कीं, तिच्यावर अवलंबून असणारे कारकून, आश्रित व गरीब नातेवाईक निराधार होत व कांहीं पंडित, उपाध्ये, वैद्य, गवई, चितारी इत्यादिकांचा आश्रय कमी होई. राजवाड्यांत जाऊन तेथें बराच वेळ घालविण्याची संधि मला वारंवार येत असल्यामुळें या गोष्टींचा माझ्या मनावर फार परिणाम झाला.

वृद्ध लोकांकडून ऐकलेली तंजावरांतील राजघराण्यांच्या हकिकतींचीं लांबलचक वर्णनें मला अजून आठवतात. अशापैकीं एक गृहस्थ राजघराण्याच्या आप्तांपैकीं असून सुदैवानें ते अजून हयात आहेत. त्यांनीं शिवाजीचे शेवटचे दिवस व १८५५ सालीं तंजावर खालसा झाल्यापासूनच्या तंजावरांतील हकीकतींचे यथातथ्य वर्णन केलें होते. राजघराण्याच्या ऱ्हासाबरोबर क्षत्रिय, ब्राह्मण व इतर सरदारांच्या ऱ्हासाला सुरुवात झाली. राजवाड्यांत काय किंवा बाहेर तंजावरांत काय सगळीकडे परिस्थिति एकच होती. परकीय सत्तेमुळे बदललेल्या परिस्थितीशीं टक्कर देण्याची तंजावरच्या सरदार घराण्याची तयारी या वेळीं कोणत्याहि कारणामुळें नव्हती. एकामागून एक हीं घराणीं खालावलीं, त्यांची घरे व जमिनी गहाण पडल्या व शेवटीं त्यांची मुलें-बाळें अन्नास महाग झाली. खरोखर कालाच्या ओघाकडे पाहून स्वसंरक्षणाबद्दल दक्षता न बाळगणें हा एकटाच दोष या भल्या व उदार लोकांचा असतांना त्यांची होत अवनति पाहून इतरांस मात्र फार दुःख होत असे.

साधारण लोकांची परिस्थितीहि खालावली होती; पण ती सरदार घराण्याइतकी खालावली नव्हती. कांहीं लोक आधींच तंजावर सोडून ब्रिटिश सरकार व एतद्देशीय संस्थानिक यांच्याकडे चांगल्या हुद्यावर नोकरीस लागले. कांहींनीं संस्थानांचे दिवाण, मुलकी अधिकारी व शिक्षणतज्ज्ञ म्हणून नाव मिळविलें. अंगची हुषारी व सचोटी या गुणांमुळें मराठा समाजानें आपले पूर्वीचे नाव मात्र पुष्कळ दिवसपर्यंत राखले. हे लोक तंजावरास आपले गांव समजत व म्हातारपणीं तेथेंच जाऊन राहावे अशी त्यांची महत्त्वाकांक्षा असे. तंजावरच्या मध्यम वर्गाच्या पुष्कळ लोकांनीं आपली सांस्कृतिक परंपरा पुढें चालविली. या लोकांना संगीताचा फार नाद असे. फुरसतीच्या वेळीं पुरुष मंडळी तंबोऱ्याची साथ धरून गात असत तर कांहींना मृदंगाची, कांहींना वीणावादनाची तर कांहींना मंजुळ वाद्यें वाजविण्याची आवड असे. दर वर्षी वेस्ट मेन स्ट्रीटवर होणाऱ्या गणपत्युत्सवाचे वेळीं तर जमलेल्या अफाट श्रोतृसमुदायापुढें गवई व वाजवणारे लोक आपले कौशल्य दाखविण्यास अहमहमिकेनें पुढें येत असत. साधारण जनतेच्या कलेविषयींच्या आवडीमुळे धंदेवाईक गवई, सनईवाले, बँडवाले, भरतनाट्य करणारे नर्तक, कुंभारी वगैरे लोकांस या कालात चांगलीच संधी मिळाली. सुखवस्तु महाराष्ट्रीय पंडितांनीं आपला संस्कृतचा व मराठीचा व्यासंग चालू ठेविला होता. अखिल भरतखंडांत नाव करणारे

महाराष्ट्रीय लोक रामेश्वरास जातांना तंजावरास उतरत असत. तंजावरांत त्यांचा सत्कारही चांगलाच होई. त्यात कोणी गवई असले तर ते आपले जलसे तंजावरास करीत व तंजावरचे संगीतही मोठ्या हौसेने ऐकत. यामुळे दोघांचाहि फायदाच होई. विष्णुबावा मोरगांवकरानीं तंजावरास बरीच कीर्तने केलीं; त्यानंतर दरवर्षी उत्तरेकडील कीर्तनकार तंजावरास येत. या कीर्तनकारांना चांगला मान व आश्रय मिळे. पुढें पुढें मात्र लोकांच्या खालावलेल्या परिस्थितीमुळें या महाराष्ट्रीय कलावतांना मिळणारी बिदागी मात्र उतरत गेली. राजवाड्यासारख्या इतिहास-संशोधकांना येथे ऐतिहासिक दृष्टया मौल्यवान असे अनेक मराठी कागदपत्र मिळाले. मी स्वतः काशीच्या रामचंद्र बावांची पुष्कळ कीर्तनें ऐकलीं आहेत व प्रसिद्ध गवई व भरतनाट्य करणारे यांचे जलसेहि पाहिले आहेत. सध्या मात्र त्यासारखें कांहीं कसब राहिलें नाहीं हें खरें.

आमच्या घरीं दररोज सकाळीं दासबोध, ज्ञानेश्वरी, एकनाथी रामायण यांसारख्या मराठी ग्रथावर प्रवचन होई. या पुस्तकातील कविता वाचून त्याचा अर्थ जमलेल्या आबालवृद्धांस सांगण्यांत येई दर शनिवारीं व एकादशीस मराठींतून भजन होई. झांजा व चिपळ्या याचा आवाज मला फार आवडत असे. माझ्या आजीला मराठी लिहिता व वाचता येत नसे; पण तिला शेकडों अभग, पदें, ओंव्या, भूपाळ्या वगैरे पाठ येत होत्या. ती दररोज सकाळीं त्यांपैकीं कांहीं गीतें गात असे. पढरपुरचे बरेच वारकरी त्या वेळीं तंजावराकडेहि येत. भजनमंदिरांत रामकृष्णाच्या चित्रावर श्रीसमर्थांची तजबीर लावलेली असे. आगगाड्या वगैरे नसतांना श्रीसमर्थ रामदास स्वामी, तंजावरचा मठ स्थापण्याकरिता इतके दूर कसे आले ही हकीकत ऐकून मला लहानपणीं फार आश्चर्य वाटे. रामदासांनीं स्वतः लिहिलेली किंवा वापरलेली दासबोधाची प्रत अजून तंजावरच्या मठात आहे. श्रीशिवछत्रपतींचा जन्मोत्सव तंजावरास पाहिल्याची मला अजून आठवण आहे. समारंभाच्या वेळीं त्या महात्म्याची तजबीर राजवाड्यातील एका हत्तीवरील हौद्यांत ठेविली होती. पुढें उंट, घोडे व शिपाई चालत होते. तंजावरच्या शेवटच्या महाराजाचे दोन नातू व इतर सरदार मिरवणुकीने चालत होते. शिवाय मिरवणुकींत शेकडो महाराष्ट्रीय व महाराष्ट्रीयेतर नगरवासीहि हजर होतेच. हा देखावा पाहून मराठ्याच्या इतिहासाबद्दल माझ्या कोवळ्या मनावर त्या वेळीं फार चागलाच परिणाम झाला. समाजाची होणारी आर्थिक अवनति व बौद्धिक कुचबणा व अवनति पाहून मला फार वाईट वाटे. पुष्कळ जुनी मराठी घराणी कंगाल होऊन पोटासाठीं तंजावर सोडत होती. १९०७ सालीं माझ्यासारख्या सोळा वर्षांच्या मुलाला मराठी इतिहासाचे किती ज्ञान असणार ! पण मी मराठा आहे असा विशेष स्वाभिमान मी बाळगू लागलों. तसेंच आमच्या समाजाचा पूर्वेतिहास व त्यापुढील तत्कालीन प्रश्न याचा अभ्यास करून समाजाची आर्थिक व बौद्धिक अवनति थांबवावी व ती थांबविण्याच्या कामीं समाजाची थोडीबहुत सेवा करावी अशी मला फार फार इच्छा होती.

## पहिल्या कांहीं संस्था

मराठा एज्युकेशन फंडाच्या इतिहासास प्रारंभ करण्यापूर्वी दक्षिण हिंदुस्थानांत मराठी भाषेची सुधारणा, व महाराष्ट्रीय संस्कृतीची जोपासना करण्यासाठीं ज्या सस्था खटपट करीत होत्या त्याचा त्रोटक वृत्तात येथे देणें योग्य दिसतें.

## मराठी वाचन मंदिर, तंजावर

या दिशेनें पहिला प्रयत्न तंजावर येथें मागील शतकाच्या नवव्या दशकांत झाला. सर्व समाजाच्या हिताकरितां म्हणून तंजावर येथें मध्यवर्ती संस्था काढण्यांत आली व कांहीं कालपर्यंत टिकून सुद्धां, या सस्थेकडून कांहीं टिकाऊ काम झालें नाहीं असें कळते. या संस्थेची तपशीलवार

माहिती उपलब्ध नाहीं. या अपयशानंतर काहीं उत्साही लोकांनीं तंजावरास 'मराठी वाचन-मंदिर' ही संस्था स्थापन केली. पुरुष व स्त्रिया याकरितां मराठी वाचनाचे वर्गही संस्था चालवीत असे. तसेंच एक पगारी व काही बिनपगारी शिक्षकाचे मदतीनें ही संस्था एक मराठी मुलींची शाळा चालवीत असें. या शाळेंत फी नसून सर्व शिक्षण मराठींत असें. शिवाय तंजावरचे तत्कालीन शाळाचे इन्स्पेक्टर रा. ब. सी नागोजीराव याच्या मदतीनें हें मंदिर तंजावर येथील सरकारी शाळांत जाणाऱ्या महाराष्ट्रीय मुलामुलींकरितां दर शनिवारीं व रविवारीं सकाळीं दोन तास मराठी शिक्षणाचे वर्ग चालवीत असे. १९१० सालीं हे मराठी वर्ग बंद पडले. मात्र मुलींची शाळा रा. सा. टी. सांबमूर्तिराव व त्यांच्या सुशिक्षित पत्नी यांच्या उत्साहामुळेंच चालू राहिली.

## मद्रास मराठा असोशिएशन, १८८८

बहुतेक याच वेळेस मद्रासमध्येंही असाच एक प्रयत्न झाला. मद्रास मराठा असोसिएशन नावाची १८८३ सालीं स्थापलेली संस्था त्यावेळीं बंद पडली होती ती १८८८ सालीं पुनः सुरू करण्यात आली. १९१३ सालीं असोसिएशनचे १८८८ सालचे सेक्रेटरी श्री टी वेंकटस्वामी-राव यांनीं जुनी असोसिएशन पुनः सुरू करण्याबद्दल १८८८ सालीं जी योजना छापली होती तिची एक प्रत मला दिली होती. असोसिएशनच्या नियमाची प्रत श्री. वेंकटस्वामीरावाजवळ नव्हती, पण माझ्या हातीं त्या नियमाची प्रत नुकतीच आली आहे.

नियमाचे पुस्तकात अधिकारी म्हणून नावे दिलीं आहेत. त्यापैकीं काहीं खालीं दिली आहेतः—

पेट्रन—(१) ए. ए. श्रीनिवास रावसाहेब, अर्णीचे जहागिरदार
(२) राजा सर टी. माधवराव, के. सी. एस. आय.

अध्यक्ष—दि. ब. आर. रघुनाथराव

उपाध्यक्ष—दि. ब. टी. वेंकटस्वामी राव, श्री. के. राजाराव, श्री. ए रामचंद्रराव; श्री. टी. रंगराव, श्री. आर. बाळाजीराव, बी. एल., श्री. सी. रामचंद्र रावसाहेब, बी. एल., श्री. टी. रामचंद्रराव.

चिटणीस—श्री. टी. वेंकास्वामीराव

खजिनदार—श्री. ए. राघवेंद्रराव.

मॅनेजिंग कमिटी—श्री. डी. रामराव, श्री. सी. रामचंद्रराव, बी. ए. बी. एल.; श्री. टी एम. अण्णास्वामी राव, श्री. सी. हणमंतराव; श्री. ब. चिं. सहस्रबुद्धे, श्री ए. राघवेंद्रराव, श्री. ए. सर्वोत्तमराव, श्री. एम. बाळकृष्ण राव.

वरील वीस अधिकाऱ्याशिवाय असोसिएशनचे ४१ सामान्य सभासद होते. या सामान्य सभासदात श्री. पी. रामचंद्रराव, श्री. डी. आर. बाळाजीराव, श्री. टी. रंगस्वामीराव व व श्री. क्षीरसागर श्री. राजगोपाळराव यांचीं नांवें आहेत. श्री. पी. रामचंद्रराव म. ए फंडाचे उपाध्यक्ष झाले. श्री. डी. आर. बाळाजीराव हे फंडाचे हयातभर सभासद होऊन काहीं दिवस उपाध्यक्षही होते, श्री. टी. रंगस्वामीराव फंडाचे पेट्रन झाले व त्यांच्या इस्टेटींतून एस. एस. राघवेंद्रराव प्राथमिक शाळेस मोठी देणगी मिळाली, व श्री. राजगोपाळ राव हे सुदैवानें हयात असून म. ए. फंडाचे सभासद आहेत.

असोसिएशनचा उद्देश खालील मार्गांनीं मराठीस उत्तेजन देण्याचा होता.

१) मराठी भाषेंत सभा भरविणें व वादविवाद करविणें.

(२) वाचनालय व लायब्ररी सुरू करणें.
(३) मराठी ग्रथास बक्षिसे देणे.
(४) मराठी शाळा उघडणे व युनिव्हर्सिटीच्या परीक्षांत विद्यार्थ्यांकरिता मराठी भाषेस इतर देशी भाषाचे स्थान मिळवून देणे.

अशा रीतीने मोठ्या लोकानीं काढलेल्या सस्थेच्या हातून काही चागले काम झाले असल्यास नवल नाहीं. त्या काळीं खुद्द मुबई युनिव्हर्सिटींत मराठीला स्थान मिळाले नव्हते तरी या सस्थेच्या प्रयत्नाने मद्रास युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिकपासून एम. ए. पर्यंतच्या सर्व परीक्षाना मराठी हा ऐच्छिक विषय नेमला गेला होता. तसेच राजा हणमत लाला स्ट्रीटवर एक मिडल स्कूल उघडण्यात आले. या शाळेत बालवर्गापासून इग्रजी तिसऱ्या वर्गापर्यंतचे सर्व शिक्षण मराठींतून देण्याचा प्रयत्न करण्यात आला होता. शाळेच्या इमारतींतच ग्रथालय असून असोसिएशनच्या सभा येथेंच भरत. ता.२६-२-१८८८ रोजीं सस्थेने त्रावणकोर महाराजास मानपत्र दिल्याचा उल्लेख आढळतो.

मे १८८९ मध्यें सस्थेच्या चिटणिसानीं मध्यवर्ती सस्था सुरू करण्याचा एक अयशस्वी प्रयत्न केला. हळुहळु सस्थेची स्थिति खालावत चालली, लायब्ररीचा कोणीहि उपयोग करीना व काहीं वर्षांत शाळाही बद करावी लागली. पैशाची टचाई होती. पण त्यापेक्षा प्राथमिक शाळा चालविण्यास पुरेशी मुले मिळेनात ही सर्वांत मोठी अडचण होती. लवकरच सस्था बद पडली. एवढ्या मोठ्या विद्वान व श्रीमत लोकाच्या नेतृत्वाखालीं सुरू झालेली ही सस्था बंद कां पडली याचे मला अजूनसुद्धा आश्चर्य वाटते

## साउथ इंडियन मराठा ब्राह्मण असोसिएशन मद्रास

मद्रास मराठा असोसिएशन बद पडल्यावर बरेच दिवसानीं श्री. पी. रामचद्रराव यानीं समाजाच्या उन्नतीकरिता सा. इ म ब्रा. असोसिएशन नावाची सस्था काढली. रामचद्ररावानीं भगीरथ प्रयत्न केलें. पण ही संस्थाही लवकरच बद पडली. रामचद्ररावाच्या या अनुभवाला म. ए. फडास फार फायदा झाला. ते फंडाचे सुरवातीपासून आठ वर्षे उपाध्यक्ष होते.

## महाराष्ट्र सभा, मद्रास

महाराष्ट्र सभा मद्रास या नावाची आणखी एक सस्था निघून काही काळानें बद पडली. ता. १८-१०-१९०४ रोजीं दसऱ्याच्या दिवशीं त्रिप्लिकेन मधील काहीं उत्साही महाराष्ट्रीयानीं मराठी बोलणाऱ्या लोकास एकत्र आणणे व मराठी भाषेच्या अभ्यासास उत्तेजन देणें या हेतूनें ही महाराष्ट्र सभा स्थापन केली. कुम्भकोणम् येथें स्थाईक झालेले असता देखील दि. ब. आर. रघुनाथराव याना सभेचे अध्यक्ष निवडण्यात आले. सभेचे सभासद थोडेच होते. ही सभा काहीं व्याख्यानेंहि करवीत असे व केसरी व हिंदु हीं पत्रें घेत असें. एका भाड्याच्या खोलींत सस्था एक लहान मराठी लायब्ररी चालवीत होती. कीर्तनें, सभा, शिवजन्मोत्सव वगैरे उत्सवही सभा करी. १९०८ सालीं राष्ट्रीय सभेस (कै.) ना. गोखले आले होते त्यास सस्थेनें चहापार्टी दिली होती. सुरवातीस मोठ्या जोराने चाललेली ही सस्था १९०९ सालीं लोकाश्रयाचे अभावीं बद पडली.

## मराठी मंडळी, कुम्भकोणम्

ही सस्था कुभकोणम् येथे १९०७ सालीं दि. ब. आर. रघुनाथराव याच्या अध्यक्षतेखालीं सुरू झाली. मडळीचा उद्देश समाजातील तरुण लोकाच्या हितासाठीं सभा व वादविवाद घडविणे व मराठी भाषेच्या अभ्यासास उत्तेजन देणे असा होता. एक वाचनालयही कसेबसे चाललें होते. दिवाणबहादुर लहान मडळींतहि फार मिसळत व त्याच्या सभाषणाचा तरुणाच्या

मनावर चांगलाच परिणाम होई. त्यानीं मराठ्यांचा इतिहास राजकारण नीति वगैरे विषयावर सवादरूपानें सभासदास चागलीच माहिती दिली होती. पुढें ही सस्थाही १९०९ सालीं बंद पडली.

---

## २

# म. ए. फंडाची सुरवात

कॉलेजात असताना मराठ्याच्या इतिहासावर बरीच पुस्तकें मी वाचली होती. कुंभकोणम् येथील मराठी मडळीचा मी एक उत्साही सभासद होतो. पण मद्रासला आल्यावर अशा चळवळींत भाग घेण्याची सधि मिळाली नाहीं १९११ सालीं बी. ए. झाल्यावर मी समाजाच्या आर्थिक, शैक्षणिक व सास्कृतिक उन्नतीच्या उपायाचा विचार फुरसतीच्या वेळीं करीत असें. मद्रास व मद्रास बाहेरील समाजातील मोठ्या लोकाना मी भेटलों. तसेंच लहान मोठ्या श्रीमत व गरीब महाराष्ट्रीयाशींही मी विचारविनिमय केला. दिवगत झालेल्या महाराष्ट्रीय संस्थाच्या चालकास भेटून त्या अयशस्वी होण्याच्या कारणाची मी बरीच मीमासा केली. पुढें एक वर्ष उद्योग केल्यावर खालील उपाय जरूर आहेत असे माझे निश्चित मत झालें.

(१) गरीब असो वा श्रीमत असो समाजांतील सर्वांना आयुष्याच्या लढ्यात यशस्वी होण्याकरिता शिक्षण मिळणे जरूर आहे.

(२) आर्थिक स्थिति सुधारण्यास काटकसर, सहकारी तत्त्वाचा प्रसार व निःस्वार्थी समाज सेवा करण्याची इच्छा याची जरूर आहे.

(३) समाजातील मद्रास इलाख्यात पसरलेल्या लोकाची सघटना करून मद्रास येथें मध्यवर्ती सस्था व बाहेरील शहरीं शाखा काढून लोकाना उत्सवाच्या निमित्तानें सभा व समेलनें भरवून लोकास एकत्र आणणे व मराठींत कीर्तनें व भजनें करून लोकातील दळणवळण जास्त वाढविणें जरूर आहे.

(४) ग्रथालये व वाचनालये काढून मराठी भाषेच्या अभ्यासास उत्तेजन देणे व निमसरकारि शाळातून थोडेबहुत मराठी शिक्षण देण्याची व्यवस्था करणे जरूर आहे.

### फंडाची स्थापना

( १५ सप्टेंबर १९१२ )

वरील उपायाचा विचार करण्याकरिता मी ता. १५-९-१२ रोजीं रा. सा. पी रामचद्रराव यांच्या एग्मोर येथील घरीं काहीं प्रतिष्ठित महाराष्ट्रीयाना आमत्रण दिलें होतें. त्यावेळीं खालील सद्गृहस्थ हजर होतेः—

(१) दि. ब. के. कृष्णस्वामीराव सी. आय. ई. माजी दिवाण, त्रावणकोर
(२) रा. सा. पी. रामचद्रराव, चीफ इन्टर्प्रीटर, हायकोर्ट मद्रास
(३) श्री. टी. व्ही. तुळजारामराव, मालक स्कॉटिश प्रेस, मद्रास
(४) श्री. ए. कृष्णस्वामी राव डे एक्झॅमिनर ऑफ अकाउन्टस
(५) श्री. एस शकरराव, अकाउन्टन्ट, पी. डब्ल्यू. डी. मद्रास
(६) श्री. पी. राघव राव, रिटायर्ड तहसिलदार
(७) श्री. टी. टी. भवानिस्वामि राव, बी. ए. एल. टी.

(८) श्री. पी. सुब्बाराव, मद्रास रेकार्ड्स कचेरी
(९) श्री. आर. लक्ष्मणराव, हेडक्लार्क, रेव्हिन्यू बोर्ड, मद्रास
(१०) श्री. सी. भीमराव, ज्युएलर
(११) श्री. एस. एम. पुणताबेकर अ. सुपरिन्टेंडट, सी. एन. टेक्निकल इन्स्टिटयूट.
(१२) श्री. आर. कृष्णराव, जम्ना हाऊस, मैलापूर
(१३) श्री. ई. विनायकराव, गणिताचे लेक्चरर, पाच्चयप्पा कॉलेज

दिवाणबहादुर के. कृष्णस्वामी राव याना सभेचे अध्यक्ष निवडण्यात आले. व नतर मी आपल्या उपरनिर्दिष्ट योजना सभेंत माडल्या. पुष्कळ वादविवादानतर वरील कार्याकरिता सस्था काढण्याचे ठरलें. वर्गणीचा दर सभासदाच्या उत्पन्नाच्या रुपयास एक पै ठरविण्यात आला. सभासद मिळविणें, पैसे जमविणे व प्रचार करून शेवटीं सस्थेचे नाव अधिकारी वगैरे ठरविण्यासाठीं साधारण सभा बोलावण्याकरिता एक कमिटी नेमण्यात आली. या कमिटींत श्री. भवानीस्वामीराव, कृष्णराव, भीमराव व मी होतो. व मला कमिटीचे सेक्रेटरी करण्यात आलें होते, अशा रितीनें मराठा एज्युकेशन फडाची स्थापना होऊन मी या फडाचा पहिला ऑननररी सेक्रेटरी झालो.

### २-२-१९१३ ची साधारण सभा

कमिटीच्या रिपोर्टाचा व बाहेरील सद्गृहस्थाच्या सूचनाचा विचार करणे, संस्थेची घटना ठरविणें व अधिकारी निवडणें या कामासाठीं सस्थेची पहिली साधारण सभा ता. २-२-१९१३ रोजीं दि. ब. के. कृष्णस्वामीराव याच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यात आली होती. जुन्या महाराष्ट्र सभेचें पुनरुज्जीवन करून नवीन उद्देश त्या सस्थेच्या उद्देशात घालावे, मराठी भाषा व वाङ्मय यांची अभिवृद्धि हाच संस्थेचा मुख्य उद्देश असावा, मराठी प्राथमिक शिक्षणावर विशेष जोर द्यावा वगैरे बऱ्याच सूचना आल्या होत्या. पुष्कळ वादविवादानतर सस्थेचा उद्देश खालीं लिहिल्याप्रमाणे साध्या व सुटसुटीत शब्दात असावा असें ठरले. सस्थेचा उद्देश—

" मद्रास इलाखा व म्हैसूर सस्थान यातील मराठा विद्यार्थ्यास कॉलेजचीं व शाळाचीं फी देऊन व शक्य असल्यास त्याचा जेवणाचा व राहाण्याचा खर्च देऊन शिक्षणास मदत करणें व मराठीच्या अभ्यासास उत्तेजन देणें हा फडाचा उद्देश आहे."

कांहीं नियमहि ठरविण्यात आले. सुचविलेल्या सर्व नावाचा विचार करून सस्थेला 'मराठा एज्युकेशन फड' हे नाव देण्याचें ठरलें. मद्रास शहरातील सात व बाहेरील बारा अशा १९ सभासदाचें एक नियामक मडळ ( बोर्ड ऑफ डायरेक्टर्स ) असावे असें ठरलें. सुरुवातीपासून जमाखर्च व हिशेब तपासणीकडे विशेष लक्ष दिले गेल्यामुळेच फडाची प्रगति व भरभराट झाली आहे.

---

## ४

## फंडाच्या स्थापनेनंतर

### मराठी संघ, मद्रास

मराठी भाषेच्या अभिवृद्धीवर ज्यांचा जोर होता ते लोक आपले मत फडाच्या कमिटीपुढे आग्रहानें माडू लागले. कांहीं वेळ दम धरा अशी मी केलेली विनति त्याना पटेना. या

लोकांना काँही जुन्या महाराष्ट्र सभेच्या सभासदांची जोड मिळाली, कामिटीचे एक सभासद त्यांचे म्हणणें जोरानें व स्पष्टपणें मांडीत, पण फंडाच्या सांपत्तिक स्थितीकडे पाहून नवीन योजना तूर्त हातीं घेऊं नयेत असें कमिटीनें ठरविलें. मराठीच्या अभ्यासास उत्तेजन देण्याकरितां जरूर तर निराळी संस्था काढा असें मी सुचविलें. ती यशस्वी झाल्यास समाजाचा फायदा होईल व अयशस्वी झाल्यास फंडाच्या इतर चळवळीस धक्का बसणार नाहीं असें माझें मत होतें. माझ्या सूचनेवरून त्रिप्लिकेन येथें 'मराठी संघ' नांवाची संस्था काढण्यात आली. या संघाच्या मॅनेजिंग कमेटीचा मी सभासद होतो पण सेक्रेटरी होण्याचें मी नाकारलें. या संघानें सभा व वादविवाद करून दोन एक वर्षे थोडे उपयुक्त काम केलें. महाराष्ट्र सभेची लायब्ररी व उरलेले पैसे खजिनदाराकडून मिळविण्याचा प्रयत्न फलद्रूप झाला नाहीं. योग्य उत्साही कार्यकर्त्यांच्या अभावीं हा संघ लवकरच नामशेष झाला.

## पहिली मराठा असोसिएशन, मद्रास

फंडाच्या वृत्तांताकडे वळण्यापूर्वीं १९१८ सालीं सुरू होऊन पांच वर्षे चाललेल्या एका महाराष्ट्रीय संस्थेची हकीकत या ठिकाणीं देणें भाग आहे.

मराठी संघ बंद पडल्यावर मराठी भाषेच्या अभिवृद्धीची कल्पना १९१७ सालीं पुन्हा पुढें आली व त्रिप्लिकेन येथें मराठी लायब्ररी स्थापण्याचा प्रयत्न झाला. एक दोन सभानंतर मराठी लायब्ररी असोसिएशन' काढण्यात आली. या संस्थेच्या चालकांचा त्रिप्लिकेन येथें फक्त मराठी व इंग्रजी शिकविण्याची 'मोफत मराठी मुलींची शाळा' काढण्याचा विचार होता. म्हणून संस्थेचे जुने नांव बदलून मराठी गर्ल्स स्कूल असोसिएशन' असें नांव ठेवण्यात आलें. काहीं महिन्यांनीं तेंही नांव सोडून शेवटीं 'महाराष्ट्र असोसिएशन' त्रिप्लिकेन असें नांव ठेवण्यात आलें. पहिले उद्देश मराठीचा अभ्यास, करविणें लायब्ररी व मुलींची शाळा चालविणें असे होते, तरी संस्थेने महिला संघ, यंग मेन्स ब्रँच व आर्ट्स सेक्शन अशा शाखा काढल्या; फंडाचे पुष्कळ सभासद या असोसिएशनचे सभासद झाले होते व त्यांनीं संस्थेस चांगलीच मदत केली. मी या असोसिएशनचा सभासद झालो नाहीं तरी पण आमंत्रणावरून त्यांनीं केलेली नाटकें व्याख्यानें व त्यांच्या इतर समारंभास जात असें.

१९१९ सालीं या मराठी इंग्रजी फ्री गर्ल्स स्कूलमध्यें ३४ विद्यार्थिनी व एक शिक्षकीण होती. भाडें, पगार व इतर खर्च मिळून त्या वर्षीं रु. ५८१–१०–९ खर्च झाला. पण एका शिक्षकिणीस सर्व वर्ग चालविणें अशक्य होतें. सभासदांच्या वर्गण्या कमी होऊं लागल्या व शाळा लवकरच बंद होण्याचीं चिन्हें दिसू लागली. पुष्कळ भांडवलाशिवाय एकादी चांगली प्राथमिक शाळा चालविण्याचे कार्य अंगावर घेण्याच्या विरुद्ध मी पहिल्यापासूनच होतो.

शिवाय, समाजाची परिस्थिति व मुलांचें हित याकडे पाहातां अभ्यासक्रमांतून स्थानिक भाषा अजिबात वगळणें केव्हाही चांगलें नाहीं. या प्रश्नावर सभासदांमध्ये मतभेद बराच होता हें सांगणें नलगे.

असोसिएशनच्या दुसऱ्या वार्षिक अहवालांत ती संस्था इलाख्यातील सर्व महाराष्ट्रीयांची मध्यवर्ती संस्था व्हावी अशी इच्छा प्रदर्शित केली गेली होती. म. ए. फंड त्या वेळेपर्यंत सात वर्षे चांगला चालला होता. व असोसिएशननें स्वतःबद्दल व समाजाची मध्यवर्ती संस्था' म्हणून प्रतिपादिलेलें ऐकून फंडाच्या सभासदांना व कार्यकर्त्यांना अचंबा वाटला. फंडाच्या सातव्या वार्षिक सभेंत ठरल्याप्रमाणें येथील महाराष्ट्रीयांच्या सर्व चळवळी एकत्र करण्याचे उद्देशानें महाराष्ट्र असोसिएशनचे सहा प्रतिनिधी व फंडाचे सहा प्रतिनिधी, समाजांतील तीन इतर प्रतिष्ठित सद्गृहस्थ यांची सभा रा. ब. सी. कृष्णस्वामीराव यांचे अध्यक्षतेखालीं भी



रावसाहेब पी. रामचद्रराव, बी· ए.
चीफ इटरप्रेटर मद्रास हायकोर्ट व पहिले उपायक्ष म. ए. फंड.
१९१२-२०



दिवाणबहादुर आर रामचन्द्रराव सी एस्. आय.
मद्रास सिव्हिल सर्व्हिस,
अध्यक्ष म ए फड. १९२३-३०



सी. भीमराव
पहिले असिस्टंट सेक्रेटरी म. ए. फड. १९१२-१९१८



धर्मशील रावबहादुर
खजाना वेंकोबा राव, जमीनदार, मदुरा
उपाध्यक्ष, म. ए. फंड.



रावसाहेब टी. सांबमूर्ति राव, बी. ए., बी. एल्.,
वकील, तंजावर,
उपाध्यक्ष म. ए. फंड. १९२८–३३



रावसाहेब सी. पुरुषोत्तम राव.
रिटायर्ड इन्स्पेक्टर, अबकारी खातें, राजमहेंद्री
उपाध्यक्ष म. ए. फंड १९३३–३६

भरविली. पण या चर्चेतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. मात्र दोघाना एकमेकाच्या दृष्टिकोनातील फरक समजला इतकेंच. यानंतर तीन वर्षे असोसिएशनच्या पुरस्कर्त्यांनीं पुष्कळ श्रम घेतले; पण त्यांनीं प्रथम शाळा बंद केली, नंतर जागा सोडली, लायब्ररी नंतर हालवली असे करून शेवटीं १९२३ सालीं असोसिएशन बंद पडली.

त्याच्या नाटकाना बरीच गर्दी जमत असे व त्यामुळें महाराष्ट्रातील आधुनिक नाटकांची समाजास माहिती झाली ही गोष्ट असोसिएशनला भूषणावह होती. नटाना नवीन वाङ्मय वाचावें लागून त्यानाही आधुनिक मराठी वाङ्मयाची गोडी लागली. लायब्ररींत पुष्कळ चांगल्या पुस्तकाचा भरणा असून निदान कांहीं लोक तरी मराठी औत्सुक्यानें वाचत असत.

१९२८ सालीं सुरू झालेल्या द्वितिय महाराष्ट्र असोसिएशनबद्दल मी कांहींच लिहीत नाहीं. कारण या लेखात समाजाच्या उन्नतीसाठीं झटणाऱ्या व सध्या चालू असणाऱ्या संस्था या लेखाचे कक्षेंत येत नाहींत.

## महाराष्ट्र निधि लिमिटेड

महाराष्ट्र असोसिएशनच्या पुरस्कर्त्यांनीं पेढीचा व्यवहार करून मिळालेल्या नफ्यातून योग्य नफा भागीदाराना वाटल्यावर उरलेली रक्कम दरवर्षी महाराष्ट्र असोसिएशनला द्यावी अशा उद्देशानें महाराष्ट्र निधि लिमिटेड नांवाची पेढी काढली. १९२३ सालीं असोसिएशन बंद पडली. तेव्हां उरलेली रक्कम फंडाला द्यावी असें ठरविण्यात आलें पण पुढें संस्थेच्या कारभारात अव्यवस्था होऊन पैशाची अफरातफर झाली. सेक्रेटरी व ट्रेझरर बेपत्ता झाले. व बँक व्हॉलन्टरी लिक्विडेशनमध्यें गेली. या निधीतून असोसिएशनला फायदा होण्याचे तर दूर राहिलें पण समाजाला चांगलाच चट्टा बसला. हजारो रुपयाची अफरातफर झाली. भागीदारांनीं घातलेलें सगळे भांडवल तर नाहींसें झालेच. पण ठेवीदार व धनको याना रुपयात नऊ आणे या हिश्शयानें त्याची रक्कम त्याना परत मिळाली. शिवाय जे महाराष्ट्रीय सद्गृहस्थ डायरेक्टर झाले त्याना सावकारांचे कर्ज मिटविण्याकरिता एकूण तीस हजार रुपये पदरचे भरावे लागले तें वेगळेच.

या निधीच्या अपयशानें संस्था चालविण्यास कर्तव्यनिष्ठ व हुषार लोकाची किती जरुरी असते व पैशाच्या कामांत पराकाष्ठेच्या खबरदारीची किती जरूरी आहे हें कळून आलें.

---

५

# ध्येय व उद्देश.

आणखी विषयांतर न करितां आपण फंडाच्या १९१२ ते १९३७ पर्यंतच्या प्रगतीकडे लक्ष देऊं. १९१३ सालीं पास झालेल्या साध्या व सुटसुटीत 'उद्देशा'चा उल्लेख पूर्वीच केला आहे. १९१८ सालीं नियमांत थोडासा फरक करण्यांत आला. १९१९ सालच्या सभेनंतर १८६० सालच्या रजिस्ट्रेशन ॲक्टाखालीं संस्था रजिस्टर करावी या हेतूनें नियमाची सुधारणा करण्याचा प्रश्न हातीं घेण्यात आला. हे नियम २१–७–१९२० रोजीं झालेल्या विशेष साधारण सभेंत पास करण्यात आले. संस्थेचे उद्देशही विशद करून त्यांत आपले मुख्य हेतु ग्रथित करण्यांत आले. १९३५ सालीं बदलेल्या कालानुसार फंडाच्या नियमांची सुधारणा करावी लागली; पण उद्देशात फेरबदल करण्याची कांहींच गरज भासली नाहीं.

१९२० सालीं फंड रजिस्टर केल्यामुळें त्याची शाश्वती वाढून देणगी दाखल मोठमोठ्या रकमा मिळूं लागल्या.

शिक्षणाच्या कार्याकडे साहजिकच जास्त लक्ष दिलें जाई. याबाबत उद्देशातील नियम खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

( १ ) गरीब व होतकरू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देऊन मद्रास व म्हैसूर युनिव्हर्सिट्यांना जोडलेल्या शाळा—कॉलेजात व बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यानीं पसत केलेल्या इतर सस्थांत शिकणाऱ्या मराठी बोलणाऱ्या गरीब व होतकरू विद्यार्थी व विद्यार्थिनींना शिष्यवृत्त्या देऊन उच्च शिक्षणास मदत करणें.

( २ ) मराठी बोलणाऱ्या तरुणास व्यापारी व औद्योगिक शिक्षण सपादण्यास शक्य ती मदत करणें.

( ३ ) वैद्यकीय, एंजिनियरिंग, व्यापार, शेतकी व कायदा इत्यादि हे धदे शिकण्याकरिता मराठा समाजातील तरुण स्त्रीपुरुषास मदत करणे.

( ४ ) दक्षिण हिंदुस्थानातील मराठा समाजातील अभ्यासासाठीं परदेशीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांस शक्य ती मदत करणें.

पहिल्या कानूंत मद्रास व म्हैसूर युनिव्हर्सिटयाचाच उल्लेख केला आहे. पण बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनीं आन्ध्र, अन्नमलइ व बनारस या विद्यापीठाचा समावेश इतरात केला आहे. नवीन निघालेल्या त्रावणकोर विद्यापीठाचें नावहि या यादींत लवकरच घालण्यात येईल.

दुसऱ्या कानूत केवळ शिष्यवृत्त्याचाच उल्लेख नाहीं. आपल्या तरुण पिढीस व्यापारी व औद्योगिक ज्ञान मिळविण्याकरिता शक्य ती मदत करण्याची आमची इच्छा आहे. आतापर्यंत गव्हर्नमेंट स्कूल ऑफ कॉमर्स, मद्रास यासारख्या व्यापारी शिक्षणाच्या शाळा व सी. एन.टेक्निकल इन्स्टिटयूट व मद्रास इजिनिअरिंग कॉलेजसारख्या औद्योगिक शिक्षणाच्या शाळा यात अभ्यास करण्यासाठीं आम्ही विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या दिल्या आहेत. जर लायक तरुण पुढें आले तर प्रिंटिंग फोटोग्राफी, चित्रकला, टेक्स्टाइल व लेदर इन्डस्ट्री, व टेलरिंग या सारख्या धद्याचे काम शिकण्यास विद्यार्थ्यांना मदत करण्याचा मॅनेजिंग कमिटीचा हेतु आहे. अशा शिक्षणाचा किती चांगला उपयोग होतो व त्याची किती जरूरी आहे हें आपल्या समाजास कळत असेलच. सर्व मदत म्हणजे जेवण्या-राहाण्याचा खर्च, पगारी किंवा बिनपगारी उमेदवारी मिळवून देणे व सस्थात जागा मिळवून देणे वगैरे सर्व आम्ही या मदतींत करतों. हे काम यशस्वी होण्यास पैशाची व कार्यकर्त्यांची अजून पुष्कळ जरूरी आहे.

तिसऱ्या कानूत म्हटल्याप्रमाणें धदे करण्यास सुद्धा काहीं शिक्षणाची गरज आहे. वैद्यकीय अभ्यासाकरिता निराळी देणगी आहे. त्यातून पुष्कळांना मदत मिळाली आहे. इंजिनिअरिंग व व्यापार शिक्षणास साधारण फडातून मदत दिली जाते. आतापर्यंत शेतकी शिक्षणाकरिता कोणीही मदत मागितली नाहीं.

चौथा कानू जास्त महत्त्वाकांक्षी आहे. आपल्या समाजातील परदेशी अभ्यास करणाऱ्या सर्वांस मदत करण्याचा त्यात उद्देश आहे. ही मदत नुसत्या गरिबांकरिताच नाहीं, खरोखर कानू नबर दोन व तीन मधील मदतही नुसत्या गरिबानाच दिली जात असें नाहीं. फड हा निव्वळ गरीब व होतकरू विद्यार्थ्यांस मदत करण्याकरिता आहे अशी जी चुकीची समजूत आहे व तिचें निराकरण करणें अत्यत जरूर आहे. उदाहरणार्थ, युनिव्हर्सिटीत सगीताच्या डिप्लोमा परीक्षेचा अभ्यास करण्यासाठीं परवाच एका विद्यार्थिनीला नुकतीच शिष्यवृत्ति देण्यात आली. तसेंच एका एल. एम. पी. पास झालेल्या एका तरुण डॉक्टरास कलकत्त्याच्या ट्रॉपिकल स्कूल ऑफ मेडिसिन या सस्थेत अभ्यास करण्याकरिताहि शिष्यवृत्ति देण्यात आली. काहीं दिवसापूर्वी त्रिवेन्द्रमच्या एका प्रसिद्ध व मोठ्या घराण्यातील सद्गृहस्थानीं-हे फडाचे सभासद आहेत—आपल्या मुलाचें उच्च शिक्षण

मद्रासमध्यें चालू असता फंडाच्या व्यवस्थापकानें त्या मुलावर पालकाप्रमाणें देखरेख ठेवावी अशी विनंति केली. हे देखरेखीचे काम देखील फंडाच्या कार्याच्या कक्षेत येतेच. गेलीं पचवीस वर्षे उच्च शिक्षण व औद्योगिक शिक्षण याची महती पटविण्यासाठीं गरीबापासून श्रीमंतापर्यंत समाजातील सर्व दर्जाच्या लोकांत फंडाच्या चालकानीं चळवळ केली आहे या प्रचारकार्याचा उपयोग होऊन समाजाचा फायदा झाला आहे ही गोष्ट कोणीही कबूल करील.

आतापर्यंत फंडानें एकशें एक विद्यार्थ्यांना शाळा व कॉलेजातील फी देण्याकरिता म्हणून सुमारे वीस हजार रुपये खर्च केले आहे. हे विद्यार्थी पुढें कमविते होऊन नोकरदार झाल्यावर घेतलेले पैसे मासिक हप्त्यानीं परत करतात ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. मदत मिळालेल्या १०१ विद्यार्थ्यांपैकीं २६ विद्यार्थ्यांनीं सर्व पैसे थोड्या व्याजासह परत केले व २४ विद्यार्थ्यांनीं काहीं पैसे परत केले असून उरलेले पैसे त्याचेकडून मासिक हप्त्यानीं परत येत आहेत. अशा रितीने एकूण सात हजारावर रुपये फंडात परत जमा झाले आहेत. या पद्धतीनें फंडास काहीं नियमित असे उत्पन्न मिळतें, शिवाय ज्याना फंडाची मदत झाली आहे त्याना फंडाबद्दल आपली कृतज्ञता दाखविण्याची संधि सहज मिळते. शिष्यवृत्त्या मिळालेले लोक व त्याची सध्याची स्थिति याविषयींची माहिती इतरत्र देण्यात आली आहे.

## आर्थिक सुधारणा

समाजाच्या आर्थिक उन्नतीसाठीं झटणे हा फंडाचा दुसरा मुख्य उद्देश आहे. त्या बाबतींत नियम खालीं दिले आहेत.

(१) दक्षिण हिंदुस्थानात स्थाइक झालेल्या मराठा समाजाची स्थिति, त्यांच्यामध्यें उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करून, सुधारणें.

(२) मराठा समाजाची उन्नति करण्यासाठीं जरूर ते उपाय योजणें.

नव्या नियमाप्रमाणें सर्व उत्पन्नाच्या एक-दशांश रक्कम मॅनेजिंग कमेटीनें आर्थिक सुधारणा फंडाकरिता बाजूला ठेवली पाहिजे असे ठरले आहे. या आर्थिक सुधारणा फंडात एक हजार रुपयांपेक्षा जास्त जमा नसली पाहिजे अशीही एक अट आहे. या फंडानें मद्रास शहरातील सर्व मराठ्याच्या आर्थिक परिस्थितीची पाहाणी नुकतीच केली व त्या पाहाणीविषयीं निराळे लेख याच ग्रथात इतरत्र आले आहेत. मद्रास इलाख्यात इतर ठिकाणीं राहाणाऱ्या मराठ्याबद्दल अशीच पाहाणी करण्याचा फंडाच्या चालकाचा विचार आहे.

बेकारी, सहकारी गृहें, चिट फंड, काटकसर करण्याची आवश्यकता, पेढ्याचा धंदा, शेतकी, वगैरे विषयावर फंडानें तज्ज्ञाकडून व्याख्याने देवविली आहेत. महाराष्ट्र बिल्डिंग सोसायटी लिमिटेड नावाची सहकारी संस्था फंडाच्या विद्यमानें १९३२ सालीं काढण्यात आली. फंडाच्या या कामाच्या उपयुक्ततेची लोकाना अजून जाणीव झाली नाहीं असें वाटतें. १९३५ सालीं नियम बदलणें एस. एस. राघवेंद्रराव प्राथमिक शाळा चालविणें व रौप्य–महोत्सवाची तयारी करणे इत्यादि कामामुळे फंडाच्या कार्यकर्त्यांना या कार्याकडे जितकें लक्ष द्यावयास पाहिजे होते तितके लक्ष देता आले नाहीं. बिल्डिंग सोसायटीच्या सभासदास मद्रास शहराच्या हद्दींत कोठेही घर बाधता येते व तें घर बाधण्यास सोसायटी मद्रास सरकारच्या सहकारी खात्याकडून मिळालेल्या पैशातून कर्ज देतें. व्याजाचा दर नुकताच कमी होऊन सध्या कर्जाचा दर दरसाल दर शेंकडा चार रुपये आहे. व्याज इतके कमी असल्यामुळें या सोसायटीचें काम पुष्कळ वाढेल अशी फंडाच्या चालकाना बळकट आशा आहे.

दुसऱ्या एका रितीनें या फंडाचा समाजास फायदा झाला आहे ही गोष्ट येथें नमूद

कमविशी वाढते. फंडाच्या कार्यामुळें आपल्या लोकांच्या वारंवार भेटी होतात, एकमेकांस मिसळण्याची सर्वांना संधी सापडते व यामुळेंच समाजात एकमेकास मदत करण्याची प्रवृत्ति जास्त वाढत आहे.

## भाषा–विभाग

मराठी भाषेच्या अभ्यासास उत्तेजन देऊन मराठी भाषा दक्षिण हिंदुस्थानांत जिवंत राखणें हा फंडाचा तिसरा मुख्य उद्देश आहे. याकरितां खालील नियम आहेत.

( १ ) मुलांना मराठी भाषा ऐच्छिक विषय म्हणून शिकविण्याची सोय ज्या शाळा करतील त्याना लायक मराठी शिक्षकांचा पगार देण्याकरिता मदत करणें. मात्र ज्या शाळांमध्यें लागोपाठ दोन वर्षे मराठी मुलांची संख्या विसांपेक्षा कमी असेल त्या शाळांस अशी मदत करतां येणार नाहीं.

( २ ) मराठी भाषा बोलण्यास लोकांच्या केन्द्रांत मुलींसाठीं मराठी प्राथमिक शाळा चालविणें. मात्र ज्या ठिकाणीं शाळेंतील मुलींची संख्या विसांपेक्षा कमी असेल तेथें अशी शाळा बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनीं विशेष परवानगी दिल्याशिवाय चालविता येणार नाहीं.

( ३ ) ठिकठिकाणीं ग्रंथालयें काढणे व मराठी ग्रंथाचें वाचन करून भाषा सुधारण्यासाठीं, स्त्रीपुरुषासाठीं मराठी वाचनाचे वर्ग चालविणें.

( ४ ) मद्रास येथें मराठी पुस्तकांचीं मध्यवर्ती ग्रंथालयें चालविणें व इतर ठिकाणीं फंडाच्या सभासदांच्या उपयोगासाठीं वाचनालयें चालविणें.

( ५ ) परीक्षाना मराठी विषय घेणाऱ्या उमेदवारास शिष्यवृत्त्या व मराठीच्या अभ्यासाचीं पुस्तकें फुकट देऊन उत्तेजन देणें.

( ६ ) मराठीमध्यें कथा, कीर्तनें, भाषणें वगैरेद्वारा मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांना एकत्र आणणें.

( ७ ) या उद्देशाचे सिद्ध्यर्थ मॅनेजिंग कमिटीस जरूर वाटेल ती उपाययोजना करणें.

वरील नियम स्पष्ट असल्यामुळें आणखी जास्त स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाहीं. मराठी भाषेच्या अभिवृद्धीसंबंधींचें कार्य व फंडाचें सामाजिक, करमणुकीचें व वाङ्मयविषयक कार्य कार्यकारी मंडळाच्या एका सभासदावर सोपविलेलें असतें. त्या सभासदास मदत करण्याकरितां म्हणून 'भाषा कमिटी' नावाची एक सब-कमिटी मॅनेजिंग कमिटी नेमते. फंडाची भाषा-कमिटी दरीच वर्षे सभा, कीर्तनें, वादविवाद वगैरे कार्यें करीत आली आहे. आणि कायम या समारंभास मोठ्या उत्साहानें येतात. काहीं वर्षांपूर्वीं फंडाच्या मॅनेजिंग कमिटीनें त्रिप्लिकेन येथील हिंदु हायस्कुलात चवथी, पाचवी व सहावी या इयत्तेच्या विद्यार्थ्यांस तामिल किंवा तेलगू याच्या ऐवजी मराठी ऐच्छिक भाषा शिकवण्याकरितां मराठी शिक्षकाची योजना करण्याबद्दल शाळेच्या हेडमास्तरांशीं पत्रव्यवहार केला होता. फंडातून मराठी शिक्षकाचा पगार देण्यास फंड तयार होता; हेडमास्तरही तयार होते, पण चौकशी करता असें आढळून आलें कीं वरच्या वर्गांत मराठी बोल-णारी मुलें फार थोडी होती, व जी थोडी मुलें होती तीं तामिल सोडून मराठी शिकण्यास तयार नव्हती. हें पाहून हा प्रयोग करण्यांत अर्थ नाहीं असें हेडमास्तरास साहजिकच वाटलें, त्यामुळें ही कल्पना पुढें सोडून द्यावी लागली.

त्रिप्लिकेनमध्यें फंडातर्फें एक ग्रंथालय चालविलें जात आहे. तसेंच फंडानें चालविलेल्या एका मोफत वाचनालयांत कांहीं मराठी वर्तमानपत्रें व मासिकें घेण्यांत येतात.



मराठा एज्युकेशन फंडाची मॅनेजिंग कमिटी १९२७



दि. ब. टी. वेंकोबा राव,
रिटायर्ड सुपरिंटेंडट ऑफ पोलीस, मद्रास
अध्यक्ष, म. ए. फड १९३०-३२, १९३६



रावसाहेब एन्. चंगल राव, बी. ए.
रिटायर्ड असि. सेक्रेटरी, एल. ॲन्ड एम. सेक्रेटेरिएट, मद्रास
अध्यक्ष, म. ए. फंड १९३२—३६.



दि. ब. टी. भुजंग राव, एम् ए., बी. एल्.,
रिटायर्ड डिस्ट्रिक्ट ॲन्ड सेशन्स जज्ज, बंगलोर
उपाध्यक्ष, म. ए. फंड १९३६



आर्णी सुब्बा राव, बी. ए.
रिटायर्ड सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस, मद्रास.
उपाध्यक्ष म. ए. फंड १९२०–२३.



टी. जिवाजी राव, बी. ए., बी. एल.
ॲक्टिंग डिस्ट्रिक्ट ॲंड सशन्स जज्ज,
उपाध्यक्ष म. ए फंड १९२०–२७

## राजकारण वगैरे

फंडातर्फे कोणच्याही राजकीय चळवळींत भाग घ्यावयाचा नाहीं व अशा चळवळीकडे फंडाचे पैसे वापरता येत नाहींत असा नियम उद्देशपत्रिकेत घातलेला आहे. या अटीमुळें सरकारी नोकरांना फंडाचे सभासद होऊन फंडाच्या कार्यांत बिनधोकपणें भाग घेता येतो.

## शाळेची कल्पना

लहान मुलें व मुली यांच्यासाठीं एक मराठी प्राथमिक शाळा चालवावी असा प्रश्न मॅनेजिंग कमिटीपुढें बरीच वर्षें होता. १९२१ सालीं भरलेल्या फंडाच्या नवव्या वार्षिक साधारण-सभेंत श्री. टी. सांबमूर्तिराव, श्री. व्ही. मल्हारराव व इतर लोकांनीं चालवलेली तंजावर येथील मराठी शाळा, गावच लोक म. ए. फंडाची शाळा स्थापून फंडाचे विद्यमाने शाळा चालवतील व शाळेसाठीं जमलेल्या वार्षिक वर्गणीच्या चतुर्थांशावर मदत देण्यास फंड जबाबदार राहाणार नाहीं अशा अटीवर फंड घेण्यास तयार आहे असा ठराव पास झाला. परंतु त्या वेळचे आमचे तंजावरचे सभासद शाळा चालविण्याची जबाबदारी घेण्यास तयार नव्हते व मद्रासच्या मॅनेजिंग कमिटीस स्थानिक शाळेच्या मदतीशिवाय तंजावर येथें शाळा चालवणे अशक्य वाटलें, म्हणून ही कल्पना सोडून द्यावी लागली.

१९२३ सालीं फंडानें मैलापूर येथें मराठी गर्ल्स स्कूल सुरू केलें. चार निःस्वार्थी भगिनींच्या मदतीनें या शाळेंत मराठी वाचन, लेखन व गणीत दर शनिवारीं व रविवारीं सकाळीं दोन तास शिकविलें जाई. शाळेंत पन्नासावर मुली येत. ही शाळा दीडएक वर्षे चालली. पुढें दोन शिक्षक मैलापूर सोडून गेल्या व उरलेल्या दोघींनाहीं शाळा चालवणें अशक्य झालें म्हणून शाळा बंद करावी लागली.

या शाळेचें यश व वरील परिस्थितींत तिचे बंद पडणें हें पाहून मॅनेजिंग कमिटीनें त्रिप्लिकेनमध्यें एकादी शाळा घेऊन तेथें पगारी शिक्षक ठेवून दररोज एक तास मराठी शिकविण्याचा विचार केला. या उद्देशानें १९३० सालीं शामराव प्राथमिक शाळा त्रिप्लिकेन या शाळेचे हेडमास्तर व मालक श्री. सुंदरराजा राव यांशीं बोलणें सुरू केले. १५०० रुपयास फंडानें शाळा घेण्याचे ठरले इतक्यात श्री. सुंदरराजा राव वारले. त्यांच्या वारसांनीं ती शाळा दुसऱ्या कोणास जास्त पैसे घेऊन विकली. ग्रँट मिळण्याची अनिश्चितता असल्यामुळें फंडास जास्त पैसे देऊन ती शाळा विकत घेण्यास काहीं अर्थ नव्हता. १९३२ सालीं मद्रास प्राथमिक शिक्षणाचा कायदा सुधारण्यात आला, शाळांना विद्यार्थ्यांकडून फी घेण्याची परवानगी मिळाली व ग्रँटबद्दल नवे नियमही प्रसिद्ध झाले. हें पाहून फंडानें त्रिप्लिकेन येथेच दुसरी एकादी शाळा घेण्याचा प्रयत्न सुरू केला.

हा प्रयत्न चालू असताच श्री. टी. ए. राम राव, श्री. टी. आप्पाजी राव, श्री. राजाराम शिंदे व श्रीमती कृष्णाबाई निमकर या चौघांनीं खालील विषयाचा विचार करण्याकरिता एक खाजगी सभा ता. १६-८-३२ रोजीं बोलावली होती.

( १ ) मद्रास कॉर्पोरेशनच्या मदतीनें प्रथम प्राथमिक मराठी शाळा काढणें.

( २ ) नंतर एक खाजगी अँग्लो-मराठी मिडल स्कूल चालवणे.

( ३ ) या नंतर एका स्थानिक हायस्कुलात एका मराठी शिक्षकाची योजना करणें.

या सभेस मी हजर राहिलो होतों. मी जमलेल्या मंडळींस त्रिप्लिकेन येथें एकादी शाळा घेऊन त्या शाळेंत रोज एक तास मराठी शिकविण्याची सोय करायी म्हणून म. ए. फंडानें केलेल्या प्रयत्नाची हकीकत सांगितली. काहीं मंडळींचें असें म्हणणें पडले कीं, जी शाळा काढावयाची

तींत सर्व शिक्षण मराठींतूनच दिलें पाहिजे, तामल किंवा तेलगू भाषेचें शिक्षण देण्याची आवश्यकता नाहीं. यानंतर मोठा मनोरंजक वादविवाद झाला. निव्वळ मराठी प्राथमिक शाळेच्या योजनेविरुद्ध आपले खालील मुद्दे मी सभेपुढे मांडले.

( १ ) मराठी जाणणारे शाळा तपासणारे अधिकारी येथे नसल्यामुळें सरकारची मान्यता मिळण्यास अडचण पडेल.

( २ ) पांचवी पास झाल्यानंतर हायस्कुलांत मराठी शिकविण्याची सोय नसल्यामुळें मुलांना पुढें मराठी शिकतां येणार नाहीं. जे विषय स्थानिक भाषाच्या द्वारें शिकविले जातात त्या विषयाचें शिक्षण मराठींतून देणें हायस्कुलच्या चालकांना अशक्य आहे.

( ३ ) सध्याच्या जीवन कलहांत स्थानिक भाषाचें चांगलें ज्ञान येथें स्थाइक झालेल्या तरुण लोकांस आवश्यक आहे

( ४ ) मराठींतूनच सगळें शिक्षण जेथें दिलें जातें अशा शाळेंत मुलें घालण्यास तयार असलेले पालक त्रिप्लिकेनमध्यें व आसपास पुरेसे मिळणें अशक्य आहे.

( ५ ) मराठा एज्युकेशन फंड किंवा तशीच दुसरी एकादी संस्था यांची आर्थिक स्थिती अशी शाळा काढून चालविण्याची जबाबदारी घेण्याइतकी खचित चांगली नाहीं.

पुढील विचार करण्यापूर्वी जरूर असलेले आंकडे जमवावे व जमाखर्चाचें अंदाजपत्रक तयार करावें असे शेवटीं सभेंत ठरलें. हें काम करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. पण या कमिटीने पुढें कांहींच केलें नाहीं. दोन वर्षें झालीं तरी कमिटीचा रिपोर्ट बाहेर आला नाहीं. १९३४ सालीं फंडाच्या मॅनेजिंग कमिटीनें त्रिप्लिकेन येथील एस. एस. राघवेंद्रराव प्राथमिक शाळा चालवण्यास घेतली. मॅनेजिंग कमिटीने ह्या शाळेची व्यवस्था एक स्कूल कमिटी नेमून तिजकडे सोंपविली आहे या स्कूल कमिटीचे अध्यक्ष रा. सा. टी के. हणमंतराव एम. ए. एल. टी. एम. ई. एस. हे आहेत.

या शाळेस शिक्षण–खात्याकडून वार्षिक एक हजार रुपयाची ग्रँट मिळते. सध्या तेथें पांच इयत्ता असून आठ शिक्षक आहेत. दर वर्गास दररोज एक तास मराठी शिक्षण देण्यांत येतें. शाळा पार्थसारथी स्वामी स्ट्रीट त्रिप्लिकेन येथें असून आसपास मराठा समाजाची बरीच वस्ती आहे. गेल्या साडेतीन वर्षांच्या अनुभवावरून ही शाळा चांगली आहे असे म्हणतां येईल. या शाळेच्या इमारतीचा उपयोग महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांस मराठी भाषेचें शिक्षण देण्याचें केंद्र म्हणून करण्याचा फंडाचा विचार आहे. आताच फंडाच्या पुष्कळ सभा व संमेलनें येथें भरतात व फंडाचे वाचनालयच शाळेच्या इमारतींत आहे. शाळेला स्वतःच्या मालकीच्या इमारतीची जरूरी आहे व समाज या शाळेला जरूर ती मदत करील अशी आशा आहे.

## संलग्न होणाऱ्या इतर संस्था

मराठा एज्युकेशन फंड, मद्रास ही संस्था सबंध मद्रास इलाख्यातील मराठ्यांची मध्यवर्ति संस्था असल्यामुळे मद्रास शहरांतील किंवा बाहेरील तत्सम उद्देश असलेल्या संस्थांना परस्पर प्रेम व सहकार्य यांच्या रज्जूंनीं जोडूं इच्छिते, हे साहजिकच आहे. उदाहरणार्थ, समजा कीं, प्रोद्दतूरसारख्या गावीं मराठी बोलणाऱ्या मुलांकरितां एक लहान वसतिगृह आहे. अशी संस्था फंडाशीं संलग्न झाली तर तिची माहिती फंडाच्या सभासदांना व समाजांतील इतर लोकांना फार लवकर होईल. त्या संस्थेचाहि यांत फायदाच आहे. फंडाच्या कार्याकडे सहानुभूतीनें पाहणारे कांहीं नवीन कार्यकर्ते फंडालाहि मिळतील, हा फंडाचा फायदा होईल. एखादी स्थानिक संस्था फंडाच्या उद्देशास अनुसरून एखादें कार्य करीत असेल, तर समाजाच्या हिता-

समाजांतील स्त्रियांचें त्यांच्या वयाचे मानानें गट नसतात. तसेंच लोकसंख्या-गणनाचे वेळीं, प्रत्येक स्त्रीस पूर्वीं किती मुलें जन्मली व किती मेली याची नोंदही करणें जरूर आहे. या सुधारणा सरकारच्या मदतीनें पुढील मोजणीचें वेळीं होणें जरूर आहे.

सरकारच्या मदतीशिवाय म. ए. फंड या बाबतींत काय करूं शकेल याचा या ठिकाणीं थोडासा विचार करूं. अजून आपल्या समाजांत दरवर्षीं होणाऱ्या लग्नांची नोंद होत नाहीं. कायद्यानें लग्नें नोंदण्याची सक्ती करावी किंवा नाहीं हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. पण आंकडेशास्त्राकरिता तरी अशा तऱ्हेची नोंद झाली तर त्याचा फार उपयोग होईल. कदाचित् अशी नोंदपुस्तकें धार्मिक मठ अथवा इतर संस्था चांगल्या रीतीनें ठेवूं शकतील अशा संस्था आपले नोंदणीचें काम बरोबर करीत आहेत कीं नाहींत हें पाहाण्याची काय व्यवस्था करितां येईल हा एक प्रश्न आहे.

तसेंच, समाजाच्या आर्थिक स्थितीची चौकशी करून ती सुधारण्याचे मार्ग सुचविण्याचे कामीं सार्वजनिक संस्थाचा उपयोग होण्यासारखा आहे. प्रथम नीट चौकशी करून सर्व माहिती जमविली पाहिजे काहीं लोकांना वाटतें कीं ही चौकशी अनावश्यक असून आपल्या खाजगी गोष्टीबाबत अकारणचौकशी आहे. परंतु या चौकशीचा उद्देश व्यक्तिगत माहिती प्रसिद्ध करण्याचा नसून एकंदर समाजाच्या स्थितीची सरासरी कल्पना येण्यासाठीं आहे हें सर्वांनीं समजून घेतले पाहिजे. आम्ही मद्रासेंत नुकत्याच केलेल्या अशा चौकशीमुळें जी कित्येकांची निष्कारण गैरसमजूत झाली आहे ती ह्या लेखामुळें दूर होईल अशी आशा आहे. अशाच प्रकारची चौकशी दुसरीकडे होऊन आपल्या समाजाची सांपत्तिक व शारिरिक स्थिति सुधारून आपली पुढील पिढी इलाख्यांतील लोकांमध्यें पूर्वींच्या पिढीपेक्षां कांहीं जास्त कार्य करून दाखवील अशी आशा करून मी आपला लेख संपवीत आहे.

---

# दक्षिणेंतील महाराष्ट्रीय समाजाची आर्थिक चौकशी



[ ही चौकशी श्री टी. रामचंद्रराव व श्री. बी आर. धोंडूराव या दोघांनीं कांहीं उत्साही स्वयसेवकाच्या मदतीनें केली. या सर्वांना माहिती मिळविण्यास सुमारें सहा महिने अविश्रांत श्रम करावे लागले. या कामाबद्दल आम्ही त्याचे ऋणी आहोत. या चौकशीवरून असें दृष्टोत्पत्तीस येतें कीं आपल्या समाजाची आर्थिक स्थिति सुधारण्याकरितां तरुणांनी वर्तमानपत्रें, बॅंका, विमा कंपन्या, विमानोड्डाण, सिनेमा रेडियो वगैरे नवीन निघालेल्या धद्यात शिरलें पाहिजे आपल्या समाजातील महत्त्वाकांक्षी तरुणांनीं उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जावें, पण आपल्या ज्ञानाचा उपयोग हिंदुस्थानांतील व्यापार व उद्योगधदे वाढविण्याकडे करणें हेंच त्याचें ध्येय असावे. सरकारी नोकरी व डॉक्टर वकील, प्रोफेसर या धद्यात सध्या भयकर गर्दी झाल्यामुळें नवीन धंद्यांकडे तरुणानीं लक्ष दिले पाहिजे. जीवनकलह यशस्वी होण्यास परिस्थितीप्रमाणें तरुणांना बदलत्या परिस्थितीप्रमाणें जीवन बदलता येणें जरुर आहे.

विद्यार्थ्यांना शिक्षण देणें हा एकच म ए. फंडाचा उद्देश नाहीं. समाजाची सर्वसाधारण आर्थिक उन्नति सुधारण्याचा प्रयत्न करणें हाही एक दुसरा उद्देश आहे. ही चौकशी हातीं घेण्याकरिता फंडानें काहीं रक्कम निराळी ठेविली होती यावरून हें स्पष्ट दिसून येईल. सध्याची चौकशी मद्रास शहरापुरतीच करण्यांत आली असली तरी सर्व दक्षिण हिंदुस्थानांतील समाजाची अशीच चौकशी करण्याचा आमचा विचार आहे. —संपादक ]

## भाग पहिला

### उपोद्‌घात

म. ए.फंडाच्या रौप्यमहोत्सवासंबंधानें काम करण्यासाठीं १९-१०-३१ रोजीं एक कमेटी नेमण्यांत आली होती या कमेटीकडे सोपवलेल्या कार्यापैकीं मद्रास येथील मराठी बोलणाऱ्या लोकांची जंत्री तयार करणें हें एक कार्य होतें. ही जंत्री तयार करण्यास घरोघर जाणें अवश्य होतें. तेव्हां त्या जंत्रीबरोबर समाजाच्या आर्थिक स्थितीची माहिती जमवण्याचें ठरलें म्हणून एक प्रश्नावली ( ही या लेखाचे अखेरीस देण्यांत आली आहे ) तयार करण्यांत आली. हें काम करण्यास लायक असे स्वयंसेवक निवडण्यांत आलें. मद्रास शहराचे भाग करून प्रत्येक स्वयंसेवकास एका एका भागांतील प्रत्येक मराठी कुंटुबास भेट देऊन शक्य तितकी माहिती मिळविण्याचा प्रयत्न करण्याचें

काम देण्यांत आले.प्रश्नावलींतील प्रत्येक प्रश्नाची तपशीलवार माहिती देऊन प्रश्नपत्रिका कशी भरावी याचीही माहिती सर्व स्वयंसेवकांस देण्यांत आली होती.परंतु स्वयंसेवकांना भेटीचे वेळीं सर्व माहिती मिळाली नाहीं व कित्येक वेळी फॉर्म घरमालकाकडे भरण्याकरितां ठेवावे लागले यामुळे सर्व माहिती जशी पाहिजे होती तशी मिळाली नाहीं. कांहीं मंडळी सर्व प्रश्नांचीं उत्तरें देण्यास कबूल झाली नाहींत. अशी चौकशी पूर्वी झाली नसल्यामुळें व अज्ञानामुळें साशंक असलेल्या लोकांची खात्री करणें फार अवघड होतें. यामुळें जरी कांहीं फॉर्ममधील कांहीं विविक्षित प्रश्नांचीं उत्तरें अगदी खरी नव्हती तरी ती वस्तुस्थितीपेक्षा फारशी चुकली नाहींत अशी खात्री करून घेण्याबद्दल स्वयंसेवकांना आधीच सांगितलें होतें. जमविलेली सर्व माहिती बहुतेक बरोबर आहे असें मानण्यास हरकत नाहीं.

**चौकशीची प्रगति**

आमच्या चौकशीचें खरें काम ता २४-१-३६ रोजीं सुरू झालें. युनिव्हर्सिट्यांच्या परीक्षांचा थोडा काळ सोडून ती सारखी ६।६।३६ पर्यंत चालू होती ही चौकशी ब्राम्हण, क्षत्रिय व नामदेव समाजांतील लोकांची प्रामुख्यानें होती. पण बहुतेक स्वयंसेवक ब्राम्हण असल्यामुळें इतर समाजांतील लोकांची माहिती थोडी कमी मिळाली. दोन क्षत्रिय सद्गृहस्थांनीं आम्हास मदत करण्याचें कबूल केलें आहे व त्या समाजाचा निराळा रिपोर्ट दुसरे भागांत छापला आहे. क्षत्रिय व नामदेव समाजाची राहाणी व अन्नाच्या गरजा ब्राम्हण समाजापेक्षा भिन्न असल्यामुळें त्यांचे करिता निराळा रिपोर्ट छापणेंही श्रेयस्कर दिसतें.

हा रिपोर्ट मराठा ब्राम्हण समाजासंबंधींच प्रामुख्यानें लिहिला आहे. कांहीं थोड्या लोकांनीं प्रश्नपत्रिका भरण्याचें नाकारिलें तरीपण हा रिपोर्ट सर्वसाधारण समाजाची परिस्थिति वस्तुस्थितीप्रमाणें दर्शवील असें आम्हांस वाटतें.

खालील कोष्टकांत मद्रास शहराच्या निरनिराळ्या विभागांत आपल्या लोकांची वस्ती कशी विभागली आहे हें दाखविलें आहे. ( क्षत्रिय व नामदेव लोकांचाही समावेश या कोष्टकांत केला आहे पण त्यांचे संबंधीच्या आकड्यांत चुका असण्याचा संभव आहे. )

| | भागांत दिलेल्या प्रश्नपत्रिका | मराठे ब्राह्मण | मराठे क्षत्रिय व नामदेव |
|---|---|---|---|
| चिन्ताद्रिपेठ | २ | ० | २ |
| कोडम्बाकम् | १ | १ | ० |
| नुन्गम्बाकम् | २ | २ | ० |
| रॉयपुरम् | १ | ० | १ |
| वाझरम्पेठ | ३ | ३ | ० |

| | | | |
|---|---|---|---|
| न्यू माम्बलम् | ४१ | ४० | १ |
| सैदापेठ | १७ | १७ | ० |
| तिरुवटेश्वरन्पेठ | २७ | १२ | १५ |
| त्रिप्लिकेन | १९८ | १४० | १८ |
| एग्मोर | १६ | १४ | २ |
| व्हेपेरी व परुष्वाकम् | १० | ४ | ६ |
| जॉर्ज टाउन | २६ | २५ | १ |
| मैलापूर | ८३ | ७६ | ७ |
| पार्क टाउन | १२६ | ० | १२६ |
| एकूण | ५१२ | ३३४ | १७८ |

३३४ ब्राह्मण कुटुंबापैकीं ३२ कुटुंबांनीं फारच अपुरी माहिती पुरविल्यामुळें त्याना चौकशीतून वगळण्यांत आले. उरलेल्या कुटुंबांच्या प्रश्नपत्रिकावरून आम्ही सर्वसाधारण ठोकळ अनुमाने काढली आहेत. कांहीं बाबीकरितां मात्र सर्वांची गणना केली आहे.

## वय व स्त्रीपुरुष प्रमाणानुसार विभागणी.

३२ कुटुंबें सोडून दिल्यास मद्रास येथें मराठा ब्राह्मणाची लोकसंख्या १४४३ तिची विभागणी खालीलप्रमाणें होते:—

| | एकूण | दर हजारीं. |
|---|---|---|
| मुलें १४ वर्षाखालील | ४५७ | ३१७ |
| पुरूष १४ ते २० वयाचे | ८३ | ५८ |
| ,, २० ते ४० ,, | २५८ | १७९ |
| ,, ४० ते ६५ ,, | १५९ | ११० |
| ,, ६५ वर्षावरील | २१ | १४ |
| स्त्रिया १४ ते २० वयाच्या | ७७ | ५३ |
| ,, २० ते ४७ ,, | २४५ | १७० |
| ,, ४० ते ६५ ,, | ११८ | ८२ |
| ,, ६५ वर्षावरील | २५ | १७ |
| | १४४३ | १००० |

| | एकूण | दर हजारी |
|---|---|---|
| कामधंदा करणारे पुरूष | ३६९ | २८० |
| ,, करणाऱ्या स्त्रिया | १६ | १६ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| निरुद्योगी | १८ वर्षाखालील | मुलगे | ३८ | ३९ |
| | १६ ,, | मुली | १४ | १४ |
| | १८ वर्षावरील | पुरुष | ९४ | ९७ |
| | १८ ,, | स्त्रिया | ४४१ | ४५४ |
| | | | ९७२ | १००० |

सर्व लोकसंख्येशीं १४ वर्षाखालील वयाच्या मुलाचें प्रमाण काढून दर कुटुंबास सरासरी किती मुलें आहेत हे काढणें उपयुक्त होईल. कदाचित् पुन्हा कांहीं वर्षांनीं अशीच चौकशी करून त्या वेळची व आताची सरासरी काढली तरच कांहीं फायदा होईल. मोठीं कुटुंबें असणें हें दारिद्र्याचें एक कारण असल्यामुळें मुलाच्या संख्येंतील वाढ किंवा उतार ही गोष्ट एकंदर कुटुबातील किती कुटुंबें गरीब आहेत याचें प्रमाण दाखवील.

| | कुटुंबें व लोकसंख्या |
|---|---|
| एकूण लोकसंख्या | १४४३ |
| कुटुबाची संख्या | ३०२ |
| पाच वर्षाखालीं मुलें | १६० |
| ५ ते १४ वर्षांचीं मुलें | २९७ |

एका कुटुबांतील मुलें ( सरासरी )

| | |
|---|---|
| ५ वर्षाखालील | ·५३ |
| ५ ते १४ वयांची | ·९८ |
| | १·५१ |

दोन कालामधील कुटुंबाच्या परीस्थितीची तुलना करताना एका विवक्षित तऱ्हेच्या राहाणीच्या खर्चाची वाढ किंवा उतार ही लक्षात घेतली पाहिजे. याकरितां ' इन्डेक्स नंबर ' याचा उपयोग करावा लागतो.

## राहण्याची जागा

राहण्याच्या जागेबद्दल आम्हीं घरातील खोल्या, त्यांचे क्षेत्रफळ, घर भाड्यानें कीं मालकीचे आहे वगैरे माहिती विचारिली होती. परंतु असें दिसतें कीं, आमचा प्रश्न लोकांना चांगला समजला नाहीं किंवा सर्व माहिती देण्याची लोकांची इच्छा नाहीं. यामुळें प्रत्येक माणसास सरासरी किती जागा आहे, घरात फार दाटी आहे किंवा नाहीं इत्यादि आरोग्यदृष्ट्या उपयोगी पडणारीं अनुमानें माहितीच्या अभावामुळें काढतां येणें शक्य झालें नाहीं.



प्रधान शिरोमणी टी. आनंद राव, सी. आय. ई.
म्हैसूरचे दिवाण



श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, बी. ए.
इचलकरंजी संस्थानचे अधिपति
व मराठा एज्युकेशन फंडाचे पेट्रन.

एका खोलींत दोन माणसांपेक्षां जास्ती माणसें राहिलीं कीं दाटी झाली असें समजण्यास हरकत नाहीं. प्रत्येक मनुष्यास निदान ६०० घनफूट जागा पाहिजे. ही जर नसली तर त्याचें कारण बहुधा जरूर असलेल्या जागेचें भाडे देण्याची शक्ति त्याच्यांत नाहीं हेंच असते.

३३४ कुटुंबांपैकीं ८९ कुटुंबें स्वतःच्या मालकीच्या घरांत राहातात. स्वतःचें घर असून एकजण भाड्याचें घरात राहातो. बाकीचे लोक खालीलप्रमाणें भाडीं असलेल्या घरांत राहातातः—

| दरमहा भाडें | कुटुंबें | शेंकडा |
|---|---|---|
| रु. ० ते ५ | २८ | ११ |
| ६ ते १० | ३२ | १३ |
| ११ ते १५ | ३५ | १४ |
| १६ ते २० | २५ | १० |
| २१ ते २५ | ८ | ३ |
| २६ ते ३० | ६ | २ |
| ३१ ते ४० | ८ | ४ |
| ४१ ते ५० | ४ | २ |
| ५० व वर | ५ | २ |
| इतर ( माहिती उपलब्ध नाहीं ) | ९३ | ३९ |
| | २४४ | १०० |

० ते ५ रुपये भाडें देण्याच्या कुटुंबांत जें घरमालकांचे फार जवळचे आप्त आहेत म्हणून व जे गरिबीमुळें एकाद्या बिऱ्हाडांत फुकट राहातात अशा नऊ कुटुंबांचा समावेश केला आहे.

अगदी गरीब लोकांना उत्पन्नाच्या २३·७ टक्के भाडें द्यावे लागते.

आकडेशास्त्रदृष्ट्या भाडीं ( किंवा पैशांत किंमत करता येईल अशा गोष्टी ) मध्यम, ( median ) चतुर्थ ( quartile ) व दशम ( decile ) या संज्ञांत ठरविणें हितकर आहे. सर्व भाडीं उतरत्या किंवा चढत्या प्रमाणांत मांडलीं असतां ज्यापेक्षां अर्ध्या घरात भाडें जास्त नाहीं व ज्यापेक्षा उरलेल्या अर्ध्या घराचें भाडें कमी नाहीं तें ' मध्यम ' भाडें. क्रमाच्या दोन्ही टोकांस ज्यापेक्षा एक चतुर्थांश व एक दशांश घरांचीं भाडीं जास्त नाहींत व ज्यापेक्षा उरलेल्या घराचीं भाडीं कमी नाहींत त्यास अनुक्रमें ' चतुर्थ ' व ' दशम ' भाडीं असें म्हणतात. पैशाची किंमत कमजास्त झाली तरी दोन कालामधील भाड्यांची तुलना करण्यास या संज्ञापद्धतीचा उपयोग होतो. सध्यांच्या चौकशींत हीं भाडीं हिशेबानें खालीलप्रमाणें निघतात.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | दशम | रु. ९—४—० |
| ( २ ) | चतुर्थ | रु. १०—०—० |
| ( ३ ) | मध्यम | रु. १४—०—० |
| ( ४ ) | चतुर्थ | रु. २०—०—० |
| ( ५ ) | दशम | रु. ३९—०—० |

## कुटुंबाचें घटकावयव

कुटुंबांतील कमवित्या कर्त्या लोकांच्या संख्येकडे पाहिले असतां खालीलप्रमाणें स्थिति दिसून येते:—

| घरांतील कमविते कर्ते पुरुष | कुटुंबांची सख्या | शेंकडा |
|---|---|---|
| ० | — | — |
| १ | २४१ | ७९.८ |
| २ | ४३ | १४.२ |
| ३ | १६ | ५.३ |
| ४ व जास्त | २ | ०.७ |
| | ३०२ | १०० |

यावरून असें दिसतें कीं जवळजवळ ऐंशी टक्के कुटुंबें एकेका कमवित्यावर अवलंबून आहेत तो बेकार झाला, म्हातारपण किंवा रोगामुळें काम करण्यास असमर्थ झाला किंवा मेला तर कुटुंबाची काय दशा? एकाद्या सुखवस्तु कुटुंबाचीही त्रेधा उडते; विमा उतरण्यासारखे उपाय यावर आहेत, नाहीं असें नाहीं. पण सध्या आपणास वस्तुस्थितीकडे पाहाणें क्रमप्राप्त आहे.

साधारण देशस्थ कुटुंबांचें पृथक्करण केल्यास खालीलप्रमाणें दिसते:—

| कमविते कर्ते पुरुष | | इतर | |
|---|---|---|---|
| १८ वर्षांवरील पुरूष | १.२२ | १८ वर्षांवरील पुरूष | .३१ |
| १६ ,, स्त्रिया | .०५ | १६ ,, स्त्रिया | १.४६ |
| १८ वर्षांखालील मुलगे | — | १८ वर्षांखालील मुलगे | .१३ |
| १६ ,, मुली | — | १६ ,, मुली | .०५ |
| | | ५ ते १४ वर्षांची मुलें | .९८ |
| | | ५ वर्षांखालील मुली,, | .५३ |
| | १.२७ | | ३.४६ |

कुटुंबांतील सर्वांची संख्या ४.७३

आश्रित मुलांच्या संख्येवरून घराण्यांची आणखी एक विभागणी करण्यांत आली आहे. यावरून ४ किंवा जास्ती मुलें असलेलीं कुटुंबें किती आहेत हें कळतें. पुढें केव्हांतरी अशी चौकशी झाल्यास या माहितीचा उपयोग होईल. यांतील फरक थोडा झाला तरी राहाणीचा दर्जा किती कमजास्त झाला हें चटकन कळेल.

## मुलांच्या संख्येवरून कुटुंबांची विभागणी.

| १८ वर्षाखालील मुलगे व १६ " मुली धरून आश्रित मुलाची सख्या | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कुटुबाची संख्या | ९३ | ६२ | ५८ | ४६ | २३ | १० | ६ | ३ | १ |
| शेंकडा प्रमाण | ३०·८ | २०·५ | १९·२ | १५·२ | ७·६ | ३·३ | २ | १ | ४ |

## जबाबदारी

कमवित्या लोकांवर किती मुलें व माणसें अवलंबून आहेत यांचेही आंकडे खालील कोष्टकात दिले आहेत, व त्यावरून पुष्कळ बोध घेतां येण्यासारखा आहे जबाबदारीची बरोबर व्याख्या करणें अवघड आहे. बौले व हॉग या दोन आंकडे-शास्त्रज्ञांच्या व्याख्यांचा आम्ही उपयोग केला आहे.

( १ ) पूर्ण पेन्शन मिळत असलेल्या 'न कमवित्या' लोकांना आश्रित म्हणून गणलें नाहीं.

( २ ) १८ वर्षाखालील न कमविणारे मुलगे व १६ वर्षाखालील न कमविणाऱ्या मुली हीं 'आश्रित मुलें' या संज्ञेंत येतात. इतर सर्व आश्रित वयानें मोठे आहेत.

( ३ ) 'कमविता पुरुष' ( घरांत दुसरे कमविते असले तरी ) स्वतःच्या न कमावित्या बायको व मुलाबद्दल जबाबदार धरला आहे.

( ४ ) जेथें मनुष्याचा 'बाप' हि कमविता आहे तेथें बापास त्याची बायको व इतर मुलें याबद्दल जबाबदार धरलें आहे व त्या तरुणास स्वतःच्या बायको व मुलां-बद्दल जबाबदार धरलें आहे.

( ५ ) नवरा 'कमविता' असतांना 'कमावित्या बायकोस' तिचे आश्रित वडील, आई, भाऊ व बहीण इत्यादिकांबद्दल जबाबदार धरले आहे, पण तिच्या मुलांकरितां नाहीं.

मनुष्याचे वडील किंवा आई त्याचेवर अवलंबून असून त्याचे घरीं रहात असतील तर तो त्यांचेकरितां जबाबदार आहे पण त्यास इतर कमविते भाऊ किंवा बहिणी असतील तर ती जबाबदारी हिश्शेराशीनें विभागण्यांत आली आहे.

घरांत कमविता पुरुष नसल्यास कमविती स्त्री किंवा विधवा बाई व मुलें हीं आश्रितांबद्दल जबाबदार आहेत.

जबाबदारी ठरवितांना १८ वर्षांवरील मुलगे पुरुष म्हणून व १६ वर्षांवरील

मुली स्त्रिया म्हणून धरल्या आहेत. या वयाखालील मुलें कमाविती असलीं तरी आश्रितांबद्दल जबाबदार म्हणून गणली गेली नाहींत. अपवाद एवढाच कीं, जर कमवित्या मुलाशिवाय आश्रिताची जबाबदारी घेण्यास कोणी नसेल तर त्या मुलांस जबाबदार धरतात. खालील कोष्टकांत अशा 'कमवित्या मुलांची' गणना केली नाहीं.

## कमावित्यांची आश्रिताबद्दल जबाबदारी

| कमवित्यांच्या जबाबदारीचें प्रमाण | वीस वर्षावरील कमविते पुरुष | शेंकडा | अठरा वर्षावरील कमवित्या स्त्रिया | शेंकडा |
|---|---|---|---|---|
| जबाबदारी नाहीं | १७ | ५.८ | ४ | ३६.३ |
| एका माणसाबद्दल अंशतः जबाबदारी | १४ | ४.७ | — | — |
| दोन " " " | १३ | ४.५ | १ | ९.१ |
| तीन " " " | ९ | ३.१ | — | — |
| चार अथवा जास्त | १८ | ६.२ | १ | ९.१ |
| एका माणसाबद्दल पूर्ण जबाबदारी | ४५ | १५.४ | २ | १८.१ |
| दोन " | १३ | ४.५ | — | — |
| तीन " | १ | .३ | — | — |
| चार अथवा जास्त" | २ | .७ | — | — |
| एक मूल व ० माणसाबद्दल पूर्ण जबाबदारी | १ | .३ | — | — |
| " १ " | २३ | ७.९ | १ | ९.१ |
| " २ " | १७ | ५.८ | १ | ९.१ |
| " ३ " | ६ | २.१ | — | — |
| " ४ किंवा जास्त" | ४ | १.४ | — | — |
| दोन मुलें व ० " | १ | .३ | — | — |
| " १ " | २० | ६.९ | — | — |
| " २ " | ९ | ३.१ | — | — |
| " ३ " | ८ | २.८ | — | — |
| " ४ किंवा जास्त" | १ | .३ | — | — |
| तीन मुलें व ० माणसाबद्दल" | — | — | — | — |
| " १ " | १६ | ५.६ | — | — |
| " २ " | १२ | ४.२ | — | — |
| " ३ " | ४ | १.४ | — | — |
| " ४ किंवा जास्त" | ४ | १.४ | — | — |
| चार किंवा जास्त मुलें व ० माणसाबद्दल" | — | — | — | — |
| " १ " | १९ | ६.६ | — | — |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ” | २ | ” | ९ | ३·१ | — | — |
| ” | ३ | ” | १ | ·३ | १ | ९·१ |
| ” | ४ किंवा जास्त | ” | ४ | १·४ | — | — |
| | | | २९१ | १०० | ११ | १०० |

## संपत्ति व दारिद्र्य

प्रत्येक मनुष्याच्या इस्टेटीची यादी करणें हा संपत्ति व राखून ठेविलेले पैसे मोजण्याचा उत्तम मार्ग आहे अशी १९२४ च्या हिंदी आर्थिक चौकशी कमिटीनें सूचना केली होती. ही सूचना आम्हांस अव्यवहार्यच वाटते आम्ही खालील कोष्टकात दाखविल्याप्रमाणें नुसत्या उत्पन्नाचाच विचार केला आहे.

दरमहा उत्पन्न ( रुपये )

| | माहीत नाहीं | ०–५० | ५१–१०० | १०१–१५० | १५१–२०० | २०० |
|---|---|---|---|---|---|---|
| कुटुंबांची सं. | ५४ | ७५ | ९२ | ३५ | १८ | २९ |
| शेंकडा | १७·८ | २४·८ | ३०·३ | ११·६ | ५·९ | ९·६ |

आपल्या समाजातील लोकांचें सरासरी उत्पन्न चागले आहे ही गोष्ट संतोषकारक आहे, पण खर्चाचा विचार केल्यास पुष्कळ अडचणी येतात. काहीं थोड्या कुटुंबात खर्च उत्पन्नापेक्षा जास्त होतो असें आढळून आलें आहे. हीं कुटुंबें ठेवीतून पैसे काढीत आहेत किंवा त्याना दुसरीकडून ( आम्हांस न कळविलेले ) उत्पन्न येतें किंवा तीं उधळेपणा करून कर्जबाजारी होत आहेत, यापैकीं कोणचें तरी एक अनुमान त्यांना लागू पडेल.

समाजांत दारिद्र्य कितपत आहे हें पाहाण्याचा आमचा मूळ उद्देश आहे. हें समाजांतील ज्या कुटुंबाना जरूर असलेलें अन्न, वस्त्र व राहाण्याची जागा मिळण्याइतकें उत्पन्न नाहीं त्यांची संख्या काढल्यानें कळेल.

अन्नांतील सत्त्व त्यांत असलेल्या प्रोटीन, चरबी व कार्बोहायड्रेट्स यांवर अवलंबून आहे. चरबी व कार्बोहायड्रेट्स ही दोन्ही किती प्रोटीनच्या बरोबर आहे हें कळल्यापासून अलीकडे अन्न त्यांतील प्रोटीनच्या व कॅलोरीच्या मापानें दर्शविल्या जाणाऱ्या शक्तीच्या रूपांत दर्शविण्याची प्रथा पडली आहे. वय, लिंग, व कामाला लागणारे श्रम वगैरेच्या भिन्नपणामुळें निरनिराळ्या माणसास कमजास्त अन्नाची जरूर असते. पण साधारण माणसास दररोज उष्णतेच्या ३५०० कॅलोरींची व प्रोटीनच्या १२५ ग्रामांची जरूर आहे असें प्रमाण धरतात.

वरील प्रमाण धरूनसुद्धां पुष्कळ तऱ्हेचे आहार ठरवितां येतील. पण आमचा उद्देश जरूर अशी सत्वें व विविधता असलेला पण स्वस्त असा आहार ठरविणें हा असावा. तुरुंगांतील कैद्याचे आहार, रुग्णालयांतलि आहार व दुष्काळांत सरकार देते तो शिधा ह्या तीन सरकारनें ठरविलेल्या आहारांवरून मनुष्यास जगण्यासाठीं कमींत कमी किती अन्न लागते हे ठरवावे असें हिंदी आर्थिक चौकशी कमेटीनें सुचविलें आहे. पण हें मत आम्हांस मान्य नाहीं, आम्ही सर रॉबर्ट मॅक्कॅरिसन यांनीं आपल्या 'अन्न' या पुस्तकांत सुखवस्तु हिंदु कुटुंबाचा जो आहार दिला आहे त्यांत थोडा फेरफार करून तो प्रमाण धरला आहे. सरसाहेबाच्या मतें चांगल्या आहारांत ९० ते १०० ग्रॅम प्रोटीन, ८० ते ९० ग्रॅम चरबी व ३६० ते ४५० ग्रॅ कार्बोहायड्रेट्स असावेत. यावरून खालील कोष्टक दिले आहे.–

| (रोजचा आहार)अन्न | औस | प्रोटीन | ग्रॅमचरबी | कार्बोहायड्रेट्स | कॅलोरी |
|---|---|---|---|---|---|
| गिरणीत सडलेला तांदूळ | १९·० | ३४·० | २ ४ | ४९५·६ | २१४७ |
| डाळ | ३ ६ | २३·४ | ३·६ | ५८ २ | ३६० |
| चणे | १·९ | १०·८ | २·५ | २९.० | १८२ |
| वनस्पतिजन्य तेल | १·२ | ०·० | ३३ ६ | ०·० | ३०२ |
| तूप | ०·४ | ०·० | ९·२ | ० ० | ८३ |
| दही | ९·० | १२ ६ | ९·० | ७·२ | १६२ |
| भाजीपाला | ६·० | २·० | ०·५ | ८ ६ | ४८ |
| खोबरे | २·० | ३·२ | २८ ६ | १५ ८ | ३३४ |
| साखर | १·० | ० ० | ०·० | २५·० | १०० |
| दूध | ७·० | ६·५ | ७·१ | ९ ५ | १२६ |
| एकूण | ५१·१ | ९२·५ | ९६ ५ | ६४८ ९ | ३८४४ |
| त्यांतून वाया जाईल त्या अन्नाकरितां १० टक्के वजा | ५·१ | ९·३ | ९ ७ | ६४·९ | ३८४ |
| | ४६·० | ८३·२ | ८६·८ | ५८४·० | ३४६० |

वरील जिनसांचे सध्याचे किरकोळ भाव धरले असता दर माणशीं रोज तीन आणे खर्च पडेल. संबंध कुटुंबाचा अन्नाचा खर्च काढण्यास रौन्ट्रीनें आपल्या दारिद्र्य या पुस्तकांत दिलेलीं खालील गुणपदें आम्ही वापरणार आहोत:–

| | | |
|---|---|---|
| एका स्त्रीला | मनुष्याच्या | चार पचमांश अन्न लागतें |
| १४ ते १६ वयाच्या मुलास | ,, | ,, ,, ,, |
| ,, ,, ,, मुलीस | ,, | सात दशांश ,, |
| १० ते १३ वर्षाच्या मुलास | ,, | तीन पंचमांश ,, |
| ६ ते ९ ,, ,, | ,, | अर्धे ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| २ ते ९ ,, ,, ,, | | दोन पंचमांश | ,, |
| २ वर्षांखालील मुलास | ,, | तीन दशांश | ,, |

अन्नाशिवाय इतर गोष्टी म्हणजे कपडे, दिवाबत्ती, व जळणाचा लांकूडफाटा हीं कमींत कमी किती पैशाची लागतात हें पाहिले पाहिजे तसेंच भाडें ही एक महत्त्वाची खर्चाची बाब आहे. म्हणून आम्ही प्रत्येक कुटुंबाच्या उत्पन्नांतून भाडे वजा करून उरलेली रक्कम व अन्न व इतर किरकोळ खर्चाची बेरीज यांची तुलना केली आहे. अन्नखर्चात 'कॉफी'चा खर्च धरला नाहीं. मुलांचे शिक्षण ही एक खर्चाची मोठी बाब आहे. गरीब लोक साधारणपणें किती खर्च करतात हे काढण्याकरितां आम्ही कमी उत्पन्न असलेल्या लोकाच्या प्रश्नपत्रिका विचारात घेतल्या. अन्न व कपडे यावरील खर्च मिळून एकत्र दाखविला असल्यामुळें थोडी अडचणच झाली. ढोबळ मानानें पाहता असें दिसते कीं, अन्नाचा खर्च जवळजवळ इतर खर्चाइतकाच होतो म्हणून आम्ही दरएक कुटुंबाचा एकूण खर्च अन्नखर्चाच्या दुप्पट आहे असें गृहीत धरलें आहे. ज्या कुटुबांचें भाडे व आश्रिताना पाठविलेल्या रकमा उत्पन्नांतून वजा करतां उरलेल्या रकमा या एकूण खर्चापेक्षां कमी होत्या तीं कुटुबें 'गरीब' आहेत असें गृहीत धरले आहे.

सर्व कुटुंबाच्या स्थितीकडे अवलोकन करून खालील कोष्टक लिहिलें आहे.

| आर्थिक स्थिती | कुटुंबांची संख्या | शेंकडा |
|---|---|---|
| 'प्रमाणा'पेक्षा खात्रीने चांगली | २०७ | ६८·६ |
| ,, बहुतेक ,, | २८ | ९·३ |
| 'प्रमाणा' इतकेंच उत्पन्न | २० | ६·६ |
| 'प्रमाणा'पेक्षा बहुतेक वाईट | १७ | ५·६ |
| ,, खात्रीनें ,, | ३० | ९·९ |
| एकूण | ३०२ | १०० |

प्रमाणापेक्षा ज्याची स्थिति चांगली नाहीं अशांचें पृथक्करण करून दरएक गटांतील माणसाची संख्या खालील कोष्टक दाखविते.—

| मिळवते. | 'प्रमाणापेक्षा खात्रीने वाईट माणसाची संख्या | शेंकडा | 'प्रमाणापेक्षां बहुतेक वाईट लोकांची संख्या | शेंकडा | प्रमाणाइतकेंच उत्पन्न लोकांची सं. | शेंकडा |
|---|---|---|---|---|---|---|
| १८ वर्षांवरील पुरुष | ३० | ९६.८ | १७ | ९४·४ | २१ | ८७·५ |
| १६ ,, स्त्रिया | १ | ३·२ | १ | ५.६ | ३ | १२·५ |
| मुलें | — | — | — | — | — | — |
| एकूण | ३१ | १०० | १८ | १०० | २४ | १०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **आश्रित** | | | | | | |
| १८ वर्षांवरील पुरुष | ९ | ९·७ | ३ | ५ ४ | ८ | १२·३ |
| १६ ,, स्त्रिया | ४१ | ४४·० | २१ | ३७·५ | २५ | ३८·५ |
| १८ वर्षांखालील मुलगे | २ | २·२ | २ | ३·६ | ४ | ६·२ |
| १६ ,, मुली | २ | २·२ | ० | — | १ | १·५ |
| लहान मुलें | ३९ | ४१·९ | ३० | ५३·५ | २७ | ४१·५ |
| एकूण आश्रित | ९३ | १०० | ५६ | १०० | ६५ | १०० |
| **मिळवते व आश्रित** | | | | | | |
| १८ वर्षांवरील पुरुष | ३९ | ३१·४ | २० | २७·१ | २९ | ३२·६ |
| १६ ,, स्त्रिया | ४२ | ३३·९ | २२ | २९·७ | २८ | ३१·५ |
| १८ वर्षांखालील मुलें | २ | १·६ | २ | २·७ | ४ | ४·५ |
| १६ ,, मुली | २ | १ ६ | ० | — | १ | १·१ |
| लहान मुलें | ३९ | ३१·५ | ३० | ४०·५ | २७ | ३०·३ |
| | १२४ | १०० | ७४ | १०० | ८९ | १०० |

बौले व हॅाग यांनी विलायतेतलि पांच गांवांची चौकशी केली होती तींत कामकरी लोकातील ९७ टक्के लोक ' प्रमाणा ' पेक्षां चांगल्या स्थितींत होते असें दाखविलें आहे पण आपल्या समाजांत ७७ च टक्के लोक ' प्रमाणापेक्षां ' चांगल्या स्थितीत आहेत ही गोष्ट वस्तुस्थिती खेदजनकच आहे. मद्रासमधील इतर मराठे लोक यांत धरले व मद्रास बाहेरील लोकहीं धरले तर चांगल्या स्थितींत असलेल्या लोकांचे प्रमाण पुष्कळच खालीं उतरेल हें स्पष्ट आहे. मद्रास येथें असलेलें प्रमाण जरी सरसकट लागू आहे असे धरले तरी मद्रास इलाख्यांतील मराठा समाजांत ५१४८० लोक ' गरीब ' आहेत असें होईल.

## गरिबीचीं कारणें

' प्रमाणापेक्षां वाईट ' आर्थिक स्थिति असलेल्या कुटुंबांच्या प्रश्नपत्रिकांकडे पाहून गरिबीचीं कारणें काय आहेत हें अजमावण्याचा आम्ही प्रयत्न केला. सरकारी नियम वगैरे कारणें थोडीबहुत आहेत. पण आम्ही गरिबीचीं मूळ कारणें शोधत नाहीं. समाजांतील लोकांना वैयक्तिक प्रयत्नानें जीं कारणें सहज नाहींशी करतां येतील त्यांचा आम्ही विचार केला आहे. या कुटुंबाचें वर्गीकरण करता खालील तीन गट मुख्यतेकरून पडतात:—

| गरिबीचें कारण | प्रमाणापेक्षां खात्रीनें वाईट | प्रमाणापेक्षां बहुतेक वाईट |
|---|---|---|
| बेकार आश्रित | १ | ३ |



रावबहादुर टी. सुंदरराव, बी. ए , आय. एस्. ओ.
डेप्युटी कलेक्टर, त्रिचीं.



के वेंकटराव, बी. ए.
अव्वल सुपरिंटेंडंट त्रिवेंद्रम्, म. ए. फंडाचे पेट्रन



आर. माधव राव, बी. ए. मद्रास,
म. ए. फंडाचे पेट्रन.



टी. व्ही. शंकर राव बी. ए., सैदापेट,
डायरेक्टर, म. ए. फंड. १९३६

| | | |
|---|---|---|
| कमी उत्पन्न | ७ | ७ |
| कुटुंबांतील माणसांची संख्या | १७ | ७ |
| एकूण | ३० | १७ |

शेवटच्या गटाचें पुनः वर्गीकरण करतां असे दिसून येतें कीं, ' प्रमाणापेक्षां खात्रीनें वाईट ' स्थिति असलेल्या १७ कुटुंबांत एकूण ४४ आश्रित व ४१ मुलें होतीं, व ' प्रमाणापेक्षां बहुतेक वाईट ' अशी स्थिति असलेल्या ७ कुटुंबांत १२ आश्रित व २४ मुलें होतीं

आश्रिताचा मोठा भरणा हा तर स्पष्ट दिसतोच व मुलांच्या संख्येपेक्षां आश्रितांची मोठी संख्या हेंच कुटुंबातील माणसाची संख्या वाढण्याचें प्रबळ कारण आहे.

रौन्ट्रीच्या पुस्तकातील प्रत्येक कमवित्या माणसाच्या परिस्थितीतील चढउतार दर्शविणारा तक्ता खालीं दिला आहे.




## उद्योग व बेकारी

आतापर्यंत स्वतःचें उत्पन्न ( मग कोठून का मिळेना ! ) असलेल्या सर्वांस ' कमविते ' या सदरांत घातलें आहे. पेन्शनरानाही याच सदरांत घातलें आहे.

पूर्वी एके ठिकाणीं उल्लेखिल्याप्रमाणें सगळ्या प्रश्नपत्रिका पाहिल्या असतां समाजांत ३६९ कमविते पुरुष आहेत. उद्योगधंद्याचे दृष्टीनें त्याचें वर्गीकरण करितां पुढील गट पडतातः—

सरकारी नोकर व निमसरकारी संस्थांचे नोकर १२०, व्यापारी मंडळ्या, पेढ्या वगैरे संस्थांतील नोकर ६४; पेन्शनर ४९; खाजगी नोकर ३६; शिक्षक २४; वकील १९; व्यापारी १९; डॉक्टर ९, जमीनदार ७; पुरोहित ६, इंन्जिनीअर ५; ऑडिटर २; गवई २; आचारी २, वृत्तपत्रव्यवसायी १, शिपी १ इतर ११ एकूण ३६९.

उद्योगधंद्यांचा अभाव व कदाचित जातीबद्दलच्या कल्पना यामुळें आपल्या समाजांतील तरुणास सोईस्कर असे उद्योग कमीच आहेत. पण असें कबूल केले पाहिजे कीं नोकरी किंवा इतर धंद्यांत पडण्याचा आमच्या तरु ांनीं (अज्ञानानें म्हणा) पाहिजे तितका चांगला प्रयत्न केला आहे असें नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं नोकरी मिळाल्यावर पुढें काय परिस्थिति आहे याची यथार्थ कल्पनासुद्धां कित्येकांना नसते. प्रत्येक धंद्यांतील लोकांच्या परिस्थितींची खरी माहिती देणारे एकादें पुस्तक निघाल्यास तरुण लोकांस स्वतःचा धंदा निवडण्यास फार मदत होईल.

आतां आपण समाजांतील बेकारीकडे वळूं. सर्व प्रश्नपत्रिकांतील माहिती एकत्र केल्यावर निरुद्योग्याचें वर्गीकरण खालीलप्रमाणें आहे.

| | |
|---|---|
| बी. ए. किंवा बी. एस. सी. ( ऑनर्स ) | ६ |
| बी. ए. किंवा बी. एस सी. | ७ |
| वकील | २ |
| डॉक्टर | २ |
| अकाउन्टट, टेक्नॉलॉजिस्ट | ३ |
| व शिंपी ( प्रत्येकी एक ) | ३ |
| इन्टरमिजिएट | ८ |
| एन्जिनियरिंग ( लोअर स्टॅन्डर्ड ) | १ |
| मॅट्रिक | २३ |
| कमी शिकलेले | ८ |
| सेवानिवृत्त लोक ( ५५ वर्षांवरील ) | ८ |
| जखमेनें किंवा आजारामुळें असमर्थ | ३ |
| अठरा वर्षांवरील विद्यार्थी | १४ |
| इतर | ९ |
| एकूण | ९४ |

कमी शिकलेले, सेवानिवृत्त, विद्यार्थी व आजारी लोक सोडून दिल्यास इतरांना उद्योगधंदा पाहून देणें शक्य झाले पाहिजे. शिकलेल्या लोकांपैकीं कांहीं तरुण आहेत व कामधंदा मिळण्यास त्यांस थोडा विलंब लागला तर ते थांबू शकतील.

# मराठा एज्युकेशन रौप्यमहोत्सव जंत्री

## प्रश्नपत्रिका.

(विवाहित किंवा अविवाहित)

१ नाव, वय, जात, धर्म, गोत्र व प्रवर

२ आड नाव ...

३ आई बाप ... नाव वय

४ मूळगाव व तें सोडण्याचें कारण

५ शिक्षण

६ धंदा

७ राहण्याचें ठिकाण व धंद्याचे जागेपासून त्याचें अंतर

| नाव व संबंध | वय | आईबापाचे नाव | शिक्षण | मराठी भाषेचे ज्ञान | धंदा | स्वतःचे उत्पन्न | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |

१० बायको किंवा नवरा

११ घरांतील इतर स्त्रीपुरुष व आश्रित

| नाव | वय | शिक्षण वर्ग शाळा किंवा कॉलेज | मराठी भाषेचे ज्ञान | धंदा | उत्पन्न | विवाहित असल्यास नवरा किंवा बायकोची माहिती | | | | | [illegible] |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | नाव | वय | शिक्षण | धंदा | उत्पन्न | |
| | | | | | | | | | | | |

१२ मुलें.

१३ भाऊ व बहिणी

१४ राहण्याची जागा.

मोहल्ला, पेठ, रस्ता,

जागेचें क्षेत्रफळ, खोल्याची संख्या वगैरे

भाड्याची जागा का मालकीची ?

| | मुख्य रु. | इतर रु. | एकूण रु. |
|---|---|---|---|
| १५ उत्पन्न | | | |

१६ खर्चः—

अन्न व कपडालत्ता

भाडें

शिक्षणखर्च

इतरखर्च

१७ दुसरीकडे राहणाऱ्या आश्रितास मदत

१८ आयुष्याचा विमा उतरला आहे काय ?

१९ प्रॉव्हिडंट फंडास वर्गणी देता काय ?

२० कर्ज ( असल्यास )

२१ साधारण स्थिति

(१) आरोग्य

(२) खेळ व करमणूक

(३) सहकारी संस्थेचे सभासद आहात काय ?

(४) कोणच्या क्लबाचे सभासद आहात काय ?

(५) हौसेचे छंद व इतर व्यवसाय

२२ पूर्वजांची माहिती व प्रांताशीं संबंध.

२३ तुमची सांपत्तिक स्थिति कशानें सुधारेल ?

२४ इतर शेरा :—

ठिकाण ~~~~~~~~~~ तारीख —————— सही ——————

सूचना—मद्रास शहरातील मराठा समाजातील लोकांच्या आर्थिक परिस्थितीची माहिती जमवून समाजाची आर्थिक व सामाजिक सुधारणा करण्याचे उपायांचा विचार करणें हा या चौकशीचा उद्देश आहे. आपण दिलेलीं उत्तरें गुप्त ठेवण्यात येतील.

म. ए. फं. राज्यमहोत्सव कमिटी.

## आर्थिक सुधारणेचे उपाय

आपली आर्थिक सुधारणा करण्यास काय उपाय तुम्ही सुचवता या प्रश्नास बरीच तऱ्हेवाईक उत्तरें आलीं आहेत. या प्रश्नामुळें विचारास चालना मिळाली यांत शंका नाहीं. उत्तरांचें कांहीं मासले खालीं दिले आहेत:—

( १ ) आपल्या साधनांचा चागला उपयोग करून संपत्तीची जास्ती सम प्रमाणांत विभागणी.

( २ ) व्यापार, उद्योगधंदे व सहकारी तत्त्वावर चाललेली कर्ज देणारी पेढी अथवा इमारती बांधणारा संघ ( चांगल्या वस्तींत कमी भाड्याचीं घरें देणें )

( ३ ) शेती--सुधारणा

( ४ ) फायदेशीर दुय्यम धंदे करणें

( ५ ) तरुणास बेकारीचे काळांत आर्थिक मदत

( ६ ) उच्च घराण्यांशीं शरीरसंबंध न करणें ( उधळपट्टी कमी करणें हा उद्देश आहे असें वाटतें )

( ७ ) बालविवाह थांबविणें व विवाह सहाय्यक मंडळ स्थापणें

( ८ ) शेतसारा निमपट करणें

( ९ ) नोकरी

( १० ) कोणत्याहि धद्यांतील पुढें आलेल्या लोकांनीं समाजातील त्याच धंद्यांतील नवीन लोकास मदत करणें

अजून परठिकाणीं अशी पहाणी व्हावयाची आहेत व सर्व इलाख्यांतील लोकांची परिस्थिति कळल्यावरच एकादी व्यापक योजना तयार करता येईल; या उद्देशानें आम्ही तूर्त वरील सूचनांवर कोणतेच निर्णायक मत देत नाहीं. समाजाची सुधारणा करण्याच्या उपायांचा विचार करण्यासाठीं परिषद भरवावी असेंही सुचविण्यांत आलें आहे. हें सर्व घडून येण्यास फार वेळ लागेल हे उघड आहे. परंतु दरम्यानचे कालांत म. ए. फंडाच्या परगांवच्या शाखांनीं अशीच आर्थिक चौकशी हातीं घेऊन लवकरच आपल्या समाजाची एकंदर परिस्थिति अजमावण्यासाठीं आम्हांस माहिती पुरवावी. या कामांत तेथील तरुणांची मदत त्याना मिळेल व लवकरच उपाययोजना करतां येईल अशी आम्हांस आशा आहे.

# आर्थिक चौकशी



## भाग दुसरा

( क्षत्रिय विभाग )

### उपोद्घात

मद्रास शहरांत स्थाइक झालेल्या महाराष्ट्रीय समाजांत क्षत्रिय लोकांचा बराच भरणा आहे. इतके दिवस ते निराळाच गट करून राहिले होते, व समाजांतील ब्राह्मण व क्षत्रिय या दोन्ही समाजाला एकत्र आणण्याचा डोळ्यात भरण्यासारखा प्रयत्न आतापर्यंत कोणीही केला नाहीं. मद्रासकडील सर्व महाराष्ट्रीय समाजाच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीची सुधारणा करणें हा मराठा एज्युकेशन फंडाचा एक उद्देश आहे. व या करितांच फंडानें आर्थिक सुधारणा-फंड या नावाचा निराळा निधि जमविला आहे. या आर्थिक फंडाचे विद्यमानेंच ही चौकशी केली गेली. या चौकशीच्या क्षत्रिय विभागाची पाहाणी करून खालील अनुमानें माण्यांत येत आहेत.

ब्राम्हण व क्षत्रिय यांची निराळी चौकशी करण्याची कारणें दोन आहेत. एकतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें हे दोन्ही समाज एकमेकापासून दूर राहिल्यामुळें त्यांच्या चालि रितींत व सांपत्तिक स्थितींत फार फरक पडला आहे तसेंच दोन्ही समाजाच्या आहारांतही फार फरक आहे. दोन्ही विभागांची चौकशी एकत्र करून त्यावरून अनुमानें काढल्यास तीं चुकीची असण्याचा संभव आहे. पहिल्या भागांत सांगितल्याप्रमाणें क्षत्रिय कुटुंबाकडून माहिती मिळण्यास फार विलंब लागला. खरोखर या विभागांतील माहिती जमविण्याचें श्रेय एक दोन उत्साही क्षत्रिय स्वयंसेवकांस दिलें पाहिजे.

### चौकशीची पद्धत

क्षत्रियांची चौकशी जवळजवळ ब्राम्हण समाजाच्या चौकशीप्रमाणेंच करण्यांत आली. दोघांसही एकाच तऱ्हेच्या प्रश्नपत्रिका देण्यांत आल्या होत्या. दोन्ही समाजांतील लोकांमध्यें कांहीं साशंक लोक माहिती देण्यास तयार झाले नाहींत. परंतु स्वयसेवकांनीं त्यांच्या शंकांचें योग्य समाधान केल्यावर बहुतेकांनीं जरूर ती माहिती पुरविली, ही आनंदाची गोष्ट आहे.

या विभागांतील सर्व कुटुंबाकडून माहिती मिळविण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण रिपोर्टाचे वेळीं २२८ कुटुंबाचीच माहिती उपलब्ध झाल्यानें तेवढ्या-वरच भागविणें प्राप्त आहे. तरीपण हीं कुटुंबें सर्व वर्गांतील असल्यामुळें त्यांच्या स्थितीवरून काढलेलीं अनुमानें समाजाच्या सर्व सामान्य स्थितींचीं निदर्शक अशीं आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या २२८ प्रश्नपत्रिकांपैकीं १२ प्रश्नपत्रिकांतील माहिती फारच त्रोटक अस-ल्यामुळें त्या वगळण्यात आल्या आहेत.

**कुटुंबांची विभागणी:**— या २१६ कुटुंबांची मिळून लोकसंख्या ९५७ होते. खालील कोष्टकात या लोकसंख्येची वयोमानाप्रमाणें आणि काम करणारे व बेकार इत्यादि माहितीप्रमाणें विभागणी केली आहे.

### कोष्टक 'अ'

| | एकुण | दर हजारीं |
|---|---|---|
| १४ वर्षाखालील मुलें | ३०२ | ३१५·६ |
| १४ ते २० वर्षाचे पुरुष | ६३ | ६६·९ |
| २० ते ४० ,, ,, | १८० | १८८·१ |
| ४० ते ६५ ,, ,, | १०५ | १०९·७ |
| ६५ वर्षावरील ,, | १२ | १२·५ |
| १४ ते २० वर्षाच्या स्त्रिया | ५३ | ५५·३ |
| २० ते ४० ,, ,, | १७३ | १८०·८ |
| ४० ते ६५ ,, ,, | ६१ | ६३·९ |
| ६५ वर्षावरील ,, | ७ | ७·२ |
| एकूण | ९५७ | १०००·० |
| काम करणारे पुरुष | २४५ | ३७३·५ |
| ,, करणाऱ्या स्त्रिया | १२ | १८·३ |
| ,, करणारे १८ वर्षाखालील मुलगे | १ | १·५ |
| ,, करणाऱ्या १६ ,, मुली | — | — |
| १८ वर्षावरील बेकार पुरुष | ७६ | ११५·८ |
| १६ ,, ,, स्त्रिया | २७३ | ४१६·२ |
| १८ वर्षाखालील ,, मुलगे | ३५ | ५३·४ |
| १६ ,, ,, स्त्रिया | १४ | २१·३ |
| एकूण | ६५६ | १०००·० |
| एकूण लोकसंख्या | ९५७ | |
| कुटुंबाचीं संख्या | २१६ | |

| | |
|---|---|
| पांच वर्षांखालील मुलें | १०७ |
| ५ ते १४ वर्षांमधील मुलें | १९५ |
| दर कुटुंबास ५ वर्षांखालील मुले | ·४९ |
| „ „ ५ ते १४ वयाची „ | ·९१ |
| एकूण | १·४१ |

**कुटुंबांचें घटकावयवः**—सरासरी क्षत्रिय कुटुंबांत खालीं लिहिल्याप्रमाणें माणसें आसतातः—

| कमविते | | | न कमविते |
|---|---|---|---|
| १·१३ | १८ | वर्षांवरील पुरुष | ·३७ |
| ·०६ | १६ | „ स्त्रिया | १·२६ |
| — | १८ | वर्षांखालील मुलगे | ·१६ |
| — | १६ | „ मुली | ·०७ |
| — | ५ | ते १४ वयाची मुले | ·९१ |
| — | ५ | वर्षांखालील „ | ·४९ |
| १·१९ | | | ३·२६ |
| | | घरांतील एकूण माणसें | ४·४५ |

अशा तऱ्हेनें एक कमविता पुरुष घरांतील २·७ न कमवित्या माणसांना पोसतो. या आंकड्यानें कुटुंबाच्या खऱ्या स्थितीची कल्पना येत नाहीं म्हणून खालील कोष्टकांत कुटुंबाची त्यांतील कमवित्यांच्या संख्येप्रमाणें व आश्रित मुलांच्या संख्येप्रमाणें विभागणी केली आहेः—

**कमवित्यांच्या संख्येप्रमाणें विभागणी**

| कुटुंबांतील कमवित्यांची संख्या | कुटुंबाची संख्या | शेंकडा |
|---|---|---|
| १ | १८२ | ८४.३ |
| २ | २८ | १२·९ |
| ३ | ४ | १·९ |
| ४ व जास्त | २ | ·९ |
| | २१६ | १००·० |

**आश्रित मुलांच्या संख्येवरुन कुटुंबाची विभागणी**

| १८ वर्षांखालील मुलगे व १६ वर्षांखालील मुली धरून सर्व आश्रित मुलें | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कुटुंबांची संख्या | ७५ | ५७ | ३६ | २८ | १३ | ६ | ० | ० | १ |
| शेंकडा | ३४·७ | २६·४ | १६·७ | १२·९ | ६·० | २·८ | ० | ० | „ |

शेंकडा ८४ कुटुंबें एकेका कमवित्यावर अवलंबून आहेत. दोन कमविते असलेलीं कुटुंबें फारच थोडी आहेत. आश्रित मुलांच्या संख्येबद्दल असें दिसून येते कीं, कुटुंबांतील मुलांच्या सरासरी संख्येपेक्षां कमी मुलें असलेलीं कुटुंबें शेंकडा साठावर आहेत व दोन मुलांपेक्षा जास्त मुलें असलेलीं कुटुंबें शेंकडा २२ टक्केच आहेत.

कुटुंबांतील कमवित्याच्या जबाबदारीवरून खालील कोष्टक काढले आहे.

## कमवित्यांची आश्रितांबद्दल जबाबदारी

| | २० वर्षावरील | | १८ वर्षावरील | |
|---|---|---|---|---|
| जबाबदारी | कमविते पुरुष | शेंकडा | कमवित्या स्त्रिया | शेंकडा |
| जबाबदारी नाहीं | ६ | २·९ | १ | ८·३ |
| तशः जबाबदारीः— | | | | |
| १ माणसाबद्दल | — | — | १ | ८·३ |
| २ ,, | ६ | २·९ | २ | १६·७ |
| ३ ,, | १० | ४·९ | २ | १६·७ |
| ४ किंवा जास्त | १० | ४·९ | २ | १६·७ |
| पूर्ण जबाबदारीः— | | | | |
| ० मुलें व १ माणसांबद्दल | ३५ | १७·१ | २ | १६·७ |
| ,, २ ,, | १४ | ६·८ | — | — |
| ,, ३ ,, | ७ | ३·४ | — | — |
| ,, चार किंवा जास्त ,, | ३ | १·५ | — | — |
| १ मुल व ० माणसाबद्दल | — | — | — | ,, |
| ,, १ ,, | २० | ९·८ | ,, | ,, |
| ,, २ ,, | १५ | ७·२५ | १ | ८·३ |
| ,, ३ ,, | ६ | ६·९ | ,, | ,, |
| ,, चार किंवा जास्त | ४ | २ | ,, | — |
| २ मुलें व ० माणसांबद्दल | ,, | ,, | ,, | — |
| ,, १ ,, | १४ | ६·८ | १ | ८·३ |
| ,, २ ,, | ८ | ३·९ | ,, | ,, |
| ,, ३ ,, | ४ | २·० | ,, | ,, |
| ,, चार किंवा जास्त ,, | २ | १·० | ,, | ,, |
| ३ मुलें व ० माणसावद्दल | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, १ ,, | १५ | ७·२५ | ,, | ,, |
| ,, २ ,, | ३ | ३·४ | ,, | ,, |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ~३ मुलेंमाणसांबद्दल | २ | १ | ,, | ,, |
| ,, चार किंवा जास्त ,, | २ | १ | ,, | ,, |
| चार किंवा जास्त मुलें व० माणसांबद्दल | ,, | ,, | ,, | ,, |
| ,, १ ,, | ५ | २.४ | ,, | ,, |
| ,, २ ,, | ४ | २ | ,, | ,, |
| ,, ३ ,, | १ | ५ | ,, | ,, |
| ,, चार किंवा जास्त ,, | ५ | २·४ | ,, | ,, |
| | २०५ | १००·० | १२ | १००·० |

**राहण्याची जागा:**—ब्राम्हणाप्रमाणेंच क्षत्रियानींहीं या बाबत पुरविलेली माहिती अपुरी व असमाधानकारक होती. या माहितीवरून नक्की अनुमानें काढता येत नसली तरी ढोबळ अनुमानें काढणें सोपे आहे. क्षत्रियातील शेंकडा ९० कुटुंबें जॉर्ज टाऊन व त्रिप्लिकेन या भागात राहातात. याचें कारण नक्की काढता आलें नाहीं तरी असें म्हणतां येईल कीं बहुतेक बऱ्याच क्षत्रियाचा धंदा शिंप्यांचा असून शिंप्याची दुकानें या भागात फार असल्यामुळें हे लोक दुकानाजवळच राहातात. जॉर्जटाउन व ट्रिप्लिकेन या मद्रास शहरांतिल भागात फार दाट वस्ती आहे हें वाचकास सांगितले पाहिजे असें नाहीं.

जमविलेल्या माहितीकडे पाहिलें असता असे दिसतें कीं, १४ कुटुंबें स्वतःच्या मालकीच्या घरांत राहातात. बाकीचीं भाड्याचे घरात राहातात. हीं कुटुंबें देत असलेल्या भाड्याचें वर्गीकरण खालील कोष्टकात केले आहे:—

| दरमहा भाडें रु. | ०-५ | ६-१० | ११-१५ | १६-२० | विसावर | इतर (माहीत नाहीं) |
|---|---|---|---|---|---|---|
| कुटुंबांची संख्या | ४९ | ७९ | १८ | ४ | १ | ६३ |
| शेंकडा | २३ | ३७ | ८ | १ | ०·५ | २९·५ |

पुढें कांहीं वर्षांनीं अशीच चौकशी झाली तर तुलना करावयास बरें म्हणून मध्यम, चतुर्थ व दशम भाडीं वरील माहितीवरून काढलीं आहेत ती खालीं दिली आहेत

| | | | |
|---|---|---|---|
| १ दशम | रु. ५ | ३ मध्यम | रु. ७-८-० |
| २ चतुर्थ | रु. ५ | ४ चतुर्थ | रु. ८-० ० |
| | | ५ दशम | रु. १४-०-० |

**उत्पन्न:**—उत्पन्नाबद्दल माहिती मिळणें फार अवघड होतें. कोणी हिशेबच ठेवीत नाहींत. कोणाला सारखा उद्योगच नाहीं. कोणाला कमजास्त मजुरीवर अनियमित काम मिळतें या कारणामुळें दरमहा उत्पन्न ठरविणें कठीण होते, कांहीं लोकांनीं आपलें उत्पन्न जास्त सांगितलें तर कांहींनीं कमी दाखविलें. तरी पण खरें उत्पन्न काय आहे हें काढण्याचा शक्य तितका प्रयत्न केल्यामुळें सरासरी फार चुकली नाहीं असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. कुटुंबांचें उत्पन्न दाखविताना त्यातील सर्वांचें



महाराष्ट्र एज्युकेशन फंडाचे मद्रास येथील सभासद



इचलकरंजीचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांचें स्वागत ( १९३६ )

उत्पन्न ( पेन्शनमुद्धां ) एकच धरलें आहे. उत्पन्नावरून कुटुंबांची विभागणी खालील कोष्टक दाखविते.

| द. उ उत्पन्न | माहित नाहीं | १–१० | ११–१५ | १६–२० | २१–२५ | २६–६० |
|---|---|---|---|---|---|---|
| कुटुंबाची संख्या | २३ | २ | १० | ३३ | २९ | ३४ |
| शेंकडा | १०·१ | ०·९ | ४·४ | १४·४ | १२·७ | १४·९ |

| | ३१-३५ | ३६-४० | ४१ ४५ | ४६ ५० | ५१ १०० | १०१ १५० | १५१ वर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| कुटुंबाची संख्या | १९ | २० | ६ | १५ | ३१ | ४ | २ |
| शेकडा | ८·३ | ८·८ | २·६ | ६·६ | १३·६ | १·८ | ·९ |

**गरिबी.**—गरिबीचा सर्वत्र लागू पडणारा अशी व्याख्या नाहीं. पण अर्थशास्त्रदृष्ट्या जरूर असलेलें अन्न, कपडा व राहाण्याची जागा याना लागणारा खर्च हे ' प्रमाण ' धरल्यास त्या प्रमाणापेक्षा ज्याचें उत्पन्न कमी आहे त्यास गरीब म्हणतां येईल.

सर रॉबर्ट मॅक्करिसन यानीं आपल्या ' अन्न ' या पुस्तकांत दिलेल्या जरूरीच्या आहारांत क्षत्रियाच्या परिस्थितीप्रमाणें थोडा फेरफार करून आहाराचें एक ' प्रमाण ' ठरविण्यांत आलें आहे. अगदीं किमान अशी प्रोटीन, चरबी, व कार्बोहायड्रेट्स त्या आहारात आहे . हा आहार स्वस्त आहे. त्याचें पृथक्करण खालीलप्रमाणें करतां येईल:-

| अन्न | रोज औंस | ग्रॅम प्रोटीन | चरबी | कार्बोहायड्रेटस | कॅलोरी |
|---|---|---|---|---|---|
| आटा | ६ | २३·४ | ३·२४ | १२२·१ | ६११ |
| तांदूळ | १२ | २७·६ | १·०२ | २६७·६ | ११९० |
| मांस व मासे | २ | ११·९४ | ३·९६ | ० | १६८ |
| तेल | १ | ० | २८ | ० | २५२ |
| तूप | १·५ | ० | ३४·६ | ० | ३१२ |
| मुळे व भाजीपाला | ८ | ४·४ | ·३६ | ३१·८ | १४८ |
| कच्चा पाला | ८ | ३·१ | ·२४ | १०·२ | ५६ |
| डाळ | १ | ६·५ | ·९९ | १६·२ | १०० |
| दूध | ७ | ६·२ | ६·८ | ९·० | १२० |
| एकूण | ४६·५ | ८३·१४ | ७९ २१ | ४५६·९ | २९५७ |
| वाया जाईल त्याकरितां १० टक्के वजा | ४·६ | ८·३१ | ७·९२ | ४५·६ | २९५ |
| | ४१९ | ७४·८३ | ७१·२९ | ४११·३ | २६६२ |

सध्यांचे किरकोळ भाव धरले तर दररोज दर माणशीं या आहाराचा खर्च अंदाजी चार आणे होईल.

कपडालत्ता, लाकूडफाटा, दिवाबत्ती व इतर बाबतीवर होणारा खर्च ठरविणें फार अवघड होतें. जी कांहीं थोडी माहिती मिळाली तींत फार तफावत दिसल्यामुळें दहाबारा सर्व साधारण कुटुंबाबद्दल विशेष माहिती जमाविण्यांत आली. त्यावरून असें दिसतें कीं, भाडें सोडून इतर आवश्यक खर्च अन्नखर्चाच्या शेंकडा २५ टक्के इतके आहेत म्हणून अन्न, कपडा व इतर गरजा यासाठीं माणशी रोजीं पांच आणण्याची जरूर आहे असें ' प्रमाण ' धरलें आहे.

भाडे किती द्यावे लागते हें माहीत असल्यामुळें कुटुंबाच्या जरूरीच्या गरजा इतके उत्पन्न आहे कीं नाहीं हें ठरवितांना उत्पन्नातून भाडें वजा करून उरलेले उपन्न कुटुंबांतील माणसास पुरेसें आहे कीं नाहीं हें ठरविलें आहे. पहिल्या भागांत दर्शविल्याप्रमाणें स्त्रिया व मुलें या करिता गुणपदें वापरली आहेत. जरूर असलेले अन्न व इतर गरजाइतकें उत्पन्न आहे कीं नाहीं यावरून कुटुंबाची विभागणी खालील कोष्टकांत दाखविली आहे.

| आर्थिक स्थिति | कुटुंबांची संख्या | शेंकडा |
|---|---|---|
| प्रमाणापेक्षां खात्रीनें चांगली | ४६ | २२·५ |
| ,, बहुतेक ,, | ३२ | १५·७ |
| प्रमाणाइतकीच बरी | १४ | ६·९ |
| प्रमाणापेक्षा बहुतेक वाईट | २४ | ११·८ |
| ,, खात्रीनें ,, | ८८ | ४३·१ |
| | २०४ | १०० |

शेवटच्या तीन वर्गातील लोकांच्या संख्येची विभागणी खालील कोष्टकांत दिली आहेत.

| | प्रमाणापेक्षां खात्रीने वाईट लोकांची संख्या | शेंकडा | प्रमाणापेक्षां बहूतेक वाईट लोकांची संख्या | शेंकडा | प्रमाणापेक्षां इतकीच बरी लोकांची संख्या | शेंकडा |
|---|---|---|---|---|---|---|
| कमविते:- | | | | | | |
| १८ वर्षांवरील पुरुष | १०६ | ९४·६ | २८ | ९६·६ | १५ | १०० |
| १६ वर्षांवरील स्त्रिया | ५ | ४·५ | १ | ३·४ | – | – |
| मुले | १ | ·९ | – | – | – | – |
| एकूण | ११२ | १०० | २९ | १०० | १५ | १०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **आश्रित–** | | | | | | |
| १८ वर्षांवरील पुरुष | ४८ | १३·१ | ५ | ८·२ | ४ | ११·१ |
| १६ ,, स्त्रिया | १२० | ३२·७ | ३१ | ५०·८ | १५ | ४१·७ |
| १८ वर्षांखालील मुलें | २६ | ७·० | २ | ३·३ | १ | २·८ |
| १६ ,, मुली | ८ | २·२ | २ | ३·३ | – | – |
| | १६५ | ४५·० | २१ | ३४·४ | १६ | ४४·४ |
| एकूण | ३६७ | १०० | ६१ | १०० | ३६ | १०० |
| **कमविते व आश्रित मिळून-** | | | | | | |
| १८ वर्षांवरील पुरुष | १५४ | ३१·२ | ३३ | ३६·७ | १९ | ३७·२ |
| १६ ,, स्त्रिया | १२५ | २६·१ | ३२ | ३५·५ | १५ | २९·४ |
| १८,,खालील मुलगे | २७ | ५·६ | ७ | २·२ | १ | २·० |
| १६ ,, ,, मुली | ८ | १·७ | २ | २·२ | – | – |
| मुलें | १६५ | ३४·४ | २१ | २३·३ | १६ | ३१·४ |
| एकूण | ४७९ | १०० | ९० | १०० | ५१ | १०० |

मराठी क्षत्रिय कुटुंबातील फक्त ३८·२ टक्के लोकांची स्थिति प्रमाणापेक्षां चांगली आहे व जवळजवळ ६९ टक्के लोकांची स्थिति वाईट आहे.

**गरिबीचीं कारणें:**—गरीब कुटुंबांतील लोकाविषयींच्या आकड्याचा विचार केला असतां बेकार आश्रित, कमी उत्पन्न व मोठीं कुटुंबें हीं तीन गरिबीचीं मुख्य कारणें दिसतात. यांचें वर्गीकरण केल्यास:—

| | प्रमाणापेक्षां खालींनें वाईट कुटुंबें | प्रमाणापेक्षां बहुतेक वाईट कुटुंबें |
|---|---|---|
| बेकार आश्रित | १३ | — |
| कमी उत्पन्न | ४५ | २० |
| मोठे कुटुंब | ३० | ४ |
| | ८८ | २४ |

मोठी कुटुंबें म्हणून दर्शविलेल्या तीस कुटुंबांत ९८ आश्रित व ९१ मुलीं होती व चार कुटुंबांत १२ आश्रित व ९ मुले होतीं. आश्रितांची निष्कारण भरती तर उघड दिसतेच.

**शिक्षण व नोकरी:**–सर्व लोकांची कामधंद्याप्रमाणें विभागणी पुढील प्रमाणें होते.

सरकारी नोकर व इतर संस्थांत कारकून ६८; बिलकलेक्टर, चप्रासी, पहारेकरी इत्यादि नोकर ९७, वकील १; वैद्य २, शिंपी ४९, शिक्षक ६, बुक बाइन्डर

२; घड्याळजी १; सोनार १; व्यापारी १६; मोटार व एन्जिन ड्रायव्हर, पाथरवट एन्ग्रेव्हर इत्यादि २७, काम्पाउन्डर १, पेन्शनर ९, इतर २२ एकूण २९८.

सरकारी व इतर नोकरींत शेकडा ५० टक्के लोक आहेत असे वरील गणनेवरून दिसून येईल. शेकडा वीस लोक शिंप्याचा धंदा करतात. या समाजांतून डॉक्टर, वकील, प्रोफेसर या सारख्या धंद्यांत फार थोडे लोक गेले आहेत असे दिसते.

शिक्षणांत मराठा क्षत्रिय समाज मागासलेला आहे. वरील गणनेंतील लोकांचें शिक्षण कितपत झालें आहे हें खालीं दिले आहे.

| | |
|---|---|
| शिक्षण कमी | २०९ |
| ( आयुर्वेदिक ) वैद्यकीय शिक्षण | २ |
| कायदा | १ |
| मॅट्रिक | १४ |
| इन्टरमिजिएट | १ |
| माहिती नाहीं | ३१ |
| | २९८ |

कमावित्या लोकांत मॅट्रिकच्या पुढे शिकलेल्या लोकांचें प्रमाण सहा टक्क्यांवर नाही या समाजास सर्वसाधारण व औद्योगिक शिक्षण याची फार जरूरी आहे.

**बेकारी**:-सुशिक्षित बेकार या समाजात नाहींत असें म्हटलें तरी चालेल, पण शेंकडा तेवीस टक्के लोक बेकार आहेत. शिक्षणाचा प्रसार व काम असलें तर त्याची माहिती जमवून बेकारांना कळविण्यासाठी कचेरी उघडणें या दोन उपायानीं या समाजांतील बेकारीचा प्रश्न सुटण्यासारखा आहे.

**सूचना**:— समाजाची स्थिति सुधारण्याबद्दलच्या प्रश्नाला या विभागांतील प्रश्नपत्रिकातून फारच थोडी उत्तरें आलीं. त्यामध्यें आपल्या समाजातील लोकांनीं आपल्याच शिंप्याना आश्रय देणें व धंद्याची चागली संघटना करणें ही एक चांगली सूचना आली आहे.

अखेरीस या चौकशीचे कामाकरितां ज्या सर्व स्वयंसेवकानीं तन-मन-धनें मदत केलीं त्याचे आभार मानून आह्मी हा लेख संपवितो.

# दक्षिण हिंदुस्थानांतील प्रसिद्ध महाराष्ट्रीयांची चरित्रें

## माजी

## राजा सर टी. माधवराव

अलिकडील काळामध्यें ज्या थोर पुरुषानीं दक्षिणेंतील महाराष्ट्रीयाचे नांव अजरामर केलें आहे त्याचा गौरवपूर्ण उल्लेख मराठा एज्युकेशन फंडाच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं केल्यावांचून राहवत नाहीं. अशा थोर पुरुषामध्यें राजा सर टी. माधवराव हे अग्रेसरच होत.

माधवराव याचा जन्म कुम्भकोणम् येथें सन १८२८ मध्यें झाला. त्याच्या घराण्यातून एकामागून एक असे अनेक पुरुष त्रावणकोरच्या दिवाणपदीं विराजमान झाले होते. त्याचे आजे गुंडोपत, हे हिंदी संस्थानें व कंपनी सरकार या दोहोकडेहि मोठ्या हुद्याच्या कामावर अधिकारी होते. गुंडोपताना व्यंकटराव व रंगराव असे दोन चिरंजीव होते. ते दोघेहि प्रथम कांहीं दिवस बोर्ड ऑफ रेव्हिन्यू ऑफिसांत कामावर होते व नंतर त्रावणकोर संस्थानच्या नोकरींत शिरले व शेवटीं दोघेहि आपल्या कर्तबगारीच्या जोरावर त्रावणकोरचे दिवाण या बहुमानाच्या व सर्वांत जास्त अधिकाराच्या जागेपर्यंत बढती होऊन गेले.

माधवराव हे रंगरावाचे सगळ्यात कनिष्ठ चिरंजीव होते. माधवरावाच्या अकराव्या वर्षी त्याचे वडील वारले व तदनंतर एका वर्षांत त्यांची मातोश्रीहि वारली. त्यानंतर आपले थोरले बंधु वासुदेवराव याच्या हाताखालीं मद्रासला माधवरावाचे शिक्षण पुरें झालें. त्या वेळीं एरी बर्टन पॉवेल नावाच्या इंग्रज हेडमास्तरच्या नेतृत्वाखालीं नुकतेंच हायस्कूल उघडण्यात आलें होतें. सन १८४६ मध्यें सहा वर्षांचा अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर माधवराव शेवटच्या परीक्षेंत प्रथम श्रेणींत उत्तीर्ण झाले व नंतर त्यांनीं शाळा सोडली.

शाळा सोडल्यानंतर माधवरावानीं अकाउन्टन्ट जनरलचे ऑफिसात नोकरी धरली व तेथून दोन वर्षांत त्याना त्रावणकोरच्या राजपुत्राचे शिक्षक म्हणून जबाबदारीचें काम मिळालें. त्याच्या या कामाची फार प्रशंसा होऊन डेप्युटी पेशकार म्हणून बढतीची जागा त्याना मिळाली. जमाबंदी खात्यात आपले गुण दाखविण्याची त्याना या वेळीं चांगली संधी मिळाली व त्यांनीं आपल्या खात्याची व्यवस्था फार चांगली ठेवली. त्या वेळीं ब्रिटिश सरकारची वार्षिक खंडणी थकली होती व संस्थानातील नोकर लोकांचे पगारहि बरेच महिने थकले होते. करवसुली बरोबर होत नव्हती व लाचलुचपतीचें प्रमाणहि फार वाढलें होतें. माधवरावानी मोठ्या हुषारीनें संस्थानचें उत्पन्न वाढविलें. या वेळीं त्रावणकोर दरबारविरुद्ध गव्हर्नर जनरलकडे बऱ्याच तक्रारी गेल्या होत्या व संस्थान खालसा होण्यापर्यंत पाळी आली होती. माधवरावांच्या कर्तबगारीकडे व हुषारीकडे पाहून रेसिडेंट जनरल कल्न यानें १८५८ मध्यें माधवरावांना त्रावणकोरचे दिवाणपद देवविलें.

'माधवरावाची दिवाणगिरी अपेक्षेपेक्षां जास्त यशस्वी झाली. त्यांच्या कारकीर्दीत सर्व

संस्थानात व्यवस्था होत गेली आणि त्यामुळें राज्यकारभार पूर्वीपेक्षा सुरळीतपणें चालू लागला. सर्व लोकाना न्याय मिळू लागला व गुन्हेगारांना कडक शासनही होऊं लागलें. चोर व दरवडेखोर याना पकडण्यात आलें व लोकाना आपले व्यवसाय सुरक्षिततेनें करता येऊ लागले त्यामुळे माधवरावाची कारकीर्द यशस्वी झाली.

सन १८६० मध्यें त्रावणकोर महाराज मार्तंड वर्मा वारले महाराज वळयम तिरुनाळ हे गादीवर आले. त्याचे शिक्षण माधवरावांचे हाताखालींच झाले असल्यामुळे ते माधवरावाचें तत्राने वागत. माधवरावाना अर्थशास्त्र फार चांगलेंच आवगत होतें. त्यानीं मिरे व तबाखुवगैरे संस्थानचा मक्ता काढून टाकला व त्यामुळे सरकारी तिजोरींत आलेली पैशाची तूट त्या मालावर कर बसवून त्यानीं काढून टाकली इतकेच नव्हे त्यामुळे संस्थानची थकलेली खडणी देता येउन त्याना काहीं कर्ज निवारण करता आलें. संस्थानची सांपत्तिक स्थिती सुधारण्याव्यतिरिक्त माधवरावांनीं राज्यकारभारात इतर बऱ्याच सुधारणा केल्या. जन्जनाड जिल्ह्यातील सारा त्यानीं कमी केला. संस्थानात हायकोर्ट व उच्च शिक्षणाकरिता कॉलेज काढले तसेच वैद्यक व आरोग्यरक्षण या खात्यात त्यानीं बऱ्याच सुधारणा केल्या. १८६६ साली त्रावणकोरच्या अधिपतिना 'महाराज' हा किताब मिळाला व त्याच वर्षी माधवरावाना ' सर' ही पदवी देण्यात आली.

माधवरावाच्या कारकीर्दींत 'उत्तरीय' प्रकरणाबद्दल फार खळबळ उडाली होती. ह्या प्रकरणाची थोडक्यात हकीकत पुढीलप्रमाणे आहे. राणीच्या जाहीरनाम्यावरून शाणार जातीच्या नुकत्याच बाटलेल्या स्त्रिया वरच्या जातीप्रमाणे ' उत्तरी ' वापरण्याचा हक्क सांगू लागल्या. नायर व इतर वरच्या जातींच्या लोकांनीं त्यास विरोध केला. त्याचे म्हणणे असे होते की, राणीच्या जाहीरनाम्यात पूर्वकालीन रूढी व चाली चालू ठेवण्याचें वचन दिले आहे व त्याप्रमाणे या स्त्रियाना उत्तरीय वापरता येत नाहीं. या दोन्ही वादातून माधवरावांनीं एक उत्तम मार्ग शोधून काढला. तो असा कीं, सीरियन ख्रिश्चन लोकाप्रमाणें या शाणार स्त्रियांनीं जाकीट वापरण्यास हरकत नाहीं व तसें एक सर्क्युलरही त्यानीं काढिलें. परंतु मिशनऱ्याच्या चिथावणीवरून शाणार स्त्रिया आपला हट्ट सोडीनात. परंतु शेवटीं दिवाणानीं, आपण सुचविलेला मार्ग सर्वांत सरळपणाचा आहे अशी सरकारची खात्री करून दिली.

जॉन लिडेल नावाच्या इंग्रज गृहस्थाच्या खटल्याबाबत मद्रास सरकारशीं माधवरावाचा खटका उडाला. मद्रासच्या ॲडव्होकेट-जनरलचें म्हणणें असे कीं त्रावणकोरसारख्या संस्थानास युरोपियन गृहस्थाची चौकशी करण्याचा हक्कच नाहीं व त्याला संस्थानी न्यायाधिशानें केलेली शिक्षा रद्द व्हावी. पुढें बराच पत्रव्यवहार होऊन शेवटीं ॲडव्होकेट जनरलनें संस्थानचें म्हणणें अखेर कबूल केलें.

सर टी. माधवराव यांनीं आपल्या १४ वर्षाच्या कारकीर्दींत त्रावणकोर संस्थान नमुनेदार संस्थान करण्यासाठीं अविश्रांत परिश्रम केले. अजून त्यांची आठवण अद्यापि जनतेला राहिली आहे. याचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे त्रिवेंद्रम येथें सार्वजनिक वर्गणीतून उभारलेला त्याचा पुतळा हें आहे.

वयाचे पंचेचाळीसाव्या वर्षी माधवरावांनीं त्रावणकोरची दिवाणगिरी सोडली. त्या वेळीं व्हॉइसरायांच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलवर एका सभासदाची जागा त्यांना देऊं केली होती. पण उत्तर हिंदुस्थानातील हवा आपणास मानवणार नाहीं या भीतीनें त्यांनीं ती नाकारली. तसेंच जकातीसंबंधीं साक्ष देण्याकरितां त्यांना विलायतेस पाचारण करण्यांत आलें होतें. पण तेंहि निमंत्रण त्यांनीं पत्करिलें नाहीं. १८७३ सालीं हिंदुस्थान सरकारनें इंदूरच्या महाराजांना दिवाण-



राजा सर टी. माधवराव, के. सी. एस. आय्.
त्रावणकोर, इंदूर व बडोदे संस्थानाचे दिवाण.



दि. ब. आर. रघुनाथ राव, सी. एस्. आय्.
इंदूरचे दिवाण.



राय राया राय वेंकटराव
त्रावणकोरचे दिवाण.



टी. राम राव
त्रावणकोरचे दिवाण.



व्ही. पी. माधव राव, सी. आय् ई.
त्रावणकोर, म्हैसूर व बडोदे संस्थानाचे दिवाण



दि. ब सी. कृष्णस्वामी राव
ॲक्टिंग जज्ज, मद्रास हायकोर्ट.



रायबहादुर टी. गोपाळराव, बी. ए.,
प्रिन्सिपॉल, गव्हर्मेंट कॉलेज, कुंभकोणम्.



सी. रामचंद्र राव साहेब, बी. एल्.,
ॲक्टिंग प्रिन्सिपॉल, लॉ कॉलेज, मद्रास.

पदासाठीं माधवरावांचें नांव सुचविलें व नंतर त्यांनीं इंदूरची दिवाणगिरी दोन वर्षे यशस्वी रीतीनें केली.

इतक्यांत बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यास पदच्युत करण्यांत आलें व सर टी. माधवरावांना बडोद्याचे दिवाण व रिजंट म्हणून नेमण्यात आलें. बडोदें संस्थानांत त्या वेळीं बरीच अदाधुंदी माजून राहिली होती. माधवरावांनीं आपल्या एतद्देशीय संस्थानांतील कामाच्या पूर्वानुभवाने व मोठ्या चातुर्यानें थोड्याच वेळात संस्थानांत शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित केली. सर टी. माधवरावांच्या या अलौकिक चातुर्याबद्दल त्यांना व्हिक्टोरिया राणीनें हिंदुस्थानाचे सम्राज्ञी पद धारण केले त्या वेळीं म्हणजे १ जानेवारी १८७७ रोजीं 'राजा' हा बहुमानाचा किताब मिळाला. बडोद्यांत सात वर्षे कारभार करून राजा सर टी. माधवराव हे पुढें मद्रासला जाऊन कायमचें राहिले.

मद्रासला रहात असतांना त्यांनीं आपला वेळ मराठी वाङ्मयाचा अभ्यास करण्यांत घालविला. त्यांना मराठी काव्याची अभिरुची होती. त्यांनीं थोड्या मराठी कविता लिहिल्या आहेत व त्या अजून कांहीं लोकांना आवडतात. राजा सर टी. माधवराव यांची मतें खऱ्या राष्ट्रीयत्वास पोषक अशीं होती. त्यामुळें हिंदी राष्ट्रीय सभेच्या पहिल्या पुरस्कर्त्यांशीं त्यांचे नांव कायमचे निगडित झालें आहे. एकदा ते हिंदी राष्ट्रसभेच्या स्वागत मंडळाचे अध्यक्ष झाले होते. आपल्या वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी ( १८९१ सालीं ) ते मद्रास येथें वैकुंठवासी झाले.

हिंदुस्थानांतील मोठ्या मुत्सद्यांमध्ये माधवरावांची गणना होते. ते स्वभावानें अतिशय फार सरळ व साधे होते. आपल्या इष्टमित्रांना मदत करण्यास ते नेहमीं पुढें असत. "आपण जें कार्य करावे ते करण्यासाठीं आपण आपली सर्व शक्ति खर्च करावी असें त्यांचे ब्रीदवाक्य होतें" खरोखर हीच त्यांच्या यशाची खरी गुरुकिल्ली आहे. सध्याच्या पिढीमध्यें हें ब्रीदवाक्य आपल्या डोळ्यासमोर ठेवून राजे सर टी. माधवराव यांच्यासारखे थोर पुरुष आपल्या समाजांत जास्त प्रमाणात निघतील अशी आशा करून मी हा परिचयात्मक लेख संपवितो.

---

# दि. ब. आर. रघुनाथराव

त्रावणकोर संस्थानचे दिवाणपद दोन वेळा भूषविणारे महाराष्ट्रीय ब्राह्मण "राया राय राय" आर. व्यंकटराव यांचे चिरंजीव दि. ब. रघुनाथराव यांची आठवण असलेले अद्यापि बरेच लोक आहेत. आपल्या वृद्धापकाळीं सामाजिक सुधारणा विशेषतः विधवाविवाहाचे बाबतींत त्यांनीं केलेली सामाजिक चळवळ अजून लोकांचे स्मरणांत असेलच. यामुळें जरी ते अल्प काल थोडे अप्रिय झाले होते तरी त्यांच्या हिंदू धर्मशास्त्राच्या दांडग्या अभ्यासाबद्दल व सचोटीबद्दल प्रत्येकजण त्यांची प्रशंसा करीत असे.

रघुनाथराव हे राजा सर टी. माधवराव यांचे चुलत बंधु होत. रघुनाथरावांचे वडील 'राय रायां राय' व्यंकटराव हे कांहीं दिवस त्रावणकोरचे दिवाण होते. व नंतर म्हैसूर संस्थानांत सर मार्क कबन यांचे हाताखालीं रेव्हिन्यू कमिशनर होते. रघुनाथरावांचा जन्म कुम्भकोणम् येथें सन १८३१ मध्यें झाला. व त्यांचे शिक्षण प्रथम बंगलूरच्या किल्ल्यांतील शाळेंत झालें. १८४५ सालीं ते मद्रासच्या सरकारी हायस्कुलांत जाऊं लागले, पण शेवटच्या सर्टिफिकेटची परीक्षा देण्यापूर्वींच ती शाळा सोडली. त्यांनीं शाळा सोडल्यावर चार वर्षे ते वडिलांच्या जमीन-जुमल्याची व्यवस्था पहात होते व त्या वेळीं त्यांनीं तेथील जमाबंदी खात्याच्या कामाची

माहिती मिळविली. नतर १८५६ साली ते वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाले. पण वकिली न करता त्यानीं कलेक्टर कचेरींत नौकरी धरली. तेथून ते सिव्हिल कोर्टाचे शिरस्तेदार व त्यानतर डेप्युटी कलेक्टर अशा हुद्यापर्यंत वर चढले नतर लॅड ॲक्विझिशनच्या स्पेशल कामावर त्याची नेमणूक झाली. तुगभद्रेच्या योजनेचे काम पुरे झाल्यावर सर चार्ल्स ट्रेव्हेलीन याच्या मागण्यावरून त्याची बदली प्रथम त्रिचनापल्ली व नतर कोइमतूर जिल्ह्यांत झाली व अखेरीस मद्रास येथे टाऊन पोलीस मॅजिस्ट्रेट व जे पी म्हणून त्याची नेमणूक करण्यात आली १८७३ साली ते पुण्यास आले असताना त्याची व इदूरचे महाराज तुकोजीराव होळकर याची सहज गाठ पडली व त्या भेटीनतर दोन वर्षात त्याना इदूर सस्थानकडून स्पेशल सेटलमेंट ऑफिसची जागा देण्यात आली व नतर थोड्याच दिवसात त्यांना तेथेच दिवाण करण्यात आले. रघुनाथरावाचे या वेळचें दिवाण-गिरीचे काम त्या वेळीं जरा नाजूक व भानगडीचे होते. कारण इदूरचे महाराजा व हिंदुस्थान सरकार याचे परस्पर सबध यावेळीं सलोख्याचे नव्हते. आपल्या निग्रही स्वभावामुळे रघुनाथराव इदूरचे दिवाण म्हणून फार दिवस राहू शकले नाहीत व त्याना मद्रासेस परत डेप्युटी कलेक्टर म्हणून जावे लागले. १८८८ मध्ये त्यानीं सरकारी नौकरी सोडली व उरलेले आयुष्य वर्तमान-पत्रद्वारा सामाजिक, राजकीय व अर्थशास्त्रीय विषयावरील लेख लिहिण्यात घालविलें

दि ब रघुनाथराव हे आपल्या उतार वयातहि पूर्वीप्रमाणेच उद्योगी होते. ते गोरगरि-बास नेहमीं सहाय्य करीत, शेती सुधारणाकडे त्याचे फार लक्ष होते बऱ्याच कृषि विषयक सस्थाचे ते अध्यक्ष होते.

त्याची सामाजिक व राजकीय मतें अत्यत उदार होतीं राजकीय बाबतींत त्याचे धोरण संपूर्ण राष्ट्रीय वृत्तीचे होत ते हिंदी राष्ट्रीय सभेच्या सस्थापकापैकीं एक होते राजकारणात ते विशेष प्रामुख्याने भाग घेत वयाच्या ८० व्या वर्षी देखील त्यानीं लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद या नात्याने आपल्या देशाची स्थिति सुधारण्याबाबत फार चागली कामगिरी बजावली आहे. 'सी. एस आय' ही पदवी पुढे सरकारने त्याना उत्तम कामाबद्दल अर्पण केली.

ता. ३ मे १९१२ रोजीं ते कालवश झाले त्यानीं आपले सर्व आयुष्य सार्वजनिक कार्याकरिता अप्रतिहतपणे काम करण्यात चालविले त्याचा स्वभाव जरी निग्रही व निस्पृह होता, तरी ममाने ते फार उदार होते.

दि. ब रघुनाथराव याचे आयुष्य मद्रास इलाख्यातील सार्वजनिक कार्याच्या अथाग समुद्रात फिरणाऱ्या कार्यकर्त्यांना दीपगृहाप्रमाणे झाले आहे ह्यात शका नाहीं.

---

## राय राया राय आर. व्यंकटराव

राय राया राय व्यकटराव हे दिवाणबहादूर आर रघुनाथराव याचे वडील होते. त्याचा जन्म कुभकोणम् येथें झाला. याशिवाय त्याच्या बालपणची इतर माहिती मिळत नाहीं.

व्यकटराव हे १८२० ते १८२२ पर्यंत त्रावणकोरचे दिवाण व पेशकार होते. त्या जागेवरून त्याची बढती होऊन १८२२ साली ते त्रावणकोरचे दिवाण झाले चातुर्य, सचोटी व सरळ स्वभाव या त्याच्या गुणाची साक्ष पटवणारा मद्रास सरकार व त्रावणकोरचे रेसिडेन्ट यामधील पत्रव्यवहार उपलब्ध आहे तसेच तत्कालीन परिस्थितींत ते १० वर्षे त्रावणकोरचे दिवाण होते ही गोष्टही त्याच्या लायकीचा एक पुरावा आहे. जमाबदी खात्याच्या कामात ते




PLAN

महाराष्ट्रनिवास, मद्रास



FRONT ELEVATION

**'महाराष्ट्र निवास'** मद्रास

( समोरून दिसणाऱ्या भागाचे दृश्य )



**टी. रामचंद्रराव, बी. ए.**

एलेमबेडूचे जमीनदार व निमंत्रक—रौप्यमहोत्सव कमिटी.



**बी. आर. धोंडूराव, बी. ए., मद्रास,**

सभासद, रौप्यमहोत्सव कमिटी



मराठा एज्युकेशन फंडाची रौप्यमहोत्सव कमेटी व स्वयंसेवक, १९३७

विशेष तरबेज असून त्याच्या कारकीर्दीत संस्थानची निरनिराळी खाती नियमितपणे व टापटिपीने चालविली जात होती

त्रावणकोराहून व्यंकटराव हे म्हैसूर संस्थानांत हेड शिरस्तेदार म्हणून गेले व त्यांना कमिशनरचे एतद्देशीय मदतनीस ( नेटिव्ह ॲसिस्टंट ) हा हुद्दा देण्यात आला. त्या वेळचे कमिशनर मॉरिसन साहेब यास म्हैसूर संस्थान, तेथील लोक व करपद्धति यावर रिपोर्ट लिहिण्यास व्यंकटरावाची फार मदत झाली. कर्नल मॉरिसन व त्यानंतरचे कमिशनर यांची त्यांच्यावर इतकी मर्जी असे की, रजा घेतल्यावर कुम्भकोणमला परत जाताना व्यंकटरावाबरोबर संरक्षणाकरिता फौजेचे शिपाई धाडण्यात आले इतकेच नव्हे तर वाटेवरील जिल्हाधिकाऱ्यांना प्रवासात व्यंकटरावास जरूर ती मदत करण्याचे हुकूम सोडण्यात आले होते. म्हैसुरातील उत्तम कामाबद्दल हिंदुस्थान सरकारने त्यास १८३८ साली 'राय राया राव' हा किताब दिला.

१८३८ साली त्यांचे बंधू रंगराव यांचे जागी त्रावणकोरास पुनः दिवाण म्हणून व्यंकटरावाची नेमणूक झाली. पण दोन वर्षे दिवाणगिरीचे काम करून ते सेवानिवृत्त झाले पुढे लवकरच म्हणजे १८४३ साली ते कालवश झाले.

त्रावणकोरास व्यंकटरावाचे नाव त्रिवेन्द्रम व कोचिन यामध्ये व्यापारासाठी त्यांनी बांधलेल्या कालव्यामुळे अजूनसुद्धा प्रसिद्ध आहे हे त्यांचे अपुरे राहिलेले काम त्यांचे पुतणे सर टी. माधवराव यांनी वरकाले येथे बोगदा खणून पुरे केले.

---

## दिवाण टी. रामराव

दिवाणगिरीसारख्या कामास सरळ व निश्चयी मनुष्य बुद्धिमान, चतूर व अनुभवी व्यक्तीपेक्षा कधीकधी जास्त लायक ठरतो असे म्हणतात अशा प्रकारचे दिवाण टी रामराव हे होते.

रामरावाचा जन्म त्रिवेन्द्रम येथे जून १८३० मध्ये झाला त्यांचे वडील सखारामराव हे अलेप्पी येथे डिस्ट्रिक्ट जज्ज होते तेथे ते आपल्या सचोटी व बाणेदारपणा या गुणाबद्दल प्रसिद्ध होते त्याकाळी बहुधा दिसून न येणारे हे गुण त्यांच्या मुलामध्ये उतरले होते ज्यांचे चुलतबंधु सर टी माधवराव यांचे रामरावाविषयी फार चांगले मत होते. त्यामुळे त्यांनी पुढे रामरावासच आपल्या विश्वासात घेऊन मदतनीस म्हणून नेमले होते

रामरावाचे शिक्षण प्रथम महाराजा फ्री स्कूल मध्ये झाले. व नंतर त्यांनी नागरकोइल येथील लंडन मिशनरी सोसायटीच्या शाळेत थोडेसे इंग्रजी शिक्षण घेतले. पुढे ते १८५१ साली त्रावणकोर संस्थानच्या नोकरीत कारकून म्हणून प्रथम काम करू लागले. इंग्रजीचे मल्याळम् भाषांतर करण्याची त्यांची हातोटी पाहून कालिकत येथील डिस्ट्रिक्ट जज्जांनी त्यास 'भाषांतरकार' म्हणून कालिकत कोर्टात नेमले इंग्रजी राज्यांत एक वर्ष नोकरी करून पुनः ते त्रावणकोर संस्थानात तहसीलदार म्हणून कामावर लागले १८५७ साली पोलीस शिरस्तेदार म्हणून त्यांची बढती होऊन त्यांनी शाणार बंडात चांगले नाव कमाविले. गुन्हेगारास पकडण्याचे कामी त्यांची कार्यतत्परता व धैर्य हे गुण चांगले उपयोगी पडले. या कामात ते कोणाचीहि दयामाया करीत नसत. काही आणिबाणीच्या प्रसंगी दुसरा कोणी भाबावूनच जाता. त्यांच्या वरिष्ठांचा विश्वास त्यांचेवर बसून त्यांच्या या वेळच्या धाडसी कृत्याची सर्वत्र प्रशंसाच झाली.

पुढे प्रथम डेप्युटी पेशकार व नंतर दिवाण पेशकार या जागावर त्यांची बढती झाली. या-

कामात सचोटीची व चातुर्यामुळे त्याची फार ख्याती झाली. १८८५ साली त्याना मुख्य दिवाण पेशकार नेमण्यात आले व एक वर्षात त्याना दिवाणपदहि मिळाले.

रामरावाना दिवाणगिरी मिळाली म्हणून राजा व प्रजा या दोघासही आनद झाला. त्याच्या पूर्वानुभावावरून कारभारात काय सुधारणा केल्या पाहिजेत हें त्यांस पूर्ण अवगत होते. व या सुधारणा करण्यात त्याचा बराच काल गेला. त्याच्या दिवाणगिरीतील पहिले मोठे काम म्हणजे महाराणी व्हिक्टोरिया याचा सुवर्ण-महोत्सव हिंदुपद्धतीला साजेसा असा साजरा करणें हें होय त्याचे प्रजेच्या हिताचे दुसरे एक मोठे कार्य म्हणजे सस्थानच्या कायदेमडळाची स्थापना करणे हें होय. त्या कायदेमडळात जास्तीत जास्त ७ सभासद असावयाचे होते त्यापैकीं निदान दोनतरी बिन अधिकारी असावयाचे होते व कायदेमडळाचे अध्यक्ष दिवाण व्हावेत असे ठरले होते. कालानुसार हे कायदेमडळ आज वाढले आहे व त्यास पूर्वीपेक्षा अधिक अधिकार देण्यांत आले आहेत.

जमीन मोजणी व सारा ठरविणे, धारावसुलीच्या खात्याची व्यवस्था, सुपीक जमिनींचे समुद्राच्या खारट पाण्यापासून सरक्षण करण्यासाठीं बाध घालणे ड्रेनेजची कामे, देवधाम व महसूल याची फारकत, न्याय व शिक्षण या संबधी सुधारणा हीं कामे टी रामरावानी आपल्या दिवाणगिरींत प्रामुख्यानें केली विरुथिकार नावाच्या काहीं लोकाना ठरलेल्या उत्सवप्रसगी भाजीपाला कमी दराने देण्याच्या अटीवर जमिनी देत असत व त्यामुळे या शेतकऱ्यास फार त्रास होत असे हा जुलूमी प्रकार टी रामरावानीं बद केला, हे एक त्याच्या गरिबाविषयींच्या कळकळीचे एक उत्तम उदाहरण आहे

त्रावणकोर सस्थानच्या नोकऱ्या त्रावणकोर सस्थानातील प्रजेलाच द्याव्यात म्हणून चळवळ सुरू झाली व काहीं युरोपियन लोकाच्या चिथावणीने या चळवळीस फारच जोर मिळाला मद्रासचे त्यावेळचे गव्हर्नर लॉर्ड कॉनेमारा स्वतः त्रावणकोरास गेले. व चौकशी केल्यावर रामरावाचा कारभार उत्तम चालला आहे अशी त्याची खात्री झाली. नतर १८९१ साली सार्वभौम सरकारने रामरावास ' सी आय. ई. ' हा किताब दिला.

साडेपाच वर्षे दिवाणगिरीची जबाबदारी पत्करून १८९२ साली रामराव सेवानिवृत्त झाले ते मद्रास युनिव्हर्सिटीचे फेलो असून त्या काळीं लडनच्या इन्कॉर्पोरेटेड सोसायटी ऑफ सायन्स, लेटर्स आणि आर्ट्सया सस्थेचे एकटेच हिंदी फेलो होते.

टी. रामराव प्रामुख्याने पुराणमतवादी होते. सुधारणा फार सावधगिरीनें कराव्या असे त्याचे मत होतें, हे मारुकटायम् लग्नाचा कायदा, बालविवाह, विधवाविवाह व गेन्स ऑफ लार्निंग ( शिक्षणाच्या फायद्याबद्दल ) कायद्यावरील त्याच्या टीकावरून कळून येईल त्यानी धर्मादायही बऱ्याच प्रमाणात केला दोनतीन वर्षे त्याना विश्राति लाभली व पुढें ८-६-१८९५ रोजीं ते इहलोक सोडून गेले.

---

## व्ही. पी. माधवराव सी आय. ई.

व्ही. पी माधवराव यांनीं सर टी. माधवरावाप्रमाणेंच तीन प्रमुख हिंदी संस्थानांत दिवाणगिरी केली. त्रावणकोर व बडोदे या सस्थानात ते दोघेही दिवाण होते. पण सर टी. माधवरावानी इदुरातहि दिवाणपद शोभविले, तर व्ही. पी. माधवराव यानीं म्हैसूरचे दिवाण

म्हणून आपली कारकीर्द यशस्वी केली ही पी माधवरावाचा राजकारणातील अनुभव, व्यवहार, व चातुर्य या गुणामुळे हिंदुस्थानचे पाऊल राजकारणात पुढे पडले यात शंका नाहीं.

माधवराव याचा जन्म १० फेब्रुवारी १८५० रोजीं कुम्भकोणम् येथें झाला त्याचे वडील मुनसफीच्या हुद्यावर असून त्याच्या घरची शिस्त फारच कडक होती त्याच्या १९ व्या वर्षी कुम्भकोणम् कॉलेजांतून ते पदवीधर झाले. लहानपणापासून त्याना मर्दानी खेळाची व्यायामाची फार आवड होती. ते पोहण्यात तर तर फार पटाईत होते. दुथडी भरून चाललेल्या कावेरी नदींत फार उचावरून उड्या टाकून ते पोहून पैल तीरास जात असे सागतात

बी ए झाल्यावर माधवरावानी प्रथम बेगलोर येथील लडन मिशनच्या शाळेत शिक्षकाची नोकरी धरली. त्याची शिकविण्याची ख्याती म्हैसूरचे त्यावेळचे दिवाण सी रगाचार्लु याच्या कानावर गेली व त्यानीं राजवाड्यात टयूटर म्हणून माधवरावाची नेमणूक केली म्हैसूरचे पूर्वीचे महाराज सर श्री चामराजेद्र वडियार हे त्याचेच विद्यार्थी होत येथून प्रथम न्यायखात्यात त्याची बदली झाली व नतर फ्रेन्च रॉक्स येथ रेव्हिन्यू सबडिव्हिजनल ऑफिसर म्हणून त्याची नेमणूक झाली. या कामात त्याची उदारवृत्ति व विद्यार्थ्याविषयींची कळकळ वारंवार दिसत असे. खेडेगावातील चागल्या पाण्याचा पुरवठा, दाट वस्तीचा भाग विरळ होण्यासाठीं गावचा जास्त विस्तार, प्रवाशासाठीं धर्मशाळा वगैरे बऱ्याच सुधारणा त्यानीं केल्या त्या वेळचे दिवाण सर के. शेषाद्री अय्यर हे त्याचे परम मित्र असून म्हैसूर लॅड रेव्हिन्यू कोड सुधारणा व जहागिरीबाबतचे नियम करण्याचे कामीं त्यानीं माधवरावाचा सल्ला घेतला होता असे म्हणतात.

पुढे डेप्युटी कमिशनरचे हुद्यावर बढती झाल्यावर त्याची लोकप्रियता आणखीच वाढतच गेली. या हुद्यावर असताना त्यानी पाण्याचा पुरवठा, गावात साफसफाई करण्याच्या योजना, पाणथळीच्या जमिनींतून पाण्याचा निचरा होण्यासाठीं ड्रेनेजची योजना वगैरे कामे त्यानीं अनेक ठिकाणीं केली दुष्काळाचे वेळीं विणकऱ्यास मदत करण्याचे हेतूने त्यानीं हातविणीचें कापड विकत घेऊन आपल्या अधिकाराचा या कामीं पूर्ण उपयोग केला. माल्नाड भागातील सुपारीच्या पिकास ' कोळेरोग ' नावाचा रोग झाला असताना मळेवाल्यानाही त्यानीं चागलीच मदत केली. अनिश्चित पीक व त्यावर जबर कर व जकात यामुळेही मळेवाल्याना नुकसान येत होतें. माधवरावानीं या अडचणी दूर करण्याचा फार प्रयत्न केला म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डाचे नियम, सिव्हिल सर्व्हिस पोलिस याच्याकरिता नव्या योजना, व शहर सुधारणा कमिटीचे काम हीं कामेही माधवरावानीं यशस्वी रीतीने केली.

व्हाइसरॉयाच्या आगमनप्रसगी सत्कार–कमिटीचे अध्यक्ष म्हणून माधवरावाना आपली कलाकुसर व शृगारण्याच्या कलेची अभिरूचि दाखविण्याचा योग आला व त्यानी केलेल्या व्यवस्थेबद्दल त्याचे वरिष्ठ व जनता या दोघानीं त्याची फार प्रशसा केली. यानतर लवकरच ते सस्थानचे पहिले हिंदी इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलीस झाले या कामात त्यानीं आपली कुशलता व्यापक प्रमाणात दाखविली. त्यानीं सुरू केलेले पोलिस स्कूल इतर प्राताना आदर्शवत् झाले, इतकेंच नव्हे तर यानतर पुष्कळ वर्षांनीं वेल्लोर येथील पोलिस स्कूलमध्ये त्यानीं सुचविलेली शिक्षण पद्धति जशीच्या तशीच सुरू करण्यात आली.

इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस ह्या हुद्याचे काम सभाळून शिवाय माधवरावाना प्लेग झालेल्या भागावर प्लेग कमिशनरचेंहि काम पाहावें लागत असे. हें प्लेगचें काम त्यानीं इतक्या उत्साहाने व आस्थेनें केलें कीं, तें पाहून म्हैसूर सस्थानाबाहेरील लोकानीं देखील तोंडात बोटें घातली. 'पायोनियर' पत्राने तर म्हटले कीं ' माधवरावासारखीं माणसें ज्या सस्थानात आहेत अशा सस्थानात राहाण्यास कोण का कू करील ?

अशा परिस्थितींत 'मेंबर ऑफ कौन्सिल' म्हणून माधवरावाची बढती हे ऐकून संस्थानातील लोकांस आनंद झाला. इतकेच काय पण मुसलमानानी देखील त्यास कौन्सिलातील आपला प्रतिनिधी म्हणून मानले. याच वेळीं त्यास मुबई इलाख्याची जमाबंदीची पद्धति पाहाण्याकरिता मुबईस पाठविण्यात आले मुबईहून परत आल्यावर कौन्सिलचे मेंबर राहून फर्स्ट रेव्हिन्यू कमिशनरची जागा त्यांना देण्यात आली. पुढे १८९९ सालीं त्याना सी. आय. ई हा किताब मिळाला. व पुढचे वर्षी कैसर–इ–हिंद सुवर्णपदक देण्यात आले.

१९०४ चे अखेरीस माधवरावानीं त्रावणकोर संस्थानची दिवाणगिरी पत्करली. आपल्या दिवाणगिरीच्या दोन वर्षांच्या काळात त्यानीं त्रावणकोरात इतक्या सुधारणा केल्या कीं दुसरा कोणीहि दिवाण तितक्या सुधारणा सर्व आयुष्यात करता तर तो स्वतःला धन्य मानता ! त्याची पहिली सुधारणा म्हणजे धारेबंदी खात्याची पुनर्घटना ही होय या योजनेमुळे संस्थानाचे ३५ लाख रुपये खर्च वाचून जे काम करण्यास १६ वर्षे लागणार ते काम पुष्कळ कमी म्हणजे दोन वर्षांचे मुदतींत झाले. त्याची दुसरी सुधारणा म्हणजे 'दैनिक हिशेब तपासणी' ची पद्धति या पद्धतीनें उसनवार दिलेल्या रकमाचा ताळेबंदी फार लवकर होऊ लागला त्याची तिसरी सुधारणा म्हणजे सारा व इतर कर नगद पैशाचे रुपाने घेण्याची योजना तत्पूर्वी हे कर धान्य व इतर जिनसाचे रूपानें सरकारात भरले जात होते. प्रजेस ही पद्धति फार जाचाची वाटत असे. त्याची सर्वात महत्त्वाची सुधारणा म्हणजे त्रावणकोर संस्थानात श्रीमूलम जनसभेची स्थापना ही होय ह्या सभेत लोकानी निवडून दिलेल्या प्रतिनिधींना राज्यकारभाराबद्दल विचार विनिमय करवयास सापडतो व त्याच प्रसगी संस्थानच्या कारभारावर हितकारक असे वजनहि पाडता येत असे

वेदविद्येस आश्रय, देवस्थाने, पाठशाळा व विद्वानासाठीं ठिकठिकाणीं छत्रें बाधणें या बद्दल माधवरावाची ख्याती होती या कामाकरिता जमीन मोठ्या सावधगिरीने घ्यावी लागे. शृंगेरी पीठाचे शकराचार्य हे त्याचे गुरू होते. पण माधवराव स्वतः इतर पंथाच्या धर्मगुरूना व त्याच्या अनुयायानाहि मदत करीत रामकृष्ण मठ, थिऑसॉफिस्टाचा पंथ, उत्तराधी, व्यासारय व इतर प्रसिद्ध मठ तसेच मशिदी व खिस्ती मंदिरे या सर्वानाच ते जातगोत धर्म इत्यादि कांहीं न पहाता सढळ हाताने मदत करीत.

१९०६ च्या मार्च महिन्यात माधवराव पुन म्हैसुरास 'दिवाण' म्हणून नेमणुक होऊन आले. त्याची कीर्ति यावेळीं इतकी पसरली होती कीं म्हैसुरात आल्यावर संस्थानातील युरोपियन समाज व इतर सर्व जातीचे व धर्माचे हिंदी लोकानीं एका मोठ्या जाहीर सभेत त्याना मानपत्र अर्पण केलें.

त्यावेळीं त्यानीं प्लेग–निवारण व आरोग्यखाते यांची सुधारणा केली. "टाउन प्लॅनिंग" नगर सुधारणा योजना सुरू करून गावातील दाट वस्ती कमी करण्याचा प्रयत्न केला. त्यानीं संस्थानात स्वतंत्र आरोग्य खाते सुरू केले. गुराचे रोग व त्यावरील प्रतिबधक उपाय याकडेहि त्यानीं लक्ष दिलें. त्यानींच प्रथम संस्थानात सहकारी सोसायट्या काढून १९०६-७ सालीं 'फॅमिन रिझर्व फड' स्थापन केला खेडेगावातील शाळात प्राथमिक शिक्षण मोफत करून त्यानीं सर्व शाळा कॉलेजे यात धार्मिक व नैतिक शिक्षण सुरू केले. औद्योगिक व धंदेशिक्षणाच्या शाळाहि त्यानीं ठिकठिकाणीं काढल्या. १९०७ सालीं परदेशी जाणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी त्यानीं शिष्यवृत्त्या देण्याची पद्धति सुरू केली. सुपारी वरील सेयर वगैरे जाचक करहि त्यानी रद्द केला. हा कर रद्द केल्यामुळें संस्थानचें चार लक्ष रुपयाचे वार्षिक उत्पन्न बुडालें, पण त्याचा मोबदला म्हणून त्या धंद्यास कल्पनातीत ऊर्जितावस्था आली हें विशेष आहे.

१९०९ मध्ये माधवराव सेवानिवृत्त झाले. त्यानतर हिंदुस्थानची खरी स्थिति अवलोकन करण्याकरिता म्हणून त्यानीं हिंदुस्थानभर दौरा काढला तजावर जिल्हा परिषदेचे अध्यक्ष होण्याचा मान त्याना मिळाला होता व १९११ च्या दिल्ली दरबारास हजर राहाण्याचे मानाचे आमत्रणहि त्याना मिळाले होते. १९१४ सालीं श्रीमत सयाजीराव गायकवाड याच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून ते बडोद्याचे दिवाण झाले बडोद्यास असताना उत्तर व दक्षिण हिंदुस्थानातील सगीत पद्धति एकत्र करून तीस व्यवस्थित स्वरूप देण्याच्या उद्देशाने त्यानी एक सगीत परिषद भरविली होती. तसेच काहीं दिवसानी त्यानी भरविलेल्या सस्कृत परिषदेने पुरोहित बिलावर चर्चा केली. या बिलातील दूषणास्पद कलमे काढून टाकण्यात माधवरावाचा हात होता असे कळते बडोद्यातील पहिले आरोग्य प्रदर्शन त्यानींच भरविले महायुद्धात दोस्त राष्ट्राच्या सैन्यास चागली मदत करून जनतेतील राजनिष्ठा त्यानीं जागृत केली व त्यामुळ सस्थानातील जनतेत युद्धफडास उदार हस्ते फार मोठी मदत केली

माधवराव हे कायम धारेबदीचे पुरस्कर्ते होते व बऱ्याच पत्रव्यवहारानतर साठ वर्षे मुदतीच्या धारेबदीची पद्धति सुरू करण्यात त्याना चागले यश आले चढाओढीच्या परीक्षा घेऊनच सरकारी नोकराना नेमावे असे त्याचे ठाम मत होते

बडोदे सस्थानची नोकरी सोडल्यावर माधवरावानीं आपला बराचसा वेळ देशाच्या सामाजिक आर्थिक व राजकीय सुधारणेत घालविला ते हिंदुमहासभेच्या एका अधिवेशनाचे अध्यक्ष होते. व नतर १९१९ सालीं जॉइट पार्लमेंटरी कमिटीपुढे हिंदी राष्ट्रीय सभेच्या वतीने साक्ष देण्यास गेलेल्या शिष्टमडळापैकीं ते एक सभासद होते ते पूर्ण राष्ट्रीय बाण्याचे होते जुन्या इपिरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या बिनसरकारी सदस्यानीं युद्धोत्तर सुधारणावर लिहिलेल्या निवेदन पत्रिकेवर त्यानीं ' मद्रास मेल ' मध्ये लिहिलेला लेख त्याच्या राष्ट्रीय बाण्याची चागली साक्ष देतो

सप्टेंबर १९२० मध्ये ते आजारी पडले व सार्वजनिक काम करण प्रकृति-अस्वास्थ्यामुळे त्याना सोडून द्यावे लागले पण काहीं वर्षानीं त्याची प्रकृति बरीच सुधारली पूर्वी १९०४ मध्ये त्यानीं स्वतः सुरू केलेल्या त्रावणकोरच्या श्री मूलम् जनसभेचा १९२९ मध्ये झालेल्या रौप्य महोत्सवाचे अध्यक्षस्थान मडित करण्याचा अपूर्व मान त्याना मिळाला होता. मृत्यूपूर्वी आदले सालीच ते म्हैसूरचे महाराज व शृंगेरीचे श्री शकराचार्य या दोघास भेटून आले. अखेर १९३५ सालीं त्याचे देहावसान झाले सर्व वर्गाच्या लोकामध्ये असलेली त्याची लोकप्रियता ही त्याच्या यशस्वी सार्वजनिक सत्कार्याची साक्ष देते हिंदी राजकीय सुधारणाबाबत त्यानीं केलेल्या उपयुक्त कार्याबद्दल आपण त्याचे फार ऋणी आहोत, मराठा एज्युकेशन फडाचे ते आजीव सभासद होते व फडाच्या कार्यास त्याची पूर्ण सहानुभूति असे, या गोष्टीचा अभिमान आपणा सर्वास वाटणे साहाजिकच आहे

---

## ' प्रधानशिरोमणि ' टी. आनंदराव सी. आय. ई.

म्हैसूर दरबारकडून ' प्रधान शिरोमणि ' या पदवीने विभूषित केले गेलेले आनदराव हे एक म्हैसूरचे थोर दिवाण होऊन गेले त्रावणकोर, इदूर, व बडोदे या ठिकाणीं दिवाण म्हणून प्रसिद्धीस आलेले राजा सर टी माधवराव याचे ते ज्येष्ठ पुत्र असून त्याची पत्नी दिवाण रामराव याची कन्या होय. त्याचा स्वभाव अत्यत उदार असून ते लोकहिततत्पर असत

आनंदरावांचा जन्म त्रिवेंद्रम किल्ल्यातील 'पद्मविलास' नावाच्या घरांत ता. १५ मे १८५२ रोजीं झाला. महाराजा कॉलेज (त्रिवेन्द्रम) व प्रेसिडेन्सी कॉलेज (मद्रास) येथें आपला शिक्षणक्रम पुरा करून १८७१ सालीं ते मद्रास युनिव्हर्सिटीचे पदवीधर झाले. पुढे मद्रास रेव्हिन्यू बोर्डाच्या डेप्युटी कलेक्टरची त्याची परीक्षा पास झाल्यानंतर जनरल डालींने त्यांचे नांव इंदूरच्या राजपुत्राचे शिक्षक म्हणून सुचविलें होतें पण इंदूरची हवा न मानवल्यामुळे ते इंदूर सोडून १८७३ सालीं म्हैसूरास ब्रिटिश कमिशनरच्या हाताखालीं 'ॲटॅशे' म्हणून काम करू लागले १८७५ त ते ॲसिस्टंट कमिशनर झाले व त्यानंतर लवकरच डेप्युटी कमिशनरची जागा त्यांना मिळाली यावेळीं म्हैसूरला फार मोठ्या प्रमाणावर संप झाला होता पण आपल्या शांत व धिम्म्या स्वभावाने म्हैसूरचा संप त्यांनीं मिटविला संपाच्या पुढाऱ्यांना शिक्षा करण्याचे सोडून ते फक्त एका शिपायानिशीं संपवाल्याकडे गेले व सामोपचाराने संपवाल्याची त्यांनीं समजूत घातली. पुढे कांही दिवसांनीं त्यांना पॅलेस कन्ट्रोलर व चीफ सेक्रेटरी या जागेवर बढती मिळाली या हुद्यावर असतांना त्यांनीं आपले काम अत्यंत खंबीर मनोवृत्तीने केले नंतर प्रकृति-अस्वास्थ्यामुळे त्यांना लांब मुदतीची रजा घ्यावी लागली रजेवरून परत आल्यावर ते प्रथम 'डिरेक्टर ऑफ स्टॅटिस्टिक्स' व नंतर 'सेन्सस सुपरिन्टेन्डन्ट' झाले शिरगणतीच्या समाधानकारक कामाबद्दल हिंदुस्थानचे सेन्सस कमिशनर रेट याच्याकडून त्यांची फारच प्रशंसा झाली, त्यानंतर त्यांनीं रेव्हिन्यु कमिशनर, व फर्स्ट कौन्सिलर या हुद्यावर कामे केली व शेवटी ते म्हैसूरचे दिवाण झाले

म्हैसूर येथील त्यांची दिवाणगिरी फारच यशस्वी झाली आपला दीर्घोद्योग, चिकाटी सुस्वभाव, मनमोकळेपणाने कर्तव्यनिष्ठा व राजनिष्ठा या गुणामुळे त्यांची कारकीर्द यशस्वी झाली असल्यास नवल नाहीं आनंदरावांनी आपल्यापुढे ग्लॅडस्टनचे उदाहरण आदर्श म्हणून पुढे ठेविलें होते असे म्हणतात

त्यांच्या दिवाणगिरीच्या कारकीर्दींत म्हैसूर संस्थानांत बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी घडल्या याच कालांत ना व्हॉइसरॉय लॉर्ड मिन्टो यांनीं म्हैसुरास भेट दिली तसेंच म्हैसूरच्या युवराजाचा विवाह याच कारकीर्दींत साजरा करण्यात आला तसेच याच दिवाणाच्या कारकीर्दींत दिल्ली दरबारांत म्हैसूर संस्थानने भाग घेतला अशा बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी दिवाण आनंदराव याच्या अमदानींत घडल्या संस्थानच्या दृष्टीने हा काल फारच शांततेचा असल्यामुळे गाजावाजा न करिता दिवाण आनंदरावांनी संस्थानच्या कारभारात अनेक उपयुक्त सुधारणा केल्या आनंदरावांनीं म्हैसूर अर्थशास्त्रीय परिषद प्रथम सुरू केली तसेच शैक्षणिक सुधारणा करण्यासाठीं दरबारकडून बरीच रक्कम मंजूर केली. मिंटो ऑप्थॅल्मिक (डोळ्याचे) हॉस्पिटल नंतर त्यांनीं बांधविले, * 'कानम्बाडी प्रॉजेक्ट' (योजना) या आरंभ केला. व रेल्वे बांधण्याचे काम जोराने चालूं ठेविले संस्थानचे उत्पन्न कसे वाढवावे त्याकडेहि त्यांनीं फार लक्ष पुरविलें. सर ह्यु डाली याच्या मदतीनें बेंगलोर सिव्हिल व मिलिटरी स्टेशन याच्या संबधीचीं खर्चवेंच वजा जाऊन उरलेल्या उत्पन्नावरील म्हैसूर संस्थानचा हक्क हिंदुस्थान सरकारकडून त्यांनींच मान्य करून घेतला म्हैसूर संस्थानातील सिव्हिल सर्व्हिसमधील उच्च नोकऱ्या म्हैसूर संस्थानच्या प्रजाजनांकरिता राखण्याचा त्यांनीं नियम केल्याबद्दल संस्थानांतील प्रजाजन त्यांना अजूनसुद्धा दुवा देतात

आनंदराव त्यांच्या कामगिरीबद्दल हिंदुस्थान सरकारने त्यास पुढें लवकरच सी. आय. ई

---

* ही योजना आता पुरी झाली असा सुप्रसिद्ध कृष्णराजसागर तलाव आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विजेच्या शक्तीवर सुप्रसिद्ध बंगलोर नजिकच्या सोन्याच्या खाणी चालविल्या जात आहेत. बंगलोर, म्हैसूर वगैरे ठिकाणचा विद्युत्प्रवाह येथूनच जात आहे.

ही पदवी दिली. व नतर खुद्द म्हैसूर सरकारनेहि त्याना 'प्रधानशिरोमणी' ही पदवी अर्पण केली इतकेच नव्हे तर १९११ त सेवानिवृत्त झाल्यानतरसुद्धा त्याना विशेष सन्मानानें वागविले. सरकारी खर्चाने त्याच्या तैनातीत नोकर चाकर देऊन शिवाय त्याची प्रकृति रोज पहाण्यास एका डॉक्टरची नेमणूक सस्थानने केली होती हे विशेष आहे.

अशा प्रकारचे हे लोकप्रिय दिवाण आनदराव १९ जुलई १९१९ रोजीं दिवगत झाले. त्यानीं आपल्या हयातींत बराच दानधर्म पात्रापात्रता पाहून केला त्याच्या मृत्युपत्र व्यवस्थापकानीं हाच विचार करून 'मराठा एज्युकेशन फडा'स त्याच्या नावे ४००० रुपयाची देणगी दिली या देणगींतून आपल्या समाजातील गरीब व लायक अशा डोळ्याचे रोगाचा विशेष अभ्यास करणाऱ्या वैद्यकीच्या विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देण्यात येतात या शिष्यवृत्त्याकरिता प्रथम विद्यार्थिनीच पसत करण्यात येतात मराठा एज्युकेशन फडास मिळालेली सर्वांत मोठी देणगी हीच होय त्याच्या औदार्याचे अनुकरण दुसरे कित्येक सधन लोक करोत अशी लेखकाची प्रार्थना आहे.

---

# दिवाण रेड्डीराव

त्रावणकोर सस्थानचे दोनदा दिवाण होण्याचा अद्वितीय मान रेड्डीराव याना मिळाला आहे. त्याचा जन्म तजावर येथील एका बुद्धिमान महाराष्ट्रीय ब्राम्हण घराण्यात झाला रेड्डीराव प्रथम त्रावणकोरचे रेसिडेन्ट कर्नल मन्रो याजबरोबर त्रावणकोरला गेले होते व उद्योग व बुद्धिमत्ता या दोन गुणाच्या जोरावर त्यानीं आपल्या नोकरीत बढत्या मिळवीत मिळवीत पुढे ते दिवाण पेशकार झाले. त्रावणकोरचे दिवाण रामन् मेनन व रेसिडेन्ट यामध्ये बेबनाव झाला तेव्हा ( १८१७ सालीं ) रेड्डीरावाना दिवाण करण्यात आले आपल्या दिवाणगिरीच्या कारकीर्दींत त्यांनीं बऱ्याच सुधारणा केल्या ख्रिस्ती प्रजेला 'ऊझियम' सेवेच्या जाचातून त्यानीं सोडविले, दस्तऐवजाकरिता स्टॅम्प कागद त्यानींच सुरू केले, शूद्र व इतर कांहीं जातींच्या लोकाना सोन्या चादीचे दागिने वापरण्यास त्यावेळीं प्रतिबध होता तो त्यानींच दूर केला, सस्थानात कॉफीची लागवड सुरू करून सस्थानचे उत्पन्न त्यानीं बरेच वाढविले, लाचलुचपतीचे प्रकार त्यानीं बद केले. शिवाय सर्वत्र त्यानीं देवी काढणारे डॉक्टर नेमले, यामुळ देवी काढण्याची पद्धत लोकप्रिय होऊन सार्वजनिक आरोग्याची अधिक प्रमाणात सुधारणा झाली त्यानीं राजकुमारी रुक्मिणीबाई याच्या लग्नाची व्यवस्था फार उत्तम प्रकारे केली होती त्याच्या चागल्या कामाबद्दल राणीन त्याना शेनकोट्टा तालुक्यातील दोन गावाची जहागीर दिली त्या वेळचे रेसिडेन्ट कर्नल न्यूवाल यांनीं ही जहागीर घेणे अयोग्य आहे असे म्हणून हरकत केली, तेव्हा रेड्डीरावानीं १८२१ सालीं आपल्या दिवाणगिरीचा राजिनामा दिला व ते कुम्भकोणास येऊन राहिले.

वीस वर्षांनतर ( १८४३ ) मध्यें सस्थानच्या कारभारात बेबदशाही माजली आहे असें पाहून तत्कालीन रेसिडेन्ट, जनरल कलन याने मद्रास सरकारच्या परवानगीने रेड्डीरावास त्रावण-कोरची दिवाणगिरी देऊ केली. दोन वर्षे सस्थानच्या हितासाठीं झटून पुढे १८४५ सालीं त्यानीं वार्धक्यामुळें दिवाणगिरी सोडून दिली.

रेड्डीरावानीं परोपकाराची पुष्कळ कृत्ये केली कुम्भकोणम् येथें त्यानीं एक तलाव बाधला तो त्याच्या नावाने अजून प्रसिद्ध आहे. वेदाभ्यासाच्या उत्तेजनासाठीं त्यानीं एक अग्रहार बाधला व त्यातील सर्व घरे विद्वान ब्राम्हणास दान म्हणून दिली.

त्याचे औदार्य सस्मरणीय आहे. 'प्रकाशाने प्रकाश उत्पन्न होतो' अशी इग्रजींत एक म्हण

आहे. की, रेड्डिरावाच्या सहवासात काही दिवस घालविले म्हणून दानशूर पाचैयप्पा मुदलियाराचे मन धर्मादायाकडे वळले असे म्हणतात

---

## इंग्लिश सुब्बाराव.

शंभर वर्षांपूर्वी आजच्यासारख्या शिक्षणाचा प्रसार झाला नव्हता त्यावेळीं इंग्रजी येत असणाऱ्या माणसास मानाच्या व अधिकाराच्या जागा खात्रीने मिळत. सुब्बारावाच्या अद्भुत अभ्युदयाचे कारण त्याचे इंग्रजी शिक्षण हे होते कारण ते १८१९ सालीं कर्नल मन्रो याजबरोबर त्रावणकोरास राजपुत्राचे ट्यूटर होण्याकरता गेले पाच वर्ष ट्यूटरचे काम केल्यावर निरनिराळ्या हुद्यावर काम करीत ते दिवाण पेशकार झाले व नंतर १८३० सालीं संस्थानचे दिवाण झाले

त्यांची कारकीर्द पुष्कळ कारणाकरिता प्रसिद्ध आहे प्रथमतः मद्रासच्या गव्हर्नरने त्रावण-कोर संस्थानास त्याच्या कारकीर्दातच पहिल्याने भेट दिली त्यावेळीं संस्थानची स्थिति पाहून गव्हर्नरसाहेब खूष झाले व नव्या दिवाणाच्या कामाची त्यांनीं फार प्रशंसा केली

सुब्बारावानीं लष्करी खात्याची पुनर्घटना केली व ब्रिटिश फौजेसारखी कवाईत शिकवि ण्याकरिता अधिकारी मागितले घोडदळासाठी नवे घोडे त्यांनीं आणविले व स्वाराच्या पोषाखातहि सुधारणा केली. संस्थानच्या फौजेला ' नायर ब्रिगेड ' हे नाव त्यांनीं दिले ते आजतागायत चालू आहे

न्यायखात्यासाठीं त्यांनीं इंग्रजी कायद्याच्या धर्तीवर दिवाणी व फौजदारी खटल्याचे कायदेकानू तयार करविले हेच कायदेकानू त्रावणकोरातील पहिले सुव्यवस्थित कायदेकानू (१८३६) होत नंतर कालांतराने त्यात पुष्कळ फरक झाले आहेत तरी सध्याच्या न्यायदानपद्धतीचा पाया त्याच कायद्यावर आहे

त्याच वर्षी संस्थानातील लोकसंख्येची पहिली तपशीलवार गणना करण्यात आली त्यावेळीं संस्थानची लोकसंख्या १२, ८०, ६६८ होती असे कळते

मध्यंतरी १८३४ सालीं त्रिवेन्द्रम येथे जे रॉबर्ट्स याच्या नेतृत्वाखालीं एक इंग्रजी शाळा सुरू करण्यात आली. ही शाळा लोकप्रिय झाली म्हणून लवकर अशाच शाळा जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं उघडण्यात आल्या.

१८३६ सालीं त्रिवेन्द्रम् येथे एक वेधशाळा व एक धर्मार्थ इस्पितळ सुरू झाले. तत्कालीन त्रावणकोरचे महाराज ( हिज हायनेस रामवर्मा, स्वाति तिरूनाल ) व रेसिडेन्ट, जनरल फ्रेजर यांची मर्जी दिवाणसाहेबावर होती म्हणूनच त्याना वरील सर्व सुधारणा करिता आल्या.

पुढल्या वर्षीं कांहीं कारणाने त्यांची लोकप्रियता कमी होऊं लागली म्हणून त्यांनीं आपल्या दिवाणगिरीचा राजिनामा दिला ( १८३७ )

परंतु दोन वर्षांनीं त्याना पुन्हा दिवाण करण्यात आले व त्यावेळीं त्याना विशेष अधिकार देण्यात आले या दुसऱ्या कारकीर्दीत त्रावणकोरास पुतन्मालिका व रंगविलास या नावाचे दोन राजवाडे बांधण्यात आले.

सप्टेंबर १८४० त जनरल कलन रेसिडेन्ट झाले कलनसाहेबांना दिवाणगिरी स्वतःच्या एका बगलबच्च्यास द्यावयाची होती. यामुळे महाराणाची मर्जी असूनसुद्धा दिवाणाची परिस्थिति बिकट होत चालली. शेवटी १८४२ सालीं सुब्बारावानीं कटाळून राजिनामा दिला, व द. म.



मराठा एज्युकेशन फंड, तंजावर शाखा, १९३७



मराठा एज्युकेशन फंड, त्रिची शाखा, १९३७

५०० रुपये पेन्शन घेऊन ते सेवानिवृत्त झाले. आयुष्याच्या अखेरचे कांहीं दिवस त्यानीं तजावरास काढले

---

## दि. ब. के. कृष्णस्वामी राव

दि. ब. के कृष्णस्वामीराव हे मराठा एज्युकेशन फडाचे सुरवातीपासून आपल्या मृत्यु-पर्यंत अध्यक्ष होते त्याचा जन्म सेलम येथे सन १८४५ त झाला त्याचे वडील कोंची व्यकट-राव हे सेलम येथील कलेक्टर कचेरीत हुजूर शिरस्तेदार होते व नतर कर्नूल येथे बदली झाल्यावर बऱ्याच वेळाने तेथेच वारले वडिलाचे मृत्युसमयी कृष्णस्वामीरावाचे वय लहान होते व कुटुबाचा भार त्याचे वडील बधू के सुभराव याच्यावर पडला काही दिवस नेल्लोर येथील वेकटगिरी राजा हायस्कुलात शिक्षण घेऊन मद्रास येथील सरकारी हायस्कुलातून कृष्णस्वामीराव मॅट्रिकची परिक्षा पास झाले गरिबीमुळे पुढील अभ्यासक्रम सोडून त्यानीं नेल्लोर कोर्टात ट्रान्सलेटरची जागा मिळविली व लवकरच आपल्या हुषारीने हेड क्लार्कच्या जागेवर त्याना बढती मिळाली.

नोकरी करीत असताच फावल्या वेळीं अभ्यास करून ते वकिलीची परीक्षा पास झाले. त्यावेळच्या डिस्ट्रिक्ट जज्जाने चागली कारकुनी सोडून वकिलीच्या नादीं पडू नकोस हा उपदेश त्याना केला होता पण लवकरच त्याना जिल्हा मुन्सफ व सबजज्जाची जागा मिळाली. १८८४ सालीं ना दि ब ऱ्ही राम अयगार हे त्रावणकोरचे दिवाण होते मद्रास सरकारच्या शिफारसीवरून त्यानीं कृष्णस्वामीरावास त्रावणकोरच्या चीफ जज्जाची जागा दिली.

त्रावणकोरच्या सर न्यायाधीशाचे काम त्यानीं १३ वर्षे केले. या कालात त्यानीं न्याय-खात्यात बऱ्याच सुधारणा केल्या. त्यानीं केलेला क्रिमिनल पोसीजर कोडचा मसुदा महाराजानीं पास केला. पुढे त्याना सस्थानच्या कायदेमडळाचे सभासद नेमण्यात आले होते. अखेर १८९७ सालीं त्याना त्रावणकोरची दिवाणगिरी देण्यात आली,

यशस्वी रितीने ६ वर्षे दिवाणपदावर काम करून ते नतर सेवानिवृत्त झाले. १९०३ सालीं त्यास ' दिवाण बहादुर ' व ' सी आय ई ' अशा पदव्या सरकारनें दिल्या.

सेवानिवृत्त झाल्यावर त मद्रासला येऊन राहिले तेथे स्वस्थ न बसता ते सार्वजनिक कार्यात लक्ष घालू लागले. त्याच्या बुद्धिमत्तेचा व उद्योगाचा फायदा मद्रासच्या अनेक सस्थाना मिळाला. विमा कपन्या, पतपेढ्या सार्वजनिक व औद्योगिक शिक्षण सस्था यासबधात त्याचे विशेष लक्ष होते. राजकारणातही ते भाग घेत मद्रास येथे रासबिहारी घोष याच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या स्वागत मडळाचे अध्यक्षस्थान त्याना देण्यात आले होते. मद्रास येथील नागरिकाच्या कल्याणासाठीं ते अहर्निश झटत मद्रास येथील नगरपालिकेनें केलेल्या बऱ्याच सुखसोयींचें श्रेय दि. ब के. कृष्णस्वामीराव त्याना आहे.

दि. ब. कृष्णस्वामीराव फार धार्मिक वृत्तीचें असून मनाने फार उदार होते. पुष्कळ गरीब विद्यार्थी व अनाथ मुले यास त्यानीं मदत केली. १९२३ मध्ये ते निधन पावले. त्याच्या मृत्यूनें मद्रास शहराची लवकर भरून न येण्यासारखी हानी झाली आहे. त्यानीं केलेली मद्रास शहराची सेवा स्मरून शेरीफनी भरविलेल्या सभेत जमलेल्या सहा हजार रुपयातून मद्रास युनिव्हर्सिटींत त्याचे नावाने एक शिष्यवृत्ति ठेवण्यात आली आहे.

---

# दि. ब. सी. कृष्णस्वामीराव

दि ब. कृष्णस्वामीराव यांचे चरित्र अवलोकन करताना त्यानीं निरनिराळ्या लोकास मित्र व मार्गदर्शक या दृष्टीने केलेली आर्थिक मदत प्रथम डोळ्यात भरल्यावाचून राहात नाहीं पुष्कळ बाबतींत त्यांच्यात व प्रसिद्ध दि ब. के. कृष्णस्वामीराव यांच्यात साम्य होते पहिल्यास लोक 'ट्रस्टी' म्हणून ओळखीत तर दुसऱ्यास 'प्रेसिडेंट' म्हणत. ते स्वभावानें जरा प्रसिद्धि पराङ्मुख होते तरी आपल्या मित्रमंडळीस मात्र मदत करण्यास सदैव तत्पर असत. त्यांचा स्वभाव हट्टी होता. पण एकदा चूक झाली अशी यांच्या मनाची खात्री झाली कीं त्या चुकीची भरपाई करण्यास ते तयार असत.

सी कृष्णस्वामीराव यांचा जन्म १८६७ सालीं सैदापेट येथें झाला. त्यावेळीं त्यांचे वडील काची शामराव तेथें तहशीलदार होते लहानपणींच वडील वारल्यामुळे त्यांच्या मातुश्रीने त्यांचे संगोपन केले. त्यांच्या वडिलांचे एक मित्र कर्नल रामचंद्रराव हेही आपल्या स्नेह्याच्या मुलाच्या शिक्षणाकडे पाहात मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजात त्यानीं उत्तम रितीने अभ्यास केला लॉ टर्म भरल्यावर व पुढे बी एल च्या परिक्षत मद्रास युनिव्हर्सिटीत ते पहिले आले काहीं दिवस मद्रास लॉ कॉलेजचे सी रामचंद्रराव रावसाहेब यांचेकडे उमेदवारी करून नंतर त्यांनीं कर्नूल येथे प्रॅक्टिस सुरू केली.

त्यांच्या हुशारीमुळे वकिलीत त्यांचा जम थोड्या वेळांत चांगलाच बसला. लवकरच १८९३ सालीं त्यांना जिल्हा मुन्सफाची नोकरी मिळाली तामील, तेलगू व कानडी या भाषांचे चांगले ज्ञान असल्यामुळे त्यांच्या बदल्या मद्रास इलाख्यातील पुष्कळ ठिकाणी झाल्या फिर्यादींचा निकाल लवकर करण्याच्या त्यांच्या सवयीमुळे काम फार थकले आहे अशा ठिकाणीं त्यांना पाठविण्यात येत असे त्यांना काम फार करावे लागे व त्यामुळे कित्येकदां प्रकृति बिघडून त्यांना रजा घ्यावी लागे. १९१२ त सब जजच्या हुद्यावर असीच त्यांनीं रजा घेतली असताना त्यांना पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढे साक्ष देण्यास बोलावण्यात आले होते.

सरकारी काम उत्तम करण्याच्या त्यांच्या पद्धतीमुळे त्यांना लवकरच डिस्ट्रिक्ट जजाची जागा मिळाली व त्यानंतर थोड्या वर्षांत त्यांना मद्रास हायकोर्टाचे ॲक्टिंग न्यायाधीश नेमण्यात आले. सरकारने त्यांचे गुणाबद्दल त्यांना पुढे अनेक पदव्या दिल्या. पण काहीं कारणामुळे त्यांना हायकोर्ट जज्जची कायमची जागा मिळाली नाहीं. हिंदुस्थानसरकारने त्यांना दिल्लीच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सरकारनियुक्त सभासद म्हणून नेमले होते १९२३ सालीं ते सेवानिवृत्त झाले. त्यांना काम करण्याची बालपणापासूनची चांगली सवय असल्यामुळे सेवानिवृत्त झाले तरी स्वस्थ बसावें तर त्यांच्या प्रकृतीला मुळींच मानवेना म्हणून त्यांनीं पुन्हा वकिली सुरू केली. काहीं हिंदी संस्थानिक त्यांचेकडून कायद्याबाबत पुष्कळ वेळा सल्ला घेत असत

१९२८ च्या उन्हाळ्यात कुन्नूराहून मद्रासला चार दिवस विश्रांतीकरिता ते आले होते तेव्हां कॉलिकचे विकाराने त्यांना मृत्यु आला.

दि. ब. कृष्णस्वामीरावांचे सर्व आयुष्य सरकारी नोकरीत गेले. आपल्या मित्रास त्यांनीं केलेली आर्थिक मदत त्यांचे मित्र अहर्निश जाणत असतीलच धंद्याच्या कामामुळे त्यांना वेळोवेळीं बाहेरगावीं जावे लागत असल्यामुळें सेवानिवृत्तीनंतरच्या काळात सार्वजनिक कार्यांत त्यांना विशेष भाग घेता आला नाहीं तरी गरीब लोकांबद्दल त्यांना फार सहानुभूति वाटे. ते जर आणखी काहीं दिवस जगले असते तर कित्येक राजेरजवाड्याकडून महाराष्ट्र एज्युकेशन फंडास परदेशीय शिष्यवृत्त्याकरिता चांगलीच मदत मिळण्याचा संभव होता. पण ईश्वरी इच्छा निराळी होती.

# दि. ब. आर. रामचंद्रराव सी. एस. आय.

कै दि ब. रामचद्रराव याचा उदार स्वभाव व करारी वृत्ति ही त्याच्या सहवासात असलेल्या मडळींना परिचित आहेच आपण मराठे आहोत असे अभिमानाने सागणाऱ्या व्यक्तींत त्याची गणना होते आपल्या अगच्या गुणामुळेच ते सरकारी नौकरींत बढती मिळवीत इतके पुढे गेले.

रामचद्रावाचा जन्म १८७१ साली एका मोठ्या घरदाज कुळात झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण त्रिवेंद्रम येथें झाले व नंतर मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजात उच्च शिक्षण घेऊन ते बी ए. झाले वयाच्या विसाव्या वर्षीच (१८९०त) ते सिव्हिल सर्व्हिसमध्ये शिरले. कलेक्टर म्हणून बऱ्याच जिल्ह्यात त्यानीं प्रथम काम केले त्याच्या कामाच्या चागुलपणाबद्दल दुमत होणे शक्य नाही पण त्याच्या निस्पृह स्वभावामुळे त्याचे वरिष्ठाशीं वारवार खटके उडत. रामचद्ररावाना गरीब लोकाच्या अडचणी लवकर कळत व त्याचे हित करण्यास ते नेहमीं झटत गरीबाना कनिष्ठ नोकराच्या जाचातून सोडवण्यास ते सदैव तत्पर असत ते कर्नूल येथें कलेक्टर असताना इलाख्याचे गव्हर्नर लॉर्ड हॅवेलॉक हे कर्नूलला आले होते पण जिल्ह्यातील दुष्काळाची परिस्थिति पाहून गव्हर्नरच्या सत्कारासाठीं सार्वजनिक वर्गणी करण्यास रामचद्ररावानीं नकार दिला व सरकारचा सर्व खर्च त्यानीं स्वत. ( रामचद्ररावानी ) सोसला

१९०७ ते १० च्या दरम्यान ते सहकारी पतपेढयाचे रजिस्ट्रार झाले सहकार्याचे तत्त्व खरोखर जाणणाऱ्या थोड्या लोकात त्याची गणना प्रामुख्याने होते जिल्हाधिकारी असताना रयतेची परिस्थिति व गरजा याचीं त्याना चागली माहिती झाली होती व या नव्या कामात आपल्या अनुभवाचा उपयोग त्यानीं चागल्या रितीने केला. कर्जनिवारण, साक्षरताप्रसार व मद्यपानबंदी या गोष्टींवर त्यानीं विशेष भर दिला होता.

कायदेखात्याचे सेक्रेटरी म्हणून त्यानीं राजकीय कैद्याच्या वागणुकीबद्दल लिहिलेल्या टाचणावरून त्याच्या मनौदार्याची कल्पना येते. ते नेहमीं स्पष्ट व निर्भीडपणे बोलत.

१९२६ सालीं मद्रासचे कलेक्टर असतानाच रामचद्रराव सेवानिवृत्त झाले नौकरींत असताना देखील त्यानीं आपला गणीत व खगोलशास्त्राचा व्यासग कायम ठेविला होता. एस् रामानुजम् याची अलोट बुद्धिमत्ता ओळखून त्यास पुढे आणण्यास मदत करणाऱ्या लोकापैकीं दि. ब. आर. रामचद्रराव हे एक होते

रामचद्ररावाचा देशाभिमान जाज्वल्य असून सेवानिवृत्त झाल्यापासून १९३० मध्यें अर्धांगवायूने आजारी होईपर्यंतचा काल त्यानीं देशसेवा करण्यात घालविला राष्ट्रीय सभेच्या १९२७ च्या मद्रास येथील अधिवेशनाबरोबर त्यानीं एक प्रदर्शन भरविलें होते व ते चालविण्याच्या कामात त्याचे चातुर्य दिसून आले सेलम येथे सी राजगोपाळाचार्य याच्याबरोबर मद्यपानबदी करण्याचे प्रचार कार्य त्यानीं केले रामचद्रराव स्वदेशीचे भोक्ते असून नेहमीं खादी वापरीत असत

म. ए. फडाचे ते एक अध्यक्ष होते कार्यबाहुल्यामुळे कमिटीच्या सभाना त्याना बरेच वेळा सभास हजर राहण्यास फावत नसे तरीहि वेळात वेळ काढून ते जेव्हा हजर असत तेव्हा त्याचा कार्यकर्त्यास फार उपयोग होई.

१९३० नतर पाच एक वर्षे ते अथरुणास खिळून होते धिमेपणानें आपलें दुःख सहन करताना देखील लोकसेवेचे कार्य करिता येत नाही याचे त्याना फार वाईट वाटे. जुलै १९३६

साली म्हणजे आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी त्याना मृत्यू आला. ही बातमी ऐकून मद्रास इलाख्यातील लोकास फार हळहळ वाटली.

---

## सराविल गोविंदराव

श्री. गोविंदराव हे तजावरचे शेवटचे राजे शिवाजी त्याच्या राण्या व इतर आप्त याचे कारभारी होते. ब्रिटिश सरकार व तजावरची जहागीर यामधील सर्व व्यवहार त्याचे मार्फत चालत. राजवाड्यातील निरनिराळ्या खात्यातील सर्व नोकरचाकरावर त्याची हुकमत चाले. इग्रज सरकारकडून आलेले पेन्शन निरनिराळ्या राण्यात तेच वाटत असत. राजवाड्याचा निराळा खजिना असून तेथील सर्व अधिकारी त्याच्या हाताखाली असत

पॅलेस कन्ट्रोलर व तजावरचे पोलिटिकल एजन्ट जे कलेक्टर याचे ॲसिस्टट म्हणून गोविंदरावाचे हाती बरीच सत्ता असे. हे मोठ्या जबाबदारीचे काम त्यानी सर्वाना खूष ठेवून केले यावरुन त्याच्या सचोटीची व सत्कार्य प्रवृत्तीची चागली कल्पना येते.

त्याचा जन्म दक्षिण हिंदुस्तानातील मोठ्या घरदाज घराण्यात झाला होता व त्यानी पैशाची केव्हाही कदर केली नाही वयाच्या त्रेपन्नाव्या वर्षी नोकरी सोडून त्यानी उरलेले आयुष्य स्वस्थ बसून घालविले. वयाच्या एकसष्ठाव्या वर्षी १९०८ त्यानी आपली इहलोकची यात्रा सपविली

त्याचे ज्येष्ठ चिरजीव श्री, जी. कृष्णराव, मैलेरिपाळयम्चे जमीनदार व मद्रास लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीचे सभासद, हे मराठी वाङ्मयोपासक असून आपल्या घराण्याची उज्वल परपरा पुढे चालवीत आहेत ते फडाचे नुसते तहह्यात सभासद आहेत इतकेच नसून डायरेक्टरही आहेत हे सागण्यास आम्हास फार आनद होतो.

---

## रा. ब. तान्डलम् गोपाळराव

तान्डलम् गोपाळराव याचे नाव त्याच्या शैक्षणिक कामगिरीमुळे सर्व दक्षिण हिंदुस्थानात प्रसिद्ध झाले आहे. कुम्भकोणम् जवळ कावेरी नदीच्या तीरावरील गणपती आग्रहाराम येथे १८३२ साली काम करीत असलेले बाबा पडित याच्या पाच मुलापैकी गोपाळराव हे सगळ्यात कनिष्ठ होते. लहानपणी गोपाळरावानी सस्कृत व मराठीचा अभ्यास घरींच केला. थोडेबहुत इग्रजी अध्ययन प्रथम देवाजीराव नावाच्या शिक्षकापाशी त्यानी केले पण पुढे स्वतःच्या प्रयत्नानेच त्यानी आपले इग्रजीचे ज्ञान वाढविले

वयाच्या सतराव्या वर्षी त्यानी पब्लिक वर्क्स खात्यात तजावर येथे कारकुनाची नोकरी मिळविली. व पुढे अवघ्या दोन वर्षात पब्लिक वर्क्स खात्याच्या मॅनेजरच्या जागेवर त्याची बढती झाली १८५४ साली त्याच खात्यात जास्त बढती होण्याचा सभव न दिसल्यामुळे त्यानी आपल्या जागेचा राजिनामा दिला व लवकरच कुम्भकोणम् येथे नुकत्याच सुरू झालेल्या शाळेत शिक्षक म्हणून त्यानी नोकरी धरली. १८५७ त मद्रास युनिव्हर्सिटी निघाली तेव्हा युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परिक्षा त्यानी दिली व पुढील दोन वर्षात ( १८५९ साली ) ते बी. ए च्या परिक्षेत युनिव्हर्सिटीत पहिले आले.

गोपाळराव व पोर्टर या दोन प्रोफेसरांच्या उज्वल अध्यापन कार्यामुळे कुम्भकोणम्‌च्या कॉलेजचें नाव मद्रास इलाख्यात फार पुढे आले गोपाळराव इंग्रजी, गणित व इतिहास हे विषय शिकवीत पण त्यातूनहि इंग्रजी अध्यापनाची त्यांची पद्धति फारच अनुकरणीय होती व त्यामुळेच सिव्हिल सर्व्हिसमधील एक इंग्रज अधिकारी खास परवानगी घेऊन शेक्सपीअरच्या नाटकावरील त्यांचे विवेचन ऐकण्याकरिता मुद्दाम येत असे विद्यार्थ्यांना शिकविण्यात ते फार तरबेज होते शिवाय नियमितपणा हा त्यांच्या अंगी विशेष गुण होता त्यांच्या या गुणामुळे ते कडक शिस्त ठेवू शकत. १८६८ साली कालिकत येथील शाळेवर हेडमास्तर म्हणून त्यांची नेमणूक झाली. अगदीं अव्यवस्थित असलेल्या त्या शाळेस गोपाळरावांनीं शिस्त लावून व्यवस्थित केले, असे अद्यापहि तिकडील लोक बोलतात.

कुम्भकोणम्‌ येथील कॉलेजचे बरेच दिवस ॲक्टिंग प्रिन्सिपाल म्हणून काम करून देखील सरकारनें त्याना 'कायम' प्रिन्सिपॉल केले नाहीं ही गोपाळरावाची फार दिवसाची तक्रार होती. वरिष्ठास त्यांची खरी लायकी माहित होती

शाळाखात्याच्या डिरेक्टरच्या विरोधास न जुमानता लॉर्ड नेपियरने १८७० सालीं त्यास एज्युकेशनल इन्स्पेक्टर केले व ते कामही गोपाळरावानीं इतके उत्तमप्रकारे केले कीं शिक्षण-खात्याच्या डिरेक्टर साहेबानाहि "एतद्देशीय गृहस्थास इन्स्पेक्टरची जागा देण्याचा प्रयोग केला तो यशस्वी झाला" असे उद्गार काढावे लागले १८७९ सालीं त्याना 'रायबहादूर' ही पदवी मिळाली. लवकरच पुढे त्याना मद्रास युनिव्हर्सिटीचे फेलो करण्यात आले

१८८६ सालीं ते निधन पावले ही बातमी ऐकून शिक्षण खात्यातील सर्वांस फार वाईट वाटले गोपाळरावाची अध्यापन कार्य करण्याची हातोटी फारच अनुकरणीय अशी होती. शाळाखात्यांतील दगदगीची व जिकिरीचीं कामे करूनहि वेळ काढून त्यानीं कांहीं मराठी कविता केल्या आहेत. आंग्लकवि गोल्डस्मिथ याच्या 'हर्मिट' या काव्याचे त्यानीं केलेले मराठी काव्यमय भाषांतर सरस ठरलें आहे.

---

# दि. ब. सी. रामचंद्र रावसाहेब

दि. ब. सी रामचद्रराव हे मद्रास इलाख्यातील मोठे कायदेपंडित होऊन गेले. ते ध्येयवादी होते राजकारणात जर ते पडले असते तर त्यातही त्यांचे नाव अजरामर झाले असते परंतु कायद्याच्या क्षेत्रात त्यानीं काम करण्याचे ठरविले व कायद्याचा अभ्यास व संशोधन करण्यात त्यांचे नाव सध्या प्रामुख्याने आले आहे.

रामचद्र रावसाहेब ह्यांचा जन्म अर्णी जहागिरदाराच्या घराण्यात १८४५ सालीं झाला. शिकण्याची फार हौस म्हणून घर सोडून ते मद्रास येथे आले व डॉ मिलर याच्या फ्री चर्च मिशनस्कूलमध्ये त्यानीं आपले नाव घातले १८६७ मध्ये मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर त्यानीं कायद्याचा अभ्यास सुरू केला त्यावेळीं बी ए पास झाल्याशिवाय बी एल च्या परीक्षेत बसता येत असे. या सवलतीचा फायदा घेऊन स्वप्रयत्नानेच ते १८७० सालीं बी एल ची परीक्षा पास झाले. कांहीं दिवस ते तिरूमलई श्रीनिवासाचार्य याचेकडे उमेदवार म्हणून राहिले दुर्दैवानें श्रीनिवासाचार्य लवकरच वारले म्हणून ते राजा टी. रामराव याचेकडे उमेदवारी करू लागले. १८७१ सालीं त्यानीं स्वतःच वकिली सुरू केली व चितूरच्या टी. नागय्या ह्या वकिलाकडे मदतनीस म्हणून राहिले टी. नागय्या मुन्सफ झाल्यावर रावसाहेबाची कीर्ति घट्यात वाढू लागली

सुप्रसिद्ध सर व्ही भाष्यम अयंगार व डॉ. एस सुब्रम्हण्य अय्यर हे त्यांचे समकालीन असून त्यांचे परम मित्र होते.

१८९० साली रावसाहेबास प्रेसिडेन्सी कॉलेजात कायदा शिकविण्यासाठी ज्युनिअर प्रोफेसरची जागा मिळाली पुढे १८९२ साली मद्रास लॉ कॉलेज निघाले तेव्हा या कॉलेजात ते मुख्य प्रोफेसर झाले व ह्याच जागेवर त्यांनी १० वर्षे काम केले. थोडेदिवस त्या कॉलेजचे ते ॲक्टिंग प्रिन्सिपॉलही होते रोमन कायदा व आन्तराष्ट्रीय कायदा याबद्दल त्यांच्या इतका अभ्यास मद्रासमध्ये दुसऱ्या कोणाचाहि नव्हता असे म्हणतात. ते बरीच वर्षे कायदा विषयाचे परीक्षक असून मद्रास युनिव्हर्सिटीच्या सिनेटचे सभासद १७ वर्षे होते

राजकारणात त्यांचा ओढा राष्ट्रीय सभेकडे जास्त प्रमाणात असे. कायद्याचे प्रोफेसर होईपर्यंत काही दिवस ते महाजन सभेचे अध्यक्ष होते. त्यांनी १८८७ साली मद्रास येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात भाग घेतला होता त्यावेळी राष्ट्रीय सभेचे ध्येय व उद्देश याबद्दल प्रश्नोत्तर स्वरूपाचा एक लेख 'हिंदू' मध्ये आला होता. याकडे विलायतेतील पार्लमेंटच्या सभासदांचे लक्ष गेले व त्यावेळचे हिंदूचे संपादक वीर राघवाचार्य यांचेवर खटला करावा असे सुचविण्यात आले होते पण रामचंद्ररावांनी धिटाईने पुढे येऊन लॉर्ड कॉनेमारा (मद्रासचे गव्हर्नर) यास असे सांगितले की 'तो लेख मी स्वतः लिहिला आहे व खटला करणे असल्यास मजवर करा,' 'हिंदू'वर करू नका गव्हर्नरसाहेबांनी यावेळी सांगितले की सरकारच्या मनात खटल्याचा विचारच नाही १९०६ साली फुलरसाहेबांनी बंगालमध्ये सुरेंद्रनाथ बानर्जी व इतर पुढाऱ्यावर सुरू केलेल्या दडपशाहीबद्दल निषेध करण्यासाठी भरलेल्या मद्रास येथील सभेचे अध्यक्षस्थान त्यांनीच भूषविले होते

१८९७ साली त्यांना 'दिवाण बहादूर' ही पदवी देण्यात आली. ते १९०३ सालच्या दिल्ली दरबारास सरकारी निमंत्रणावरून गेले होते

दि ब सी रामचंद्र रावांच्या मनात डॉक्टर मिलर याबद्दल फार आदर वसे. शाळेत असताना मिलरसाहेबांचे ते आवडते विद्यार्थी असत १८९१ साली ख्रिश्चन कॉलेजातील माजी विद्यार्थ्यांचे सम्मेलन त्यांनी भरविले या सम्मेलनाचे पहिले तीन वर्षे ते अध्यक्ष होते.

वयाच्या ६४ व्या वर्षी म्हणजे १९०९ साली ते अर्धांगवायूच्या विकाराने दिवगत झाले. त्यांच्या मृत्यूनंतर मद्रास हायकोर्टात ॲडव्होकेट जनरल सर पी. एस. शिवस्वामी अय्यर यांनी त्यांचा स्तुतिपर उल्लेख करून दुःख प्रदर्शित केले होते

---

## रा ब. टी सुन्दरराव बी ए आय एस.

टी सुंदरराव हे रा ब. टी, गोपाळरावांचे ज्येष्ठ पुत्र होत. कुम्भकोणम कॉलेजात शिक्षण घेऊन ते १८७४ साली बी ए. परीक्षा पास झाले या परिक्षेत गणितात त्यांचा नंबर दुसरा आला.

सुंदरराव यांनी रेव्हिन्यु खात्यात २५ रुपये पगाराची प्रथम नोकरी धरली व हळूहळू बढती मिळून १८८८ साली ते डेप्युटी कलेक्टर झाले व १९११ साली फर्स्ट ग्रेड डेप्युटी कलेक्टर झाले

सुंदररावांनी गणिताचा व्यासंग कधींच सोडला नाही त्यांनी 'कागदाच्या घड्या घालणे व प्राथमिक 'सॉलिड जॉमेट्री' या विषयावर पुस्तके लिहिली व ती अमेरिकेत वाखाणली गेली होती. लंडनच्या मॅथेमॅटिकल ॲसोशिएशन व इंडियन मॅथेमॅटिकल सोसायटीशी त्यांचा निकट

संबंध होता. सुंदरराव शोधक वृत्तीचे होते. त्यांनीं स्वत:करिता एक होडी बांधविली होती. सध्या सरकारी कचेऱ्यातून वापरली जाणारी सायक्लोस्टाइल इंक पेस्ट त्यांनींच प्रथम तयार केली होती. फोटोग्राफी व बिलीयर्डस याचा त्याना फार नाद होता

बरीच वर्षे सरकारी नोकरी करून ते एप्रिल १९१३ मध्ये सेवानिवृत्त झाले. म्हातारपणीं देखील त्याचा उत्साह व कामाचा उरक कायम होता. साधी राहणी व उच्च विचार ह्या इंग्रजीतील म्हणीत व्यक्त झाल्याप्रमाणें त्याची राहणी व वागणूक अत्यंत नमुनेदार अशी होती

## रावबहादूर सी. श्रीनिवासराव

दक्षिण हिंदुस्थानात पुष्कळ वर्षांपूर्वी जी महाराष्ट्रीय ब्राह्मण घराणी येऊन राहिली अशा एका घराण्यात श्रीनिवासरावाचा जन्म १८७५ साली झाला मद्रास येथील एका हायस्कुलात शिक्षण घेतल्यावर त्यांनीं मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजात नाव घातले व १८९८ सालीं ते त्याच कॉलेजातून बी. ए ची परीक्षा उत्तीर्ण झाले पुढे त्याना टपाल खात्यात प्रोबेशनरी सुपरिंटेंडेंटची जागा मिळाली. इलाख्यातील निरनिराळ्या ठिकाणीं पोस्टल सुपरिंटेंडेन्टचे काम केल्यावर १९१३ सालीं त्याना ॲसिस्टंट पोस्ट मास्तर जनरलची जागा मिळाली १९२० सालीं ते डेप्युटी पोस्टमास्तर जनरल झाले व त्यानंतर आठ वर्षांनी ते नवी दिल्ली येथे टपाल व तारखात्याचे डेप्युटी डायरेक्टर जनरल झाले ही मोठी हुद्याची जागा मिळविणारे श्रीनिवासराव हे पहिलेच मद्रास इलाख्यातील महाराष्ट्रीय गृहस्थ होत

त्याच्या उत्तम कामाबद्दल १९२० सालीं त्याना 'रावबहादूर' ही पदवी देण्यात आली.

१९३० सालीं सेवानिवृत्त झाल्यापासून ते त्यागराजनगर येथ कालक्रमणा करित आहेत. अजून सुद्धा संस्कृताचा विशेषत: मध्वपंथी तत्वज्ञानाचा त्याचा अभ्यास चालू आहे

ते म ए. फंडाचे तहहयात सभासद असून सध्या एस एस. राघवेंद्रराव स्कूल कमिटीचे अध्यक्ष आहेत

## तंजावर रामचंद्रराव (१८२५–१८७९)

मद्रास शहरातील पहिले हिंदी डेप्युटी कमिशनर ऑफ पोलीस म्हणून टी रामचंद्रराव याचे नाव अद्यापि मद्रासेत प्रसिद्ध आहे विजापुराहून म्हैसूरास येऊन राहिलेल्या एका देशस्थ कुलात त्याचा जन्म झाला पण त्याचे जन्मस्थान तंजावर हे होते

त्याच्या लहानपणच्या आयुष्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाहीं. रामचंद्ररावाचे वडील फारच गरीब होते म्हणून थोडेबहुत इंग्रजी शिकून ते नोकरी शोधण्याकरिता मद्रासला १८४० सालीं आले. त्यावेळचे सरकारी मराठी ट्रान्सलेटर मेजर क्रिस यानीं त्याना आपल्या हाताखालीं ठेवून थोडे गणीत व लेखन याचे शिक्षण दिले. क्रिसपसाहेब कुंपणी सरकारचे ॲक्टिंग ॲस्ट्रोनोमर झालें तेव्हा त्यानीं रामचंद्ररावास सरकारी वेदशाळेचे सुपरिन्टेंडेंट नेमले. १८४४ सालीं त्यानीं मिलिटरी फंड ऑफिसात अकाउन्टंटची जागा मिळविली.

१८४७ सालीं ते ऑफिस सोडून त्यानीं ७१ रुपये पगारावर पोलिस ऑफिसात कारकुनाची जागा पत्करली तामील, तेलगू, हिंदुस्थानी, कानडी व मराठी या भाषावरील त्याच्या

प्रभुत्वामुळे त्याना त्वरित बढत्या मिळाल्या. व १८५४ साली १५० रुपये पगाराची चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटच्या दुभाषाची जागा त्याना मिळाली, लवकरच वरिष्ठाच्या ... सुप्रीम कोर्टाच्या कानडी भाषांतरकाराची जागा देण्यात आली

बोल्सर्सन साहेबाचे वेळीं रामचद्रराव मद्रासचे डे... ...१८६० साली त्यावेळचे मद्रास इलाख्याचे गव्हर्नर सर चार्ल्स ट्रव्हेलन यानीं डेप्युटी कमिशनराच्या मदतीने शहरातील फौजेच्या शिपायाना कमी करून त्या जागी पोलिस शिपाई नेमल्याबद्दल बोल्डर्सन् याची पाठ थोपटली. अड्यार येथील चोरीचा खटला दिन्डीगुल दरोडा, खोट्या नोटा बनविणाऱ्या टोळीचा खटला, व अशाच इतर महत्त्वाच्या खटल्यामध्ये रामचद्रराव यानीं गुन्हेगार पकडण्याच्या कामीं फारच चतुराई व्यक्त केली त्यामुळे त्याचे नाव प्रसिद्ध झाले. तसेच वाशरम्पेठ येथील मोठ्या आगीच्या वेळीं त्यानीं केलेल्या कामामुळें फा... नुकसान झाले नाहीं १८६६ सालीं त्रिप्लिकेन येथील बाजारात दगा व लुटालुट होण्याची वेळ आली असता त्याच्या धिम्मेपणामुळेच तो प्रसग टळला

निव्वळ सरकारी काम सोडून मोनेगार चौल्ट्री नावाचे अनाथालय चालविण्याचे त्यानीं केलेले काम फार महत्त्वाचे आहे या सस्थेत पैशाची मोठी अफरातफर झाली होती. म्हणून रामचद्ररावाकडे चौकशीचे काम देण्यात आले होते रीतसर आरोपीवर खटले झाल्यावर दुष्काळाचे वेळीं बरीच वर्षे त्या अनाथालयाची व्यवस्था त्यानीं स्वत: पाहिली व सस्थेचा कारभार काटकसरीने चालविला

१८७५ सालीं प्रिन्स ऑफ वेल्स याच्या मद्रासेतील दौऱ्याच्या वेळीं बदोबस्ताचे काही काम रामचद्ररावाकडे देण्यात आले होते. त्याच्या उत्तम कामगिरीबद्दल राजपुत्राच्या हस्तेच याना सोन्याची आल्बम साखळी देण्यांत आली. रामचद्ररावांबद्दल प्रिन्स ऑफ वेल्स याच्या या दौऱ्याच्या माहितीच्या सरकारी पुस्तकात उल्लेख आला आहे

रामचद्ररावाच्या कार्य वैचित्र्यामुळे निरनिराळ्या जातीच्या व दर्जाच्या लोकाशी त्याची मैत्री जडली. मदतीकरिता पुष्कळ लोक त्याच्याकडे येत व त्या सर्वांना ते मदतहि करीत कडक शिस्तीचे भोक्ते असताना देखील ते लोकप्रिय झाले, त्याना सरकारी पदवी मिळाली नाहीं या बद्दल लोक निरनिराळे तर्क काढीत असत त्याच्या एका युरोपियन मित्राने म्हटले कीं 'दुर्दैवानें या जगात प्रत्येकाच्या लायकीप्रमाणे प्रत्येक मनुष्यास बढत्या, मान वगैरे मिळत नाहींत.'

१८७८ सालच्या अखेरीस त्याची प्रकृति ढासळली तेव्हा त्याना काम सोडून विश्राति घेण्याचा सल्ला त्याना त्याना डॉक्टरानीं दिला. पण पुढे त्याची प्रकृती जास्त बिघडून आपल्या वयाच्या चोपन्नाव्या वर्षी त्याना मृत्यू आला.

रामचद्ररावाना विद्यार्थ्यांबद्दल फार प्रेम असे पुष्कळ गरीब विद्यार्थ्यास ते नेहमी अन्नदान करीत व अशा विद्यार्थ्यांपैकीं कित्येक विद्यार्थी पुढे चागल्या नावारूपास आले

---

## डी. आर. बाळाजीराव

दाक्षिणेतील महाराष्ट्रीय ब्राह्मणवर्गापैकीं जे थोडे ब्राह्मण व्यापारात पडले त्यातील डोब्हटन बाळाजीराव हे एक होत. त्याच्या सचोटीमुळे ते इडियन व इडो-कर्नाटक बँकेत मोठ्या हुद्यापर्यंत चढले.



सरखेल गोविंदराव, तंजावर.



धी ऑनरेबल रावबहादुर जी. श्रीनिवासराव, चेअरमन, म्युनिसिपल कौन्सिल मदुरा व सभासद मद्रास लेजिस्लेटिव्ह कौन्सिल.



टी. रामचंद्रराव
डेप्युटी कमिशनर ऑफ पोलिस, मद्रास



डी. आर. बाळाजीराव, बी. ए., बी. एल्.
सेक्रेटरी, इंडियन बँक लि., उपाध्यक्ष म. ए. फंड.
१९३०-३३

बाळाजीरावाचा जन्म १८६५ साली एका श्रीमान ब्राह्मण घराण्यात झाला. हे घराणे दक्षिण हिंदुस्थानात बऱ्याच पिढ्या स्थायिक झालेल्या घराण्यापैकी होते.

बाळाजीरावाना लहानपणी व्यायामाची फार आवड असे. पोहणे, कुस्ती खेळणे व घोड्यावर बसणे यात ते तरबेज होते. प्रेसिडेन्सी कॉलेजातून तत्वज्ञान या विषयात बी. ए.च्या परीक्षेत ते पहिल्या वर्गात आले व त्यानतर दोन वर्षांत बी. एल. परिक्षा पास झाले

कॉलेजात असतानाच त्याचे वडील रामराव हे वारल्यानतर कोर्टाच्या भानगडीमुळे त्याना कोर्टाच्या कामाची बरीच माहिती झाली होती. त्यानीं काहीं दिवस वकिली केली पण तत्वज्ञान विषयाचे प्रोफेसर होण्याची त्याची उच्च महत्वाकाक्षा होती. या काळात ते स्वामी विवेकानंदाचे शिष्य बनले होते.

त्याच्या वयाच्या ४२ व्या वर्षी अर्बथनॉट बँकेचे दिवाळें निघाल्यामुळें बाळाजीरावाना चागलीच आर्थिक ठोकर बसली. तरीपण त्यानीं या सकटाला धैर्याने तोंड दिलें. काही मित्राच्या साहाय्याने त्यानी नुकत्याच निघालेल्या इंडियन बँकेत नोकरी धरली व लवकरच ते तेथील चीफ अकाउन्टट झाले बँकेचे सेक्रेटरी विद्यासागर पडया याच्याबरोबर काम करण्याने बँकाच्या व्यवहारातील भानगडी समजू लागल्या काही दिवसानी ते त्याच बँकेचे प्रमुख झाले.

बाळाजीरावाना वाचनाचा फार नाद असे त्यानीं ज्योतिषशास्त्र, हायड्रोपथी वगैरेचा अभ्यास केला होता. तसेच दुसऱ्याचे विचार ओळखणे वगैरेतही ते तरबेज होते. त्यांची राहणी साधी असून स्वभाव सरळ होता. ते म. ए फडाचे बरीच वर्षे उपाध्यक्ष होते.

इंडियन बँकेतून सेवानिवृत्त झाल्यावर ते इन्डो कर्नाटक बँकेचे सेक्रेटरी झाले. कामाच्या दगदगीमुळे त्याची प्रकृति पुढे ढासळली व ता. ३१-५-३५ रोजीं ते निधन पावले.

---

## रावबहादूर धर्मशील खजाना व्यन्कोबाराव

खजाना व्यकोबाराव हे खजाना रगराव ह्याचे चिरजीव असून त्याचा जन्म मदुरा येथें १८७९ साली झाला. त्याच्या पूर्वजानीं अर्काटच्या नबाबाकडे खजिनदार व दिवाण अशीं कामें केलीं होतीं म्हणून त्याच्या घराण्याचे नाव 'खजाना' असे पडले.

व्यकोबारावाचे सर्व शिक्षण मदुरा येथील नेटिव्ह कॉलेजात (सध्या यालाच मदुरा कॉलेज हे नाव आहे) झाले. १९०८ साली त्याचे वडील वारले व तेव्हापासून घरचा जमीनजुमला व इतर इस्टेट याची व्यवस्था पाहाण्याचे काम व्यकोबारावावर पडले

त्यानीं आपल्या इस्टेटीची व्यवस्था इतकी चागली ठेवली कीं, त्याच्या पूर्वजानीं रामेश्वर, धनुष्कोडी व इतरत्र स्थापलेल्या सस्था त्याना पुढें चालविता आल्या इतकेंच नव्हे तर या प्रसिद्ध क्षेत्रातील यात्रेकरूना होणारी त्याची उपयुक्तता त्याना वाढविता आली. पुराणमतवादी असूनही ते पुष्कळ ब्राह्मण व गरीब विद्यार्थ्यांना अन्नदान करीत व गरीब विद्यार्थ्यांस शाळा व कॉलेजची फी देत. त्याचा स्वभाव फार गोड व प्रेमळ होता. कोणीहि अनोळखी मनुष्य मदतीकरिता त्याचेकडे आला तर तो रिक्त हस्ताने परत गेला असे कधींहि होत नसे.

मदुरेतील प्रमुख नगरवासीयात त्याची गणना होई. ते बरेच वर्षे तेथील फर्स्ट क्लास बेंच मॅजिस्ट्रेट होते. मदुरा कॉलेज, मदुरा हिंदू पर्मनट फड, मदुरा डिस्ट्रिक्ट बोर्ड व रामेश्वर देवस्थान कमिटी या सर्वांशीं त्याचा सबध असून त्याकरिता त्यानीं प्रशसनीय कार्य केलें आहे,

त्याच्या धर्मादायाबद्दल त्याना १९२४ साली 'रावबहादूर' ही पदवी मिळाली. शिवाय

१९२६ साली शृंगेरी मठाचे श्रीशंकराचार्य मदुरेस आले होते त्या वेळीं त्यांनीं व्यंकोबारावास 'धर्मशील' ही पदवी दिली.

थोड्या दिवसांच्या आजारानंतर १९२८ डिसेंबरमध्यें ते इहलोक सोडून परलोकीं गेले.

---

## गोटवाद्य सखारामराव.

सखारामरावाचा जन्म तंजावर जिल्ह्यांतील मध्यार्जुनम् या गांवीं झाला. त्यांचे वडील गोटवाद्य श्रीनिवासराव हे होत. वडिलांनींच सखारामरावाना गोटवाद्य वाजविण्याचे शिकविलें. ते ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होते. शेवटच्या शिवाजी महाराजाच्या वेळचे प्रख्यात गवई खमाज माधवराव हेही त्याच घराण्यातलेच होते.

दक्षिण हिंदुस्थानात जे लोक प्रथम व्हायोलिन वाजवावयास शिकले त्यांत सखारामरावांची गणना होते. पुढें कांहीं दिवसानीं ते दोन्ही वाद्यें वाजविण्यांत पटाईत झाले. तिरुवादुतुरै मठांत त्यांची नेमणूक झाल्यावर ते तंजावर सोडून तिरुवडमरुदुर येथें जाऊन राहिले. सखारामराव लहान असताच त्यांचे वडील मरण पावले.

त्यावेळीं सखारामरावाचे चुलतभाऊ व्यंकोबाराव व रामराव हे दोघे तंजावरस रहात होते. ते व्हायोलिन, जलतरंग व मृदंग वाजविण्यात फार प्रवीण होते सखारामराव व्यंकोबारावाच्या हाताखालीं संगीत शिकले. पूर्वजन्मीच्या पुण्याईचे फळ म्हणून म्हणा, किंवा आनुवंशिक संस्कारामुळें म्हणा किंवा स्वप्रयत्नाने म्हणा, सखारामराव गोटवाद्य अप्रतिम वाजवीत हें खरें आहे. त्यांचा उत्साह व अभ्यास दांडगा होता.

सखारामराव, गोटवाद्य डाव्या हातातील चिंचेच्या लहान रुळाने व उजव्या हाताच्या नखांनीं वाजवीत असत. इतराप्रमाणे ते नख्या कधीही वापरत नसत.

रागालापन्, कृति किंवा तहानम् वाजवण्यातहि ते पटाइत होते. विशेषतः शंकराभरण, केदारगौळ, भैरवी, बिलहरी, तोडी, श्री व कल्याणी हे राग तर ते बहारीनें वाजवीत. ते 'नादोपासक' होते असें म्हणत.

वाजवायला लागले कीं ते त्यांत तल्लीन होऊन जात असत. १९१८ सालीं सर एडविन मॉन्टेग्यू याना मद्रासेकडील जमिनदारानीं पार्टी दिली त्यावेळीं सखारामरावांचा जलसा करवण्यात आला.

वडिलाप्रमाणेंच सखारामराव व्हायोलिन वाजविण्यातहि प्रविण होते. आपले बंधू हरिराव यास व्हायोलिन वाजविण्यात त्यांनीं पारंगत केले. हरिराव, व सखारामरावाचा मुलगा श्रीनिवासराव हे दोघे तिरुवडमरुदुर येथें राहून आपल्या पूर्वजाच्या कलेची उपासना मोठ्या उत्साहानें करीत आहेत.

सखारामराव चांगले प्रकृतीने सुदृढ असून दिसण्यात अत्यंत रुबाबदार होते. ते दत्तोपासक होते. त्यांचा स्वभाव परोपकारी होता. पैशाची कदर ते बाळगीत नसत. पण आपला दर्जा कायम राखण्यासाठीं ठरलेले पैसे हातीं आल्याशिवाय व जलशात मुळींच शांतताभंग होणार नाहीं अशी अट कबूल करून घेतल्याशिवाय ते बाहेर पडत नसत. थोडाबहुत गोंगाट झाला कीं, ते वाजविणे बंद करीत. आपल्या वयाचे एकुणपन्नासाव्या वर्षी म्हणजे ( १९३० ) सालीं ते मरण पावले.

---

# मृदंगम नारायणस्वामी अप्पा

तंजावर येथील शेवटच्या मराठा राजाच्या वेळीं ज्या मराठा क्षत्रिय घराण्यातील लोकांनीं मोठी जबाबदारीची कामे केली अशा घराण्यामध्यें 'अप्पा' घराण्याची गणना होते. नारायणराव स्वामी अप्पा यांचे घराणे जाधव कुळीचे असून त्याचा जन्म तंजावरास झाला.

तरुणपणीं ते नकलाकार होते. शिवस्वामी अप्पाजवळ प्रथम थोडाबहुत मृदंग वाजवण्यास शिकले. निरनिराळी गाणीं ते आपल्या खणखणींत आवाजात गात श्रुति व स्वराचें दुर्मिळ असें ज्ञान त्यास होतें, व ज्ञानामुळें लय व ताल यामध्यें त्याचा हात धरणारा नव्हता.

मन्नारगुडी येथील भीमारुती स्वामींच्या मठात ते उत्तम मृदग वाजवावयास शिकले. मारुतीने स्वप्नात येऊन शनिवारचें भजन कर व मला स्मर म्हणजे तुला आत्मप्रचीति होईल असें त्यास सांगितलें असें म्हणतात.

ग्वाल्हेरचे कीर्तनाचार्य रामचंद्रबाबा मोरगावकर व त्याणे पुत्र विष्णुबाबा तंजावरास चातुर्मासात कीर्तने करीत होते तेव्हा पखवालजीचें काम नारायणस्वामी करीत असे.मृदग वाजावणे ही त्याना ईश्वरदत्त देणगीच होती त्याच्या पखवाजातून निघालेले सूर तर गोड लागतच; पण हरिदासाशीं एकतानता पावून ते मृदग असा वाजवीत कीं दोन्ही तालाचा पूर्ण मिलाफ झालाच पाहिजे.

वीणा किंवा जलतरग याचीं मृदंगाने साथ धरणें फार अवघड आहे. पण महावैद्यनाथ अय्यर, पट्नम् सुब्रह्मण्य अय्यर व तोडी सुदररावासारखे गाणारे, शरभ शास्त्र्यासारखे फ्ल्यूट वाजविणारे, मोरगावकर व कृष्ण भागवत यासारखे कीर्तनकार, वीणा शेषम्मा, वैद्यनाथ अय्यर व कृष्ण अय्यर यासारखे वीणा वाजविणारे, जलतरग, वाजविण्यात पटाईत असलेले वेंकोबाराव व प्रसिद्ध सारगीवाले सारन्द नाईक या सर्वांची मृदगावर साथ धरणे एकट्या स्वामींनाच साधत असे.

मोठ्या अभ्यासानें व दीर्घ प्रयत्नाने सुस्वर गायन व लय, ताल प्रस्तार या दोन्ही कलेंत ते निष्णात झाले. त्यानीं आपल्या घरींच एक भजनीमंडळ काढले.या भजनास उत्तम गवई व वाद्यप्रवीण लोक जमा होत असत. त्याना शुद्ध मराठी बोलता येत असे.दासबोधाचीं तें पारायणें करीत. ते सदाचारी असून निस्सीम रामभक्त होते. त्यानीं मृदग वाजविण्याची कला पुष्कळास शिकवली पण त्याची बरोबरी केव्हाहि कोणालाहि करता आली नाहीं एकाच वेळीं स्वतः गाऊन ते मृदंग वाजवीत असत. पुष्कळ म्हातारे झाल्यावर त्याना मृत्यु आला, पण दुर्दैवानें त्याचे वशज असे कोणीच राहिले नव्हते.

निरनिराळे सूर लावून तयार असलेले आठदहा मृदग नेहमीं त्याच्याजवळ असत. प्रत्येक मृदग एका सुराला चागला लागला कीं त्याचा सूर ते कधीं बदलत नसत. जलद्याचे सुरवातीस मृदगास सूर लावण्याच्या भानगडींत तें पडत नसत कारण ठोकाठोकीमुळें मृदग खराब होतो हे त्याना चागलें अवगत होतें. आपल्या बोटाचीहि ते चागली निगा राखीत.

त्याना पाहिलें कीं लोकाना त्याचेविषयीं आदर व भक्ती वाटे. रामन डचे राजे व त्याचे बंधु पडितराय यानीं स्वामींना उत्तेजन व आश्रय दिला. एकदा मद्रासला तजावरच्या कृष्ण-भागवताच्या कीर्तनास त्यानीं साथ धरली होती, त्या वेळीं माजी न्यायमूर्ति सुब्रह्मण्य अय्यर यांनीं त्यांची फार तारीफ केली. सेतुबावाच्या मठात दरवर्षी रामनवमीला तेंच मृदग वाजवीत असत. त्यांचे मृदंगवादन ऐकून प्रसिद्ध नन्नुमियाची आठवण होई. वाजवीत असतांना ते

तोंड वेडेवाकडे कधींहि करीत नसत किंवा उगीच हातवारेहि करीत नसत. त्यानीं मृदंग वाजविणाऱ्याचा दर्जा वाढवला इतकेच नाहीं तर त्याची प्रतीहि वाढविला. मृदंग वाजताना त्याचे शिष्य योगनाथ व स्वामीनाथ तंबोऱ्याची साथ धरत असत.

त्याचे आयुष्य मोठ्या सुखाचे गेले. नियमित राहून चागले खावे प्यावें असा त्यांचा नियम असे. कोठेंहि असले तरी स्वामींना पिण्यासाठीं व स्नानासाठीं 'शिवगंगा' नदीचे पाणी लागे. अशा या गुणी कलावताला तीस वर्षांपूर्वी (१९०६) देवाज्ञा झाली.

---

## बालसरस्वती जगन्नाथ भटगोस्वामी

जगन्नाथ स्वामी 'तस' हे उत्तर हिंदुस्थानी वाद्य वाजविण्यात फार प्रविण होते व कर्नाटकी संगीत या वाद्यावर कसें वाजवावे हें त्यानींच प्रथम दाखविले. शकराभरण राग वाजविण्यात तर त्याची फार ख्याती होती. तस हे फारसी नाव आहे. तसाचा नाद मधुर व स्वामींची चलाख बोटें, मग काय विचारता ! त्याच्या वादनाच्या जलशाना महावैद्यनाथ अय्यर यासारखे तत्कालीन संगीतज्ञ मोठ्या औत्सुक्याने हजर राहात शरभ शास्त्र्यांनी फ्लूटला, गोटवाद्यस् सखारामरावानीं गोटवाद्यास जसे जलशातील मुख्य वाद्याच्या स्थानाप्रत नेले तसेच जगन्नाथस्वामींनीं तसाला जलशातील मुख्य वाद्याचे स्थान मिळवून दिले.

---

## बदामी कृष्णराव

बदामी कृष्णराव हे रावबहादुर लक्ष्मणराव याचे द्वितीय चिरंजीव होत. रावबहादुराचे घराणे पुरातन काळापासून लढवय्ये वीरवृत्तीचे होते व खुद्द रावबहादुरानीहि स्वतः सत्तावन सालचे बडाचे वेळीं रेसिमेंटदार म्हणून नाव कमाविले होते. कृष्णरावाचा जन्म १८५१ सालीं झाला. त्याचे शिक्षण म्हैसूर संस्थानात झाले व सर के शेषाद्री अय्यर म्हैसूरचे दिवाण असताना ते संस्थानच्या नोकरींत शिरले. निरनिराळ्या जिल्ह्यात मुलकी अधिकाऱ्याचे काम करून ते १८९९ सालीं असिस्टंट कमिशनर झाले बरीच वर्षे ते बंगलोर म्युनिसिपालिटीचे उपाध्यक्ष होते. १८९८–९९ सालीं प्लेग ऑफिसर म्हणून त्यानीं फार चागले काम केले, मुलकी खात्यात आपली हुशारी व कार्यतत्परता या गुणाच्या जोरावर त्यानीं प्रशसनीय काम करून १९०८ सालीं ते सेवानिवृत्त झाले.

बदामी कृष्णराव हें बरींच वर्षे स्थानिक शेतकी संस्था व सेन्ट जॉन्स ॲम्ब्युलन्स असोसिएशनचे सेक्रेटरी होते. त्याना फुलझाडे लावण्याची फार आवड असून स्वतः बागाइतीचे काम करण्याची हौस होती. नोकरी सोडल्यावर चित्रकला व खोदकाम करण्याचा त्याना नाद लागला. कृष्णरावांचें कानडी भाषेवर फार चागलेच प्रभुत्व होते त्यानीं केलेले 'रॉबिन्सन क्रूसो' या इंग्रजी पुस्तकाचें भाषातर अद्यापि प्रसिद्ध आहे. रामायण, महाभारत व भागवत त्यानीं कानडी कवितेत लिहिलीं आहेत. शिवाय लहान मुलाकरिता काहीं छोटीं नाटकें व कविताहि त्यांनीं रचल्या, आहेत. आपल्या वयाच्या ८६ व्या वर्षी म्हणजे जून १९३७ मध्यें ते निधन पावले. आपली सर्व मुले मोठमोठ्या हुद्यावर काम करीत असून आपल्या घराण्याची परंपरा उत्तम प्रकारें पुढें चालवीत आहेत हें पहाण्याचे भाग्य सुदैवानें त्याना लाभलें होतें.

# दि. ब. टी. वेंकटस्वामीराव

दि. ब. टी वेंकास्वामीराव यांचा जन्म १७२९ साली तंजावरास एका देशस्थ घराण्यात झाला. वेंकास्वामीराव हे पाच बुद्धिमान भावापैकी चौथे होते, त्याचे वडील बंधू रामचंद्रराव हे नामांकित मराठी कवी होते. दुसरे बंधू कृष्णराव हे प वा. दि. ब आर. रघुनाथराव याचे बरोबर ज्या लोकाना प्रथमच डेप्युटी कलेक्टर नेमण्यात आले त्यापैकी एक होते, तिसरे बंधु उत्तम संगीतज्ञ व टीकाकर असून डबीर घराण्यात दत्तक गेले होते व पाचवे बंधू रा ब. टी. गोपाळराव हे प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ होते

वेंकाटस्वामी याचे शिक्षण प्रथम तंजावर येथे देवाजीराव याचेकडे झाले अठराव्या वर्षी तंजावरच्या कलेक्टर कचेरीत त्याना नोकरी मिळाल्यावर लवकरच ते तेथील हेड शिरस्तेदार झाले. हेड शिरस्तेदाराचे काम त्यांनी १३ वर्षे केले चातुर्य व सचोटी या वेंकास्वामीरावाच्या गुणामुळे कलेक्टरचे मत त्याविषयी फार चांगले झाले

जमाबंदी, मीठ, व अबकारी इत्यादि जिल्हा कारभारच्या बाबीबद्दल त्याना फार चांगलीच माहीती होती. सरकारी कामात ते कनिष्ठाशी सभ्यतेने वागत व वरिष्ठाशी स्पष्ट व मनमोकळे पणाने बोलत. पुढे मद्रासच्या रेव्हिन्यु सेक्रेटरीएटमध्ये मुख्य मदतनिसाचे जागेवर नेमणूक झाली व या कामात मद्रासच्या गव्हर्नराचा विश्वासहि त्यानी संपादिला होता

सरकारी नोकरीत असताना १८७६ च्या मिठाच्या चौकशी कमिशनवर हिंदुस्थानसरकारने त्याची नेमणूक केली होती कमिशनने बहुमताचे सर्व मीठ सरकारने बनविण्याचे त्या वेळची पद्धत सोडून जकातीची पद्धत सुरू करावी असा अभिप्राय दिला होता. वेंकास्वामी भिन्नमतपत्रिका लिहून जकातीच्या पद्धतीने लोकाना अवश्यक असे हे मीठ माफक दरात मिळेल अशी खात्री नाही असे दाखविले काही दिवसांनी जकातीच्या पद्धतीबरोबर काही मीठ सरकारने बनविण्याची पद्धत सुरू करावी लागली यावरून त्याचे म्हणणे सयुक्तिक होते असे सिद्ध झाले.

यानतर तंजावर डिस्ट्रिक्ट मॅन्युएल तयार करण्याचे कामावर वेंकास्वामीराव याची योजना झाली. हे मॅन्युअल त्याच्या अविश्रांत परिश्रमाची व संशोधनाची साक्ष देते नतर १८८५साली मद्रास सरकारने जमीनमहसूल कायद्याच्या सुधारणेसाठी नेमलेल्या कमिटीचे ते चिटणीस होते. क्लार्कसाहेबानी केलेल्या तंजावरच्या नवीन धारेबंदीबाबत त्यानी लिहिलेले टाचण प्रशसनीय व उपयुक्त असे आहे १८७७ च्या महाराणीच्या दरबाराचे वेळी त्यास 'पदक' देण्यात आले व १८८५ साली सेवानिवृत्तीच्या पूर्वी 'दिवाणबहादूर' ही पदवी त्याना देण्यात आली सेवानिवृत्तीचे वेळी मद्रास सरकारने चातुर्य, उत्साह व कर्तव्यनिष्ठा या त्याच्या गुणाची प्रामुख्याने प्रशंसा केली

दि. ब. टी. वेंकास्वामीराव १८८५ मध्ये सेवानिवृत्त झाल्यानतर २१ वर्षे त्यांनी पेन्शन उपभोगले. पण पुढे काही तरी काम असावे या हेतूने म्हणून काळहस्ती व रामनाड या दोन जमिनदाराची दिवाणगिरी काही दिवस त्यानी केली. परतु १८९७ साली त्याना वार्धक्यामुळे हे कामही सोडून द्यावे लागले. अखेरचा काल त्यानी शातपणे ईशचिंतन करण्यात घालविला.

वेंकास्वामीरावाना वीणा वाजविण्याचा फार नाद असे. भैरवी, मुखरी, शकराभरण व आनंदभैरवी हे राग त्याना फार आवडत असत. त्याना संगीताचे ज्ञान बरेच असून त्यानी देवगोस्वामी, जगन्नाथ भटगोस्वामी, वेंकटेशय्या वगैरे संगीतज्ञास वेळोवेळी बोलावून मदत केली, वरगत व व्हायोलिन त्याना वाजविता येत असे असे म्हणतात.

नियमितपणाबद्दल त्याची फार ख्याती असे. ते मिताहारी असून औषधें पथ्यपाणी वगैरेंची त्याना चांगली माहिती होती.

ते फार राजनिष्ठ होते. त्यांनीं प्रथम तंजावरास एक मृत्युपत्र केलें होते पण अशानें सरकारची प्रोबेट फी बुडेल म्हणून मद्रासला तेंच मृत्युपत्र पुन्हा लिहिले; यामुळें त्यांच्या वारसाना प्रोबेट घेण्याकारिता १५०० रु. फी द्यावी लागली.

वयाच्या अठ्याहत्तराव्या वर्षीं ता. ४–६–१९०८ रोजीं त्याचें देहावसान झालें.

# राजभूषण कर्पूर श्रीनिवासराव

बंगलोरच्या एका पुरातन व सुखवस्तू महाराष्ट्रीय घराण्यात श्रीनिवासरावांचा जन्म गेल्या शतकाच्या सहाव्या दशकात झाला. त्यांच्या एका पूर्वजांनी तिरुपतीच्या टेकडीच्या पायथ्यापासून वरपर्यंतच्या प्रत्येक पायरीवर कापराचे मोठे खडे एकदा जाळले म्हणून त्याच्या घराण्यास कर्पूर हें नाव पडलें.

कॉलेजातील अभ्यासक्रम संपल्यावर ते एंजिनिअरिंगची परीक्षा पास झाले व मुंबई इलाख्यात त्याना नोकरी मिळाली. हळूहळू वाढत जाऊन ते सुपरिन्टेन्डिंग इंजिनियरही झाले होते. सर एम. विश्वेश्वरय्या जेव्हा म्हैसूरचे दिवाण झाले तेव्हा श्रीनिवासरावाची म्हैसूर संस्थानच्या चीफ एन्जिनियरच्या जागेवर नेमणूक झाली. कन्नम्बडी येथील धरण बांधण्याचें कामात व यासंबंधात मद्रास सरकारशीं महत्त्वाची वाटाघाट करण्याचे कामात त्यांनीं म्हैसूर सरकारची चांगली कामगिरी बजावली आहे. त्यांच्या चांगल्या कामावरुन म्हैसूरच्या महाराजांनीं त्याना 'राजसभा भूषण' ही पदवी दिली. १९२३ मध्यें सेवानिवृत्त होण्यापासून ते आपला काळ संस्कृत भाषा व हिंदी तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास करण्यात घालवीत.

श्रीनिवासराव अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते १८९३ सालीं अमेरिकेस जाण्याचे पूर्वी स्वामी विवेकानंदास भेटण्याचा सुयोग त्याना प्राप्त झाला होता. तेव्हांपासून त्याना संस्कृत विद्येची आवड उत्पन्न झाली. त्यांच्या संस्कृतच्या ज्ञानाबद्दल पुष्कळ शास्त्रीपंडितांनीं त्याची वाहवा केली. त्यांच्या संस्कृत पारंगतेबद्दल त्याना 'विद्याभूषण' ही पदवी देण्यात आली होती.

वृद्धापकाळीं त्यांनीं पुष्कळ धार्मिक व्याख्यानें दिलीं त्यांनीं केलेले तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या संप्रदायाचे विवरण सुबोध असून श्रोत्याचे मनास पटत असे.

त्यांच्या निकटवर्ति लोकास त्याचे संभाषण बोधपर व विचारप्रवर्तक होई. शेवटीं शेवटीं ते मध्वसिद्धान्त ओजाहिनी सभेच्या कार्यात पुष्कळ लक्ष घालीत असत. बरेच वर्षे ते या सभेचे उपाध्यक्ष होते. १९३२ सालीं ते निधन पावले. त्यांच्या निधनानें त्यांच्या पुष्कळ मित्रास व चाहत्यास फारच हळहळ वाटली.

# के. रंगनाथराव

दक्षिण हिंदुस्थानांतील फार श्रीमान व सुसंस्कृत गृहस्थात श्री. के. रंगनाथराव यांची गणना होते. हे कृष्णरावाचे चिरंजीव. श्री. कृष्णरावानीं कुम्भकोणम् येथें एक अग्रहार बांधले व त्यास कृष्णरावांचेच नाव दिलें आहे. हें अग्रहार अजून चालू आहे.

रंगनाथराव यानीं कुम्भकोणम् येथील सरकारी कॉलेजांत आपलें शिक्षण पुरें केलें. बी. ए. झाल्यावर नोकरीच्या भानगडींत ते पडले नाहींत. सुखानें व समाधानानें राहून त्यांनीं आपला वेळ विद्येस उत्तेजन देण्यात घालविला. त्याना संस्कृत विद्येची फार आवड होती व वेदशास्त्रपारंगत पण्डितांस ते मदत करीत. अज्ञात व बुद्धिमान लोकाना हुडकून काढून सहाय्य करण्याची त्यांना आवड होती, अजूनसुद्धा पुष्कळ गरीब विद्यार्थी त्यांनीं केलेल्या अनवरताच्या मदतीबद्दल त्यांना दुवा देतात.

संस्कृत व मराठी भाषांचा त्यांचा अभ्यास दांडगा होता व बरींच वर्षें ते मद्रास युनिव्हर्सिटींत या विषयाचे परीक्षक होते.

भक्तिमार्गी असल्यामुळें त्यांना भजन व कीर्तनाचा नाद असे. त्याच्या घरीं पुष्कळ प्रसिद्ध हरिदासानीं कीर्तनें केली. त्यानीं कावेरीच्या तीरावर एक विठोबारखुमाईचें देवालय बांधलें व देवाच्या पूजाअर्चेसाठीं पुरेशी जमीन तोडून दिली आहे.

विनयामुळें लोकात पुढें पुढें येण्याची त्याना इच्छा नव्हती. पण ते कुम्भकोणम् म्युनिसिपालिटीचे सरकारनियुक्त सभासद होते. शिवाय ते गावातील हायस्कूल कमिटीचे सभासद असून बरेच दिवस चिटणीस होते.

कावेरी नदीस एकदा पूर आला असताना त्यानीं स्वखर्चानें एक बांध घातला व त्यामुळें गावांत पाणी येऊं शकलें नाहीं. या त्याच्या लोकसेवेबद्दल कलेक्टरसाहेबानीं त्याची फार प्रशंसा केली.

साठावें वर्ष लागण्यापूर्वीच हृदयाचे विकारानें त्याना अकस्मात मृत्यु आला. त्याचे मागे श्री. के. आर. रघुनाथराव (हे म. ए. फंडाचे तहहयात. सभासद आहेत) व श्री. के. आर. रामचंद्रराव हे त्याचे मुलगे टापटिपीनें राहून दानधर्म करण्यात अग्रगण्य आहेत.

---

# दक्षिण हिंदुस्थानांतील प्रसिद्ध महाराष्ट्रीयांची चरित्रें

## हयात

## रावसाहेब 'उदारशिरोमणी' टी. पद्मनाभराव एफ. आर. एस. ए. (लंडन.)

टी. पद्मनाभराव यांचा जन्म त्रिवेंद्रम् येथील एका प्रसिद्ध घराण्यात १८६४ सालीं झाला. ते दिवाण टी. रामराव याचे पुत्र होत. त्रिवेन्द्रम् व कोट्टायम् येथें शिक्षण घेऊन १८८७ सालीं ते त्रावणकोर संस्थानच्या नोकरींत शिरले. त्यांनीं संस्थानांत निरनिराळ्या खात्यांत कामें केलीं. अन्चल सुपरिन्टेन्डन्ट असताना त्यांनीं ऑफिसात सरकार सेव्हिंग्ज बँक सुरू केली. त्रावणकोर व कोचीन यामधील हुण्ड्यांचा व्यवहार सुरू करण्याचें श्रेय यानाच आहे. १९१९ सालीं सेवानिवृत्त झाल्यापासून ते सार्वजनिक कार्यांत विशेष लक्ष घालतात. सहकारी चळवळीचे हे प्रामुख्यानें भाग

येतात, व इवेघर को-ऑपरेटिव्ह चौकशी कमेटीचे ते उपाध्यक्ष होते. तसेच त्यांनी रामराव डिस्पेन्सरीची सुधारणा केली. त्याप्रमाणें गरीब विद्यार्थ्यांची मोफत जेवणाची सोय करून अनेक उपयुक्त कार्यांत पुष्कळ मदत केली आहे. १९२७ सालीं ब्रिटिश सरकारने त्यास रावसाहेब ही पदवी दिली. त्यांचा धर्मादाय इतका मोठा आहे, कीं त्रावणकोर महाराजांनीं त्यास ' उदारशिरोमणी ' ही पदवी दिली आहे. ते लंडनच्या रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्स या संस्थेचे फेलो असून म. ए. फंडाचे पेट्रन आहेत.

---

## रावसाहेब टी. सांबमूर्तिराव

टी. सांबमूर्तिराव डेप्युटी कलेक्टर टी. कृष्णराव यांचे चिरंजीव होत. यांचा जन्म १८६९ सालीं तंजावर जिल्ह्यांत झाला. कुम्भकोणम् कॉलेजांतून १८९० सालीं बी.ए झाले. व या परीक्षेंत इंग्रजींतील प्राविण्याबद्दल बोर्शप सुवर्णपदक त्यांना मिळालें. कायद्याची परीक्षा पास झाल्यावर १८९८ सालीं ते तंजावरास परतले. तंजावर पर्मनंट फंडाचे ते सुरुवातीपासूनचे डायरेक्टर होते व पुढे १९२३ सालीं त्या फंडाचे अध्यक्ष झाले. तंजावरच्या सर्फोजी महाराजांच्या सरस्वती महाल ग्रंथालयाचे बरेच वर्षे चिटणीस आहेत. ग्रंथालय विषयक त्यांच्या बहुमोल कामगिरीबद्दल सरकारनें त्यास रावसाहेब ही पदवी १९२७ सालीं दिली. सार्वजनिक कार्यांत ते पुढाकार घेत. व म. ए. फंडाचेहि ते बरीच वर्षे डायरेक्टर होते.

---

## रा. ब. के. आनंदराव एम्. ए, [ केंब्रिज ]

के. आनंदराव हे दि. ब. सी. कृष्णस्वामी राव यांचे द्वितीय चिरंजीव होत. यांचा जन्म मद्रास येथें १८९३ त झाला. हिंदू हायस्कूल ट्रिप्लिकेन व मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत उच्च शिक्षण घेऊन ते १९१४ सालीं बी. ए. झाले. नंतर पुढील शिक्षणासाठीं ते विलायतेला गेले. केंब्रीज येथील किंग्ज कॉलेजांत अध्ययन केल्यावर १९१६ सालीं त्यांनीं गणीताचा 'ट्रायपास' घेतला. १९१८ सालीं त्यांना स्मिथ प्राइझ मिळालें. हिंदुस्थानांत परत आल्यावर त्यांना मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत गणिताचे प्रोफेसर म्हणून नेमण्यांत आलें. प्रोफेसर म्हणून विद्यार्थ्यांना ते फार प्रिय झालें आहेत, मद्रास युनिव्हर्सिटींत होणाऱ्या गणितांतील संशोधनाचे बहुतेक काम आनंदरावांच्या नेतृत्वाखालीं चाललें आहे. ते सध्या प्रेसिडेन्सी कॉलेजचे ॲक्टिंग प्रिन्सिपॉल असून या वर्षी राज्यारोहण दिनानिमित्त झालेल्या पदवीदानांत त्यांना 'रावबहादुर' ही सन्मानाची पदवी मिळाली आहे रा. ब. आनंदराव हे बऱ्याच वर्षांपूर्वी म. ए. फंडाचे आजीव सभासद झाले आहेत.

---

## रावबहादूर आर. कृष्णराव भोसले आय. एस. ओ.

मद्रास येथील पुष्कळ लोकास रावबहादूर परिचित असतीलच. शैक्षणिक, सामाजिक, किंवा आर्थिक उन्नतीसाठीं चाललेली कोणतीहि चळवळ घ्या, त्यांत रावबहादूर महत्त्वाचा भाग



टी. लक्ष्मणराव बी. ए., डी. आय्. सी.,
रिटायर्ड, गव्हर्मेंट आसिस्टंट केमिस्ट,
शेतकी कॉलेज, कोईमतूर



रावबहादुर आर. कृष्णराव भोसले. एस्. आर. ए. एस्.
रिटायर्ड सेक्रेटरी टू दि कमिशनर फॉर गव्हर्मेंट एक्झॅमिनेशन्स
मद्रास व डायरेक्टर म. ए. फंड. १९२५-३३



रावबहादुर के. आनंदराव एम्. ए., (कॅंटब.)
प्रोफेसर प्युअर मॅथेमॅटिक्स्, प्रेसिडेन्सी कॉलेज, मद्रास.

घेत आहेत असे आढळून येईल वयाला साठ वर्षे होऊन गेली पण अजून त्यांची काम करण्याची हिम्मत प्रशंसनीय असून उत्साह तर त्यापेक्षा दांडगा आहे

त्यांचा जन्म १८७६ च्या जूनमध्ये तंजावरास झाला सेंट पिटर्स कॉलेजमध्ये आपला शिक्षणक्रम पुरा करून ते मद्रासला आले मद्रासला आल्यावर त्यांनी सरकारी परीक्षांच्या कमिशनरच्या कचेरीत नोकरी धरली सुस्वभाव व कार्यतत्परता या आपल्या गुणामुळे ते कचेरीतील मॅनेजरच्या जागेपर्यंत चढले पुढे तेथच दुय्यम चिटणीस झाले सेवानिवृत्त झाल्यावर त्यांना चिटणीसाचा हुद्दा देण्यात आला

बालवीर चळवळीत ते प्रामुख्याने भाग घेत असत व या कार्याबद्दल त्यांना 'थॅक्स बॅज' देण्यात आले आहे पुढे ते डिस्ट्रिक्ट स्काउट कमिशनर झाले पुष्कळ शिक्षणसंस्था व विद्वत्परिषदांशी त्यांचा निकटचा संबंध आहे ते रॉयल एशिआटिक सोसायटीचे सभासद असून मद्रास, आन्ध्र व अन्नामलय युनिव्हर्सिट्यांच्या सेनेट व ॲकेडेमिक कौन्सिलांचेहि सभासद आहेत व तेथील हिंदी, मराठी व इतर भाषांच्या बोर्ड ऑफ स्टडीजचे ते अध्यक्ष आहेत मद्रास येथील चिल्ड्रेन्स एड सोसायटी बंधमुक्त कैद्यांना मदत करणारी संस्था व प्राणिक्लेश निवारक संस्था यांशी त्यांचा निकट संबंध असून या संस्थांनाचे पुष्कळ काम ते करतात वॉरन हेस्टिंग्ज व भगवद्गीता, प्राचीन हिंदुस्थानातील वीज व लोहचुम्बकत्व, शिकंदर बादशहा, व ब्रह्म सन्यासी इत्यादि निरनिराळ्या विषयांवर त्यांनी भाषणे केली आहेत व लेख लिहिले आहेत

त्यांच्या या विविध कार्याकरिता सरकारने त्यांना प्रथम 'रावसाहेब' ही व नंतर 'रावबहादूर' व त्याहीनंतर आय. एस ओ अशा पदव्या दिल्या आहेत ते म ए फंडाचे गेलीं बरीच वर्षे सभासद आहेत

---

## डॉ. के. वासुदेवराव एम. डी. एम. आर. सी पी.; टी. डी.डी

सेलम येथील एका घरंदाज घराण्यात १८९६ साली केशवरावांचा जन्म झाला बालपणाचे शिक्षण कडप्पा जिल्ह्यातील प्रोद्दतूर या गावी झाल्यावर मद्रास येथील वेस्लेयन मिशन हायस्कुलातून १९११ सालीं ते मॅट्रिक परिक्षा पास झाले ख्रिश्चन कॉलेजात आर्टस कोर्सचा अभ्यास करून ते १९१७ साली मद्रासच्या मेडिकल कॉलेजात शिक्षण घेऊ लागले १९२२ सालीं एम बी बी एस च्या परिक्षेत वैद्यकीय कायदेशास्त्र, वैद्यकी व मिडवाइफ्री या विषयामध्ये त्यांनी प्राविण्य संपादले मेडिकल कॉलेजातील पाच वर्षांच्या आयुष्यक्रमात त्यांना ६ बक्षिसे, ३ पदके व ६ प्रशस्तिपत्रके मिळाली परीक्षेत पहिल्या वर्गात ते पहिले आले परीक्षेनंतर जनरल हॉस्पिटलमध्ये हाउस सर्जनचे काम करीत असतानाच १९२४ मध्ये ते एम डी ची. परिक्षा पास झाले. १९२५ साली तिण्डिवनम् येथे ॲसिस्टंट सर्जन म्हणून त्यांची नेमणूक झाली व लवकरच मद्रासला बदली झाली तेथे सर्जरीच्या अध्यापकाचे ॲसिस्टंट म्हणुन प्रथम व नंतर मेडिसिनच्या अध्यापकाचे ॲसिस्टंट म्हणून त्यांनी काम केले १९२९ सालीं रायपेट्याच्या क्षयरोग्यांच्या इस्पितळावर रेसिडेंट मेडिकल ऑफिसर म्हणून त्यांची नेममणुक झाली त्या जागेवर ते १९३३ पर्यंत काम करीत होते

कोकोनाड्यास सुमारे दीड महिना काम करून ते पुढील अभ्यासासाठी विलायतेस गेले तेथे क्षयरोगचिकित्सा हा विषय घेऊन एडिंबरा येथील एम आर सी पी व वेल्स युनिव्हर्सिटीचे टी. डी. डी झाले जुलई १९३५ मध्ये परत आल्यावर एग्मोर येथील ट्यूबर्क्युलॉसिस

इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर व रॉयपेट्याच्या हॉस्पिटलवर सुपरिन्टेन्डेन्ट म्हणून त्यांची सरकारनें नेमणूक केली. डॉ. मुतु यांची टयू सॅनटोरियम सरकारने चालवावयास घेतली तेव्हा तिच्या सुपरिंटेडेन्टचें कामही त्यांनाच देण्यात आले आहे.

---

## रा. सा. डॉ. टी. माधवराव, बी. ए, एल. आर. सी. पी. ॲन्ड एस. (एडिन्बरो)

डॉ माधवराव हे रा.ब.टी. सुन्दरराव याचे चिरजीव असून त्याचा जन्म ता २६ १०-१८७८ रोजी झाला त्याचे बी ए. पर्यतचे शिक्षण त्रिचनापल्ली येथे झाले तेथील सेन्ट जोसेफ्स कॉलेजातून १८९९ साली ते बी ए परीक्षा पास झाले नंतर विलायतेस जाऊन एडिन्बरो येथे १९०६ साली एल. आर सी पी ॲण्ड एस ची परीक्षा पास झाले.

हिंदुस्थानांत परत आल्यावर प्रथम मद्रास जनरल हॉस्पिटलात ॲसिस्टट सर्जन म्हणून त्याची नेमणूक झाली शस्त्रक्रियेतील त्याचे प्राविण्य प्रसिद्ध आहे उत्तर सरकारप्रात व सीडेड डिस्ट्रिक्ट्समध्ये त्यानीं बरेच दिवस नोकरी केली आहे १९२१ सालच्या पुष्करम् जत्रेच्या वेळीं त्यानीं केलेल्या कामाबद्दल सरकारने १९२२ साली त्याना ‘ रावसाहेब ’ ही पदवी दिली.

१९२७ पर्यंत निरनिराळ्या ठिकाणी डिस्ट्रिक्ट मेडिकल ऑफिसरचे काम केल्यावर विजगापट्टम् येथील मेडिकल कॉलेजात ते प्रोफेसर झाले. १९३२ साली त्याची विजगापट्टम् येथील डिस्ट्रिक्ट मेडिकल ऑफिसर म्हणून नेमणूक झाली व १९३३ साली त्याना सिव्हिल सर्जनचा हुद्दा मिळाला व ऑक्टोबर १९३३ मध्यें ते सेवानिवृत्त झाले. सध्या ते विजगापट्टम् येथेंच राहात असतात

---

## एन. केशवराव.

श्री एन केशवराव, बी. ए, बी. सी ई. याचा जन्म म्हैसूर संस्थानातील हसन जिल्ह्यातील बेलूर या इतिहास प्रसिद्ध गावीं १८८९ साली झाला. वेस्लेयन हायस्कुलात शिक्षणक्रम पुरा करून ते मॅट्रिकची परिक्षा पास झाले नतर बगलोरच्या सेन्ट्रल कॉलेजातून १९०९ साली ते बी. ए. झाले. तदनतर मद्रासच्या एंजिनियरिंग कॉलेजात चार वर्षे त्यानीं शिक्षण घेतले. बी. सी. ई च्या परीक्षेत ते पहिले आले म्हणून त्याना १९१४ साली मद्रासच्या पी. डब्ल्यू. डी. त ॲसिस्टन्ट एंजिनिअरची जागा मिळाली.

त्याच्या दिर्घकालीन उत्तम कामाबद्दल १९३५ साली सिल्व्हर जुबिली मेडल व १९३७ साली कॉरोनेशन मेडल हीं त्याना देण्यात आलीं.

ते सध्या त्रिचनापल्ली येथे एक्झिक्यूटिव्ह एंजिनिअरच्या हुद्यावर आहेत.

---

## मराठा एज्युकेशन फंडाचे डायरेक्टर्स



ई. राजा राम राव, एम. ए., बी. एल.
इंडियन ऑडिट व अकौंटस् सर्व्हिस,
असि. कंट्रोलर ऑफ कस्टम्स, कलकत्ता.



एन्. केशव राव, बी. ए., बी. सी. ई., आय. एस. ई.
एक्झिक्युटिव्ह इंजिनिअर, त्रिची.



एस. एस. राघवेंद्र राव, एलेमेंटरी स्कूल, ट्रिप्लिकेन, १९३७

## टी. के नानाराव.

एकादा उद्योगी माणूस मोठ्या अडचणीस न जुमानता जगात पुढे कसा येतो याचें श्री. टी. के. नानाराव हे उत्कृष्ट उदाहरण आहे

तंजावर येथील एका गरीब देशस्थ घराण्यांत श्री नानारावाचा जन्म झाला. एम ए पास झाल्यावर त्यानीं १९१४–१५ साली एक वर्ष मन्नारगुडीच्या फिन्डसे कॉलेजात इतिहासाच्या अध्यापकाचे काम केले नंतर त्यानीं मिलिटरी अकाउन्ट्स खात्यात कारकुनाचे काम केलें लवकरच बढती होऊन त्याना सुपरिन्टेन्डचेी जागा मिळाली. नंतर ते इन्डियन ऑडिट व आकउन्टन्ट्स सर्व्हिसच्या परिक्षेस बसले. त्यावेळीं नोकरीत असलेल्या लोकाना वयाच्या तीसाव्या वर्षापर्यंत या परिक्षेस बसता येत असे. या परीक्षेत उत्तीर्ण झाल्यावर त्याना ॲसिन्टट अकाउन्ट जनरलची जागा मिळाली. मुंबई, दिल्ली व इतर ठिकाणीं काहीं दिवस काम केल्यावर त्याची बदली मद्रासला झाली. मद्रासेस असताना त्यानी काहीं दिवस डेप्युटी आकाउन्टंट जनरलचें काम केले

जून १९३७ मध्यें त्याची बदली रेल्वे शाखेकडे झाली सध्या ते बी बी. सी. आय रेल्वेचे ऑडिटर असून मुंबईस असतात.

त्याच्या चांगल्या कामाबद्दल हिंदुस्थानसरकारच्या फायनॅन्स मेम्बरानीं त्याची प्रशंसा केली होती व त्याना ' रौप्य महोत्सव पदक ' देण्यात आले. निपक्षःपातीपणा व कार्यतत्परता या त्याच्या गुणामुळे ते सर्व ठिकाणीं लोकप्रिय होतात

ते मराठा ए. फंडाचे तहहयात सभासद असून फंडाच्या सर्व योजनाना त्याची सक्रिय सहानुभूति असते.

---

## ई राजारामराव एम. ए बी. एल्.

राजारामरावाचा जन्म १९०१ सालीं झाला. तंजावरास थोडे शिक्षण घेतल्यानंतर ते मद्रासला आपल्या भावाकडे ( ई. विनायकराव याचेकडे ) आले मद्रास ख्रिश्चन कॉलेजच्या हायस्कुलात त्याचे शिक्षण झाल्यावर प्रेसिडेन्सी कॉलेजात उच्च शिक्षण घेतलें इन्टरच्या परीक्षेत ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले व बी. ए. च्या परिक्षेत १९२२ सालीं ते सबंध युनिव्हर्सिटींत पहिले आले नंतर १९२४ सालीं लॉ कॉलेजातून ते बी. एल परीक्षा उत्तीर्ण झाले. कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर चिदंबरम्‌ येथील श्रीमीनाक्षी कॉलेजात त्यानीं एक वर्ष अध्यापकाचें काम केले. इतक्यात त्याचवेळीं ( १९२६ सालीं ) ते इन्डियन ऑडिट व अकाउन्ट्स सर्व्हिसच्या परीक्षेस बसले व यशस्वी झाले त्यानीं इम्पिरियल कस्टम सर्व्हिसमध्ये जाण्याचें कबूल केले म्हणून त्याची कराचीच्या ॲसिस्टटच्या कलेक्टर ऑफ कस्टमच्या जागेवर नेमणूक झाली. काहीं दिवस मुंबईस काम केल्यावर त्याची बदली कलकत्त्याला झाली व सध्या ते कलकत्त्यासच आहेत त्यानीं इंग्रजी साहित्याचा अभ्यास चालू ठेवला आहे. पोहणें व व्हायोलिन वाजवणें याचा त्याना छंद आहे. म. ए फंडाचे ते तहहयात सभासद असून डायरेक्टरहि आहेत.

---

## डॉ. बी. के. बदामी

डॉ. बी के बदामी, जी बी व्ही. सी, हे कै बदामी कृष्णराव यांचे द्वितीय चिरंजीव असून याचा जन्म म्हैसुरात १८८५ साली झाला बंगलोर व म्हैसूर येथे शिक्षण पुरे झाल्यावर गुराच्या रोगाच्या अभ्यासासाठी ते मुंबईस गेले व तेथेच ते जी बी व्ही सी ही परिक्षा पास झाले परीक्षेत त्याचा नंबर पहिला आला व एक वर्षपर्यंत तेथील इस्पितळात रेसिडेंट सर्जनचे काम त्यानी केले हैदराबाद संस्थानात त्यावेळी व्हेटरिनरी खाते नवीनच सुरू झाले होते व त्यात १९०७ साली डॉ बी के बदामी याना नोकरी मिळाली हिंगोली स्टड फार्मवर बरीच वर्ष मुख्याधिकाऱ्याचे काम केल्यावर ते संस्थानच्या व्हेटरिनरी खात्याचे डेप्युटी डायरेक्टर झाले व १९३६ साली त्याना संस्थानचे डायरेक्टर ऑफ व्हेटरिनरी सर्व्हिसेस नेमण्यात आले. याच हुद्यावर ते सध्या काम करीत आहेत

---

## डॉ. व्ही. के. बदामी

डॉ. व्ही के. बदामी एल ए जी, पीएच डी (केम्ब्रिज) हे कै बदामी कृष्णराव याचे तृतीय चिरंजीव असून याचा जन्म ता १२-१-१८८८ रोजी म्हैसुरात झाला त्याचे शिक्षण बंगलोर व म्हैसूर येथे पुरे झाले कोइमतूर येथील शेतकी कॉलेजातून १९११ साली ते एल एजी च्या परीक्षेत बसले या परिक्षेत शेतकी व शेतीचे रसायनशास्त्र या विषयातील प्राविण्याबद्दल त्याना सुवर्णपदके मिळाली परीक्षा पास झाल्यावर म्हैसूरच्या शेतकी खात्यात ज्युनिअर ॲसिस्टंट बॉटनिस्टच्या जागेवर त्याची नेमणूक झाली काही दिवसानी त्यानी हेब्बाळच्या शेतकी शाळेत ॲसिस्टंट प्रिन्सिपॉल म्हणून काम केले व नंतर १९१२ मध्ये ते सिनिअर ॲसिस्टंट बॉटनिस्ट झाले १९२३ साली म्हैसूरदरबारने त्याना उच्च शिक्षणासाठी केम्ब्रिज येथे पाठविले विलायतेत त्यानी सर रोलँड बिफिन, प्रो पनेट व डॉ सी ए बार्बर यासारख्या नामांकित शास्त्रज्ञाच्या हाताखाली काम केले सुट्टीच्या दिवसात त्यानी डेन्मार्क, स्वीडन व फ्रान्स देशात जाऊन तेथे चालू असलेल्या वनस्पतिशास्त्राच्या संशोधनाचे सूक्ष्म निरीक्षण केले १९२९ साली म्हैसूर संस्थानने त्याना इकॉनॉमिक बॉटनिस्टची जागा दिली पुढे १९३१ साली ते शेतकी शाळेचे प्रिन्सिपॉल झाले नंतर १९३४ सालापासून ते संस्थानच्या शेतकी खात्याचे डेप्युटी डायरेक्टर आहेत मात्र हे काम व शेतकी शाळेच्या प्रिन्सिपॉलचे काम ही दोन्ही त्याचेकडेच ठेवण्यात आली आहेत संशोधन करून डॉक्टरसाहेबानी रागी, शेंगदाणा व उसांच्या बऱ्याच नवीन जाती काढल्या आहेत एच. एम ३२० नावाच्या त्यानी शोधून काढलेल्या उसाच्या जातीमुळे म्हैसुर शुगर कंपनीची फार भरभराट झाली पुढे म्हैसूर संस्थानने त्याना इंडियन सेंट्रल कॉटन कमिटीवर आपले प्रतिनिधी म्हणून नेमले आहे शिवाय इम्पिरीयल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च व कॉटन कमिटीच्या विद्यमाने म्हैसुरात होणारे संशोधन त्याच्याच देखरेखीखाली सध्या चालू आहे

---

# ताण्डलम् लक्ष्मणराव

रायबहादूर टी. गोपाळरावाच्या सात चिरजीवापैकीं लक्ष्मणराव हे सगळ्यात कनिष्ट होते. १६–१२–१८८० रोजीं कुम्भकोणम् येथे त्याचा जन्म झाला इन्टरमीजिएटपर्यंतचे शिक्षण कुम्भकोणम् येथेच झाले बी ए. चा अभ्यास त्यानीं मद्रास येथे प्रिन्सिपाल स्टोन व प्रोफेसर जोन्स याचे हाताखालीं केला. १९०२ सालीं पदवी मिळाल्यावर त्याना मद्रासच्या सरकारी वनस्पतिशास्त्रज्ञाच्या कचेरींत ग्रथालयाधिकारी म्हणून नोकरी मिळाली. डॉक्टर बार्बरसाहेबाची कोइमतुरास इकॉनॉमिक म्हणून बदली झाली तेव्हा लक्ष्मणराव त्याचेबरोबर कोइमतुरास गेले व तेथील शेतकी कॉलेजात ग्रथालयाधिकाऱ्याच्या जागेवर रुजू झाले. १९१० सालीं तेथेच शेतीच्या रसायनशास्त्रीय विभागात असिस्टट म्हणून काम करू लागले. १९२२ सालीं अभ्यासा करिता दोन वर्षांची रजा घेऊन त्यानीं लडनच्या इम्पीरिअल कॉलेज ऑफ सायन्सचा 'डिप्लोमा' मिळविला हिंदुस्थानात परत आल्यावर त्याना अग्रिकल्चरल केमिस्टची जागा मिळाली व या हुद्यावर असताना १९३५ साली ते सेवानिवृत्त झाले

सरकारी कामात त्याची शिस्त व टापटीप प्रशंनीय असे जमिनीच्या रसायनशास्त्रात बरेच संशोधन केले, पण त्याचे बहुतेक काम अद्यापि अप्रसिद्धच आहे गूळ करण्याच्या सुधार-लेल्या पद्धति, विड्याच्या पानाच्या वेलाच्या रोगाची चिकित्सा व लोअर भवानी योजनेच्या जमिनीचे परीक्षण ही त्याची कामे विशेष उल्लेखनीय आहेत.

लक्ष्मणरावाचा स्वभाव साधा आहे फोटोग्राफी, रेडियो व चित्रकला याची त्याना फार हौस आहे ते सेवानिवृत्त झाल्यासून कोइमतुरासच स्थाईक झाले आहेत ते 'फ्रीमेसन' आहेत तसेच कोइमतूर येथील सर्व सामाजिक चळवळींत मोठ्या उत्साहाने ते भाग घेतात

---

# सी. श्रीनिवासराव साहेब.

श्रीनिवासराव याचा जन्म कोलार येथे १८७४ सालीं झाला उत्तर अर्काट जिल्ह्यातील कोलथूर जहागिरदार घराण्यातील श्री. सी कोणेरीराव साहेब याचे हे पुत्र होते. त्याचे शिक्षण सेन्ट्रल कॉलेज बगलोर व प्रेसिडेन्सी कॉलेज मद्रास येथे झाले. बी. एल.ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यानीं मदुरेला वकिली सुरू केली. सध्या त्याची वकिली उत्तम प्रकारची चालत असून मदुरेच्या प्रमुख वकिलात आज त्याची गणना होते

मदुरा कॉलेज बोर्डाचे ते बरेच वर्षे चिटणीस होते. ते कांहीं काल मदुरा डिस्ट्रिक्ट बोर्ड व रामेश्वर देवस्थान कमिटी या संस्थाचे हिते सभासद होते.

बादशहाचा राज्याभिषेकोत्सव पाहाण्याच्या हेतूनें ते नुकतेच विलायतची सफर करून स्वदेशी आले या सफरींत त्यानीं युरोप जर्मनी फ्रान्स स्वित्झर्लंड वगैरे देशही पाहाण्याची संधी साधली.

पक्षकाराची केस तयार करून माडण्याच्या कामात ते नमुनेदार वकील आहेत. त्याच्या सहवासाने नवख्या वकिलासहि फायदा झाल्यावाचून राहाणार नाहीं.

---

## भारतसिंह खापे रामचंद्राचार्य

भारतसिंह विद्याभूषण पण्डित खापे रामचंद्राचार्य हे जाडे विद्वान असून दक्षिण हिंदुस्थानात शास्त्राचें विवरण करण्यात त्याची बरोबरी आज कोणी करू शकत नाहीं त्यांनीं संपूर्ण महा· भारतावर दहाबारादा प्रवचने केली आहेत व या विद्वत्तेकरिता त्याना 'भारतसिंह' ही पदवी देण्यात आली. तसेंच त्यांनीं रामायणावर चोवीसदा व भागवतावर शंभरदा प्रवचने केली आहेत. त्याच्या प्रवचनास नेहमीं फार गर्दी जमते.

त्यांची विद्वत्ता अंशतः आनुवंशिक व अंशतः स्वप्रयत्नार्जित आहे. त्याचे वडील दादाचार्य हे त्रावणकोरचे दिवाण राय राया राय वेंकटराव याचे गुरू होते. त्रावणकोर सोडल्यावर वेंकटरावानीं कुम्भकोणम् येथे स्थाइक होऊन तेथेंच अग्रहार बांधला.

रामचंद्राचार्यांची विद्वत्ता मशहूर आहे तिरूपति सभेचे ते परीक्षक होते. पदुकोटा दरबारने त्याना 'उत्तम संभावना' दिली आहे. उत्तराधि मठाचे स्वामी त्याची फार प्रशंसा करीत.

त्याचे चिरंजीव डॉ आर नागराज शर्मा याना मद्रास युनिव्हर्सिटीने मध्वाचार्यांच्या दहा ग्रंथावर विवरणात्मक निबंध लिहिल्याबद्दल पी एच. डी ही बहुमानाची पदवी दिली. डॉ. शर्मा याचे तत्त्वज्ञानविषयक लेख 'हिंदू' मध्ये बरेचदा येतात.

---

## फ्लूट नागराजराव

याचा जन्म २५-७-१८८३ रोजीं कुम्भकोणम् जवळील नाचियार कोइल नावाच्या एका खेडयात झाला याचे घराणे सुखवस्तु असून ते देशस्थ स्मार्त ब्राह्मण होते. त्याचे वडील श्री. जी. रंगनाथराव हे हौसेखातर पण चांगले 'व्हायोलिन' वाजवीत असत. रंगनाथरावाच्या ह्यातींतच वडिलोपार्जित मिळकतीचा निकाल झाला व नागराज सहा वर्षांचा असतानाच त्याचे वडील वारले. पुढे नागराज आपले मामा श्री आर. रामचंद्रराव हे पदुकोट्याचे शाळाधिकारी होते त्याचेकडे राहण्यास गेला पदुकोट्याच्या महाराजा कॉलेजमध्ये नागरावराजानीं मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतले. शिक्षण घेऊन भाचाने संस्थानातच नोकरी धरावी अशी त्यांच्या मामाची इच्छा होती. पण नादराजरावाचा कल संगीताकडे होता, जल्से, गाणीं वगैरेस जाऊन ते वेळ घालवू नको व गवयाचा 'दरिद्री' धंदा पत्करू नको असे त्याच्या मामानीं त्याना पुष्कळदा सांगितले, पण त्याचा काहींच उपयोग झाला नाहीं.

१८९८ सालापासुन कान्नुस्वामीराव नावाच्या शिक्षकाकडून नागराजराव चोरून फ्लूट वाजविणे शिकू लागला मामाना हे कळलें तेव्हा ते फार रागावले व नागराजरावास मामाचे घर सोडून स्वतः'चे पायावर उभे राहाण्याची पाळी आली. नतर त्रिचनापल्लीस रेल्वेखात्यात नोकरी मिळण्याचा प्रयत्न त्याने केला पण तो यशस्वी झाला नाहीं परंतु त्याच्या फ्लूट वाजण्याच्या प्राविण्यामुळे एका व्यापाऱ्याकडे त्याच्या मुलासाठी खाजगी शिक्षक म्हणून त्यास नोकरी मिळाली. काहीं दिवसांनीं नागराजरावाचे चुलते वारले म्हणून त्यांचे जागीं नाचियारकोइल येथील गावमुन्सफ म्हणून त्याची नेमणूक झाली. या वेळींहि त्यानीं फ्लूट वाजविण्याचा आपला अभ्यास चालू ठेवला होताच १९०२ सालीं शरभशास्त्र्यानीं त्याच्या फ्लूटवादनाची परीक्षा घेतली तेव्हा त्यानासुद्धा हा या कलेत पुढे येईल असे वाटले शरभशास्त्र्याकडून त्याची प्रकृति चांगली नव्हती म्हणून त्याला फ्लूटचे शिक्षण घेता आले नाहीं. तरी पण नागराजरावानीं शास्त्र्याचे

## प्रमुख वादनपटु



गोटु वाद्य सखाराम राव
तिरुवडमरुडूर



बालसरस्वती जगन्नाथ भट गोस्वामी
तंजावर

## प्रमुख वादनपटु



फ्लूट—नागराज राव
कुम्भकोणम्.



मृदंगम्—नारायणस्वामी अप्पा
तंजावर.

अप्रतिम जलसे ऐकले व आपले वाजविणे बरेच सुधारले. १९०४ साली शास्त्रीबुवा वारले, त्यानंतर नागराजराव उमयालपुरम् स्वामीनाथ अय्यर यांच्या हाताखाली संगीतविद्या शिकले. दोन वर्षांच्या अवधींत गुरूंच्या मदतीने थोडक्या कालात नागराजराव त्यागऱ्याच्या कृति व इतर पाठ शिकले व पुढे चांगले बदेवाईक संगीतज्ञ बनले. फ्लूट वाजविणाऱ्यांना अवघड असे तोडी, सावेरी, गौलिपतु व वराळी हे राग वाजविण्यात त्यांचा हातखंडा असे. संगीतप्रेमी लोकांनी त्यास पैशाचे मदतीने चांगला आश्रय दिला व त्यांनींहि आपली कला व दर्जा अखेरपर्यंत कायम राखली आहे.

---

## टी. आर. ज्ञानसागर फ्लूटिस्ट

ज्ञानसागरांचा जन्म १९१० सालच्या मे महिन्यात झाला. त्यांचे वडील श्री. टी. ए. रामराव हे मद्रास येथे गिघन आणि कंपनीचे प्रतिनिधी होते वयाच्या पधराव्या वर्षीच ज्ञानसागर फ्लूट वाजवावयास शिकले प्रसिद्ध शरभशास्त्रयाचे आप्त श्री. अष्टसहस्रम् वेंकटराम शास्त्री हे त्यांचे गुरु होते. एकाग्रतेने शिकल्यामुळे ज्ञानसागर फ्लूट वाजविण्याच्या कलेत फार लवकरच निष्णात बनले गेली सहासात वर्षे ते फ्लूटचे सार्वजनिक जलसे करीत आहेत. त्यांच्या नैपुण्याबद्दल त्यांना दहाबारा सुवर्णपदके मिळाली आहेत 'ओडिअन' ग्राफोफोन कंपनीने त्यांच्या पुष्कळ गाण्याची रेकॉर्डस घेतली आहेत त्यांनी फंडाच्या मदतीला बरेच मोफत जलसे करून फंडास बरीच मदत केली आहे

---

## रावसाहेब डॉ. के. वासुदेवराव

पुष्कळ वर्षांपूर्वी ज्या काही महाराष्ट्रीयांनी ब्रिटिश सरकार व एतद्देशीय संस्थानात डॉक्टरची नोकरी करून नाव कमाविले त्यामध्ये रावसाहेब वासुदेवरावांची प्रामुख्याने गणना होते.

वासुदेवराव यांचा जन्म १८६३ साली झाला. त्यांचे शिक्षण तिरुपत्तूर व बंगलोर येथे पूर्ण झाले नंतर मद्रासच्या मेडिकल कॉलेजात शिक्षण घेऊन १८८७ साली ते एल. एम. ॲण्ड् एस. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्याच वर्षी त्यांना मद्रास सरकारच्या मेडिकल खात्यात ॲसिस्टंट सर्जनची नोकरी मिळाली. पुढे बढती होऊन इलाख्यातील निरनिराळ्या ठिकाणी ते सिव्हिल सर्जन होते. त्यांच्या तीस एक वर्षांच्या उत्तम नोकरीबद्दल १९१९ साली सेवानिवृत्त होण्याचे वेळी सरकारने त्यांना रावसाहेब ही पदवी दिली.

पुढच्याच वर्षी त्यांना निझामचे राज्यातील गढवाल या ठिकाणी स्टेट सर्जनची नोकरी मिळाली त्या जागेवर ते चार वर्षे होते. सध्या ते मद्रास येथे शांतपणे विश्रांती घेत आहेत. टेनिस व संगीत यांची त्यांना फार आवड आहे.

---

## नामदार रावबहादूर जी. श्रीनिवासराव.

रावबहादूर जी. श्रीनिवासराव हे मोठे नामांकित वकील होऊन गेले. वकिलीत त्यांना

फार पैसे मिळत तरी त्यातून वेळात वेळ काढून सार्वजनिक कार्यात ते मोठ्या उत्साहाने भाग घेत असत

कुम्भकोणमच्या सरकारी कॉलेजातून बी ए. पास झाल्यावर त्यानीं वकिलीची परिक्षा दिली. वय लहान असतानाच ते बी एल ची परीक्षा पास झाले नतर मदुरेस वकिली सुरू केल्यावर त्याचा जम चांगलाच बसला वकिलीच्या घद्यातील यशावर स्वस्थ न बसता ते स्थानिक म्युनिसिपालिटींत शिरले व लवकरच म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले. अध्यक्ष असाताना त्यानीं गावाची पुष्कळ सुधारणा केली.

श्रीनिवासराव नुसते म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले असे नाहीं पण लोकहितासाठीं झटणाऱ्या प्रत्येक स्थानिक सस्थेच्या कार्यात त्याचे अग असे. मॉटफर्ड सुधारणा होण्याच्या पूर्वी ते मद्रास कायदेमडळाचे सभासद होते व त्यावेळीं त्यानीं चागली लोकसेवा केली आहे.

त्याच्या लोकसेवेच्या कार्यासाठीं सरकारनें त्याना 'रावबहादूर' ही पदवी दिली. सरकारा तही त्याचे चागले वजन असे.

दिल्ली दरबारास आमत्रण मिळण्याचा मान श्रीनिवासरावाना मिळाला होता. १९११ सालच्या राज्याभिषेकोत्सवाचे वेळीं ते विलायतेसहि गेले होते.

त्याच्या मृत्यूमुळे मदुरेतील एक प्रमुख गृहस्थ नाहींसा झाला त्याचे वरिष्ठ चिरजीव श्री. एम. एस जम्बुस्वामिराव हे सध्या इन्डियन बॅकेच्या मदुरा शाखेचे एजन्ट आहेत. ते म. ए. फडास नेहमीं सहाय्य करीत असतात.



एन. आर. केदारी राव एम. ए., एल. टी
इंग्रजीचे असिस्टंट प्रोफेसर, प्रेसि. कॉलेज
पेट्रन म. ए. फंड.



टी. व्ही. सुब्बा राव, बी. ए., बी. एल्.
वकील, मद्रास
डायरेक्टर म ए. फंड. १९३६–



डॉ. टी. व्ही. रंगनाथ राव. एल्. सी. पी. एम्.
उपाध्यक्ष, म. ए. फंड १९३२.



सी. श्रीनिवास राव साहेब बी. ए., बी. एल्.
वकील, मद्रास
डायरेक्टर म. ए. फंड. १९३६–

# सीडेड डिस्ट्रिक्टस् (बल्लारी, कडप्पा, कर्नूल व अनन्तपूर) च्या राजकीय इतिहासांतील मराठ्यांची कामगिरी

लेखक- दि. ब. टी. भुजगराव, एम्. ए., बी. एल. रिटायर्ड डि. जज्ज, बेंगळूर

[ या लेखात सतराव्या व अठराव्या शतकात सीडेड जिल्हे व मराठे याचा संबध येऊन ता कसा तुटला याचे लेखकाने निरीक्षण केले आहे. स० ]

मराठा राज्याचा पहिला संबध या मुलखाशीं सतराव्या शतकाच्या शेवटच्या पंचवीशीत आला १६३६ सालीं शहाजी राजानीं विजापूरच्या सुलतानाचे सेनापति म्हणून कडाप्पा जिल्ह्यातील गंडीकोटा किल्ला हस्तगत केला व तसेच पुढे जाऊन म्हैसूरच्या उत्तरेकडील प्रदेशात मोठी जहागीर मिळविली. परतु त्यावेळीं मराठी साम्राज्याचा उदय झाला नव्हता. खरे मराठी साम्राज्य शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकापासून म्हणजे १६७४ सालींपासून सुरू झाले त्यानतर तीन वर्षांनीं म्हणजे १६७७ सालीं शिवाजीने गोवळकोड्याच्या सुलतानाशीं सख्य केले. व शहाजीची म्हैसुरातील जहागीर परत मिळविण्यासाठीं व तंजावरच्या राज्यातील आपल्या मालकीचा भाग व्यकोजीकडून मागण्यासाठीं कर्नूल व कडाप्पा या जिल्ह्यातून दक्षिणेस कूच केले.

## शिवाजीचा काल (१६७७-१६८०)

राज्याभिषेकामुळे शिवाजीची तिजोरी बरीच हलकी झाली होती व त्यास पैशाची अत्यत जरूरी होती तसेच मोगलानीं महाराष्ट्रातील किल्ले जिंकल्यास याना प्रतिकार करण्यास यावा म्हणून मराठ्याना आपला असा काहीं मुलख दक्षिणेत पाहिजे होता म्हणून शिवाजीने मदाण्णा व आकण्णा या दोन ब्राह्मण प्रधानाच्या सल्ल्यानें वागणाऱ्या गोवळकोड्याच्या सुलतानाशीं सख्य केलें. त्याचे आपआपसात असे ठरले कीं शिवाजीने कर्नाटकावर स्वारी करावी व खर्च सुलतानानें द्यावा. शहाजीची जहागीर शिवाजीनें घ्यावी व उरलेला कर्नाटक सुलतानास मिळावा सुलतान कुतबशहाचा पाहुणचार व नजराणे घेऊन १६७७ सालीं शिवाजीनें हैद्राबाद सोडले व कर्नूलला पोंचल्यावर तेथून जवळ असलेल्या भावनाशी व कृष्णा नदीच्या निवृत्ति संगमावर स्नान केलें, तेथून तो पुढे तडक श्रीशैल येथील पर्वती देवीचे दर्शनास गेला श्रीशैल डोंगावर गणपतीचे मंदिर व धर्मशाळा त्याने बांधविली. श्रीशैलाहून शिवाजी खालीं उतरला व नद्या व कडप्पा मार्गे तिरुपतीस पोंचला तेथून कालहस्ती, पेद्दपोलम् व कांजीवरा या गावावरून दक्षिण अर्काट जिल्ह्यातील जिंजीस पोंचला. पूर्वी ठरल्याप्रमाणें कुतुबशहाकडून पैसे येईनात म्हणून जिंजीचा किल्ला त्यानें ताब्यात घेतला. या प्रकरणात शिवाजीची दूरदृष्टी व चातुर्य दिसून येतें कारण पुढें नुकत्याच उगवलेल्या मराठी साम्राज्याला या किल्ल्याचा आपत्काली फार उपयोग व्हवयाचा होता. जिंजी येथें मराठा किल्लेदार नेमून शिवाजी दक्षिणेस कोलेरून येथें व्यकोजींची भेट घेऊन परत आला. भेटीनतर व्यकोजी तंजावरास पळाला परत येताना म्हैसूर प्रांतात येऊन कोलार, होस्कोट, बेंगलूर, बाळापूर आणि शिरा या

सुभ्याची शहाजीची जहागीर पुन्हा त्यानें आपल्या ताब्यात घेतली व तेथून पुढें बल्लारी व अनतपूर या जिल्ह्यातून तो पुढे सरकला. याच वेळीं त्याने विजापूरच्या सुलतानाशी तह केला. या तहाप्रमाणें बल्लारी व अदोनी हे सुभे ( सध्याचे बल्लारी व अनतपूर जिल्हे ) त्यास मिळाले. या सुभ्यावर जनार्दन नारायण हणमते यांची नेमणूक करण्यात आली. तेथून पुढें येताना कोप्पळ व गदग घेऊन पन्हाळ्यास १६७८ चे एप्रिल महिन्यात येऊन पोचला. या कर्नाटकाच्या स्वारी मुळे महाराष्ट्रातील सह्याद्रीतील किल्ल्यापासून पूर्व घाटापलीकडील जिंजीपर्यंत मराठ्याच्या किल्ल्याची रांगच्यारांग तयार झाली.

## संभाजी ते शाहू ( १६८० ते १७०८ )

दुर्दैवानें १६८० सालीं शिवाजी मरण पावला त्यानतर तीसएक वर्षे मराठी राज्याचा नाश होण्याची पाळी आली होती या काळांत औरंगजेबाने दक्षिणेवर स्वारी केली व त्याच्या सैन्याने हळूहळू तुगभद्रच्या दक्षिणेकडील शिवाजीनें घेतलेला सर्व मुलूख जिंकला १७०७ सालीं म्हणजे औरंजेबाचे मृत्युसमयीं सीडेड डिस्ट्रिक्टवर मराठ्याचा काहींही अधिकार राहिला नव्हता १६८९ सालीं संभाजी पकडला गेला व औरंगजेबाने त्याचे हालहाल करून त्यास मारले याच धादलींत संभाजीचा मुलगा शाहू हा मोगलाचे हातीं सापडला राजाराम गादीवर आल्यावर त्याला जिंजीस पळावे लागले या प्रसगीं शिवाजीच्या दूरदृष्टीपणाचा फार उपयोग झाला. १६९८ पर्यंत राजाराम जिंजीस होता त्या वर्षी जिंजीचा किल्लाही मोगलानीं घेतला पण राजाराम त्यापूर्वीच परत महाराष्ट्रात येऊन मोगलास त्रास देऊ लागला होता इतक्यात राजाराम १७०० सालीं वारला. त्यानतर ताराबाईनें आपल्या अज्ञान मुलाचे नावें राज्यकारभार केला. १७०७ सालीं औरंगजेबाने वारला व त्यानतर दुसऱ्याच वर्षी १७०८ सालीं शाहूला बधमुक्त करण्यात आले. शिवाजीच्या मृत्यूनतर १७०८ पर्यंतच्या धामधुमीच्या काळीत मराठ्याना या जिल्ह्यातील मुलुखाची व्यवस्था करण्यास फुरसद मिळाली नाहीं यात नवल नाहीं. तरी पण एका मराठा सरदाराने स्वत.साठीं का होईना पण या मुलुखाकडे लक्ष दिले तो सरदार म्हणजे सताजी घोरपडे हा होय. त्याने गुटी येथे लहान जाहागीर स्थापण्याचा प्रयत्न केला. या गुटीलाच काहीं कालानतर सताजीच्या नातवानें म्हणजे मुरारीराव घोरपडे याने राज्य स्थापिले, ( याच वेळीं सिद्धोजीराव घोरपडे बल्लारी जवळील सदूरला येऊन राहिला व त्यानीं स्थापिलेले राज्य आजतागायत सदूर सस्थान या नावानें अस्तित्वात आहे. )

## बाळाजी विश्वनाथ (१७१४ ते २०)

शाहू गादीवर आल्यानतर हळुहळू राज्यकारभाराचे काम पेशव्याच्याकडे आले. पहिल्या दोन पेशव्याचा सर्व वेळ तोल सुटलेल्या मराठी राज्याची सावरासावर करण्यात गेला. त्यामुळे त्याना ' सिडेड ' जिल्ह्याकडे लक्ष देता आले नाहीं. परतु पूर्वघाटाचे पूर्वेकडील कर्नाटकात एक ठाणे ठेवून सीडेड जिल्ह्याचे मार्गे महाराष्ट्राशीं दळणवळण ठेवण्याचा हेतू मात्र त्यानीं कधीही सोडून दिला नाहीं. मोंगल साम्राज्याची उतरती कळा पाहून बाळाजीनें मोंगल बादशाहाशी तह केला. त्या तहात इतर अटीबरोबर मराठ्याना शिवाजीनें पूर्वी जिंकलेला कर्नाटकातील मुलुख परत घेण्याची परवानगी देण्याची अट घालण्याचा बाळाजीचा आग्रह होता. मोंगल सेनापती हुसेन अली यास ही अट मान्य होती पण बादशहा ही अट कबूल करीना व व शेवटीं मराठ्यानी पूर्वीच्या विजापुर व गोवळकोंडा राज्यातील मुलुखातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क घेऊन स्वस्थ बसावें लागलें.

## पहिला बाजीराव ( १७२०–३९ )

ज्या वेळीं बाजीरावास पेशवे पदाचीं वस्त्रे मिळालीं त्यावेळीं महाराष्ट्रांतील कांहीं लोकांचें लक्ष या सीडेड जिल्ह्याकडे होतेच. विशेषत: श्रीपतराव पतप्रतिनिधी व इतर कांहीं सरदार यांचें म्हणणें असे की, मराठ्यांनीं प्रथम कर्नाटक व सीडेड जिल्ह्यांतील मुलुख काबीज करून दक्षिणेंत आपली सत्ता दृढ करावी व नंतर उत्तरेकडे दृष्टी वळवावी पण बाजीरावाची महत्त्वाकांक्षा फार बलवत्तर होती तो तर म्हणत असे कीं प्रथम मोंगल साम्राज्याचे खोड जे दिल्ली त्यावर घाव घातला कीं पुरे, मग उत्तरेकडील वा दक्षिणेकडील सर्व फांद्या आपोआप गळून पडतील शाहूला हा सल्ला पसंत पडला व थोड्याच दिवसांत मराठे उत्तरेकडील बऱ्याच मुलखाचे सत्ता बळकावून बसले, परंतु एखादे वेळीं असा विचार मनांत येतो कीं, बाजीराव जर थोडा कमी महत्त्वाकांक्षी असता, किंवा शाहुने प्रतिनिधींचा सल्ला मान्य केला असता तर मराठी साम्राज्य पुष्कळ जास्त दिवस टिकलें असते बाजीरावाने मराठी राज्याचा विस्तार इतका वाढविला कीं, राज्यसत्ता दृढ होण्याचे आधीच अहमदशहा अबदालीच्या स्वारीसारखे कोणचेही संकट आले असता राज्यास खात्रीने धक्का बसेल.

## बाळाजी बाजीराव (१७३९–७१)

बाळाजी बाजीराव पेशवा झाल्यावर मराठ्याचे लक्ष पुन्हा कर्नाटक व सीडेड जिल्ह्यांतील मुलखाकडे वळले त्यावेळीं दोस्तअली कर्नाटकचा नबाब होता व त्याचा जावई चंदासाहेब हा तंजावरचे राजे प्रतापसिंह यास त्रास देऊं लागला प्रतापसिंहाने शाहूकडे चंदासाहेबाविरुद्ध मदत मागितली तसेच दोन पठाण सरदारांनीं कडप्पा व कर्नूल येथ स्वतंत्र राज्ये स्थापिली होती व ते कर्नाटकच्या नबाबाला जाऊन मिळाले या मुसलमान राजाकडे मराठ्यास प्रथम लक्ष द्यावें लागले. १८४० साली शाहूने रघूजी भोसले यास त्याचे पारिपत्य करण्यासाठीं स्वारीवर पाठविले रघूजीने प्रथम कर्नूलचे नबाबाचा पराभव केला व कडप्पाच्या नबाबाचा दोन ठिकाणी पराभव केला यानंतर शेवटची लढाई गुव्हचेरुबु घाटात झाली नंतर पूर्व घाटांतील दामलचेरुवु घाटातून दक्षिणेस जाऊन रघुजीने दोस्तअलीचा पराभव केला या लढाईत दोस्तअली मारला गेला नंतर त्याने त्रिचनापल्ली किल्ल्यास वेढा दिला १७४१ सालीं तो किल्ला सर झाला व चंदासाहेबास पकडून साताऱ्यास पाठविण्यात आले १७४३ पर्यंत हा किल्ला मुरारीराव घोरपड्याचे हाताखालीं मराठ्यांचा ताब्यात होता व त्यासाठीं हा किल्ला निजामास देऊन मराठ्यांनीं निजामाकडून अनंतपूर जिल्ह्यातील पेनु कोन्ड्याचा किल्ला घेतला

दक्षिणेत मुरारीराव घोरपड्याची जहागिर झाल्यामुळे बाळाजींच्या मनात निजामाची सत्ता कमी करावी किंवा त्याचे राज्यच जिंकावे अशी महत्वाकांक्षा उत्पन्न झाली. म्हणून १७५५ पर्यंत पेशव्यानीं सीडेड जिल्ह्यांचा विचारच केला नाहीं. पण त्यावर्षी एक अनपेक्षित गोष्ट घडून आली. त्यावर्षीं मराठा सैन्यांतील तोफखान्यावरील नौकरी सोडून गेलेल्या मुजफरखानाला आश्रय दिल्याबद्दल सावनूरच्या नबाबावर मराठ्यांची स्वारी केली या वेळीं पेशव्याकडे स्वामित्व मानण्यास तयार नसलेल्या मुरारीराव घोरपड्याने नबाबाची बाजू घेतली. पण सावनूरजवळील लढाईत दोघांचा पराभव होऊन मुरारीराव पुन्हां पेशव्यास मिळाला पण त्याची बेइमानी कोणी विसरले नाहीं. कारण पुढे पांच वर्षांनीं हैदरअलीनें गुटीवर स्वारी केली तरीहि पेशव्यानी मुरारावास मदत पाठविली नाहीं. १७५५ त सावनूरच्या लढाईनंतर बाळाजी म्हैसूरास गेला. व खंडणीदाखल बरीच रक्कम घेऊन आला व येण्यापूर्वी त्यान बळवंतराव मेहेंदळ्यास शिवाजीची जुनी जहागीर परत मिळविण्यास तेथें ठेवून तो पुण्यास परत आला. या वेळीं बळवंतरावास

कर्नूल व कडाप्पा येथील नबाबाचा विरोध झाला पण बळवंतरावानीं सप्टेंबर १७५७ त कडप्पा जवळील लढाईत दोघाचा पराभव करून गुर्रमकोन्ड जवळील मुलूख मिळविला.

एवच १७६० सालीं कर्नाटक व सीडेड जिल्ह्याचा सर्व मुलूख मराठ्याचे ताब्यात येण्याची वेळ आली होती. पण ईश्वरी इच्छा निराळीच होती ! पानिपतच्या तिसऱ्या लढाईत मराठयाचा पराभव' होऊन बाळाजी हताश होऊन वारला व मराठी सत्तेला असा धक्का बसला कीं त्यापासून मराठी साम्राज्य पुन्हा पूर्ववत वैभवाप्रत पोचलेच नाहीं.

## माधवराव (१७६१–७२)

१७६१ सालीं माधवराव पेशवा झाला काही लोकाच्या मते सर्व पेशव्यात हाच माधवराव पेशवा जास्त कर्तबगार होता. त्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या दोन वर्षातच निजामानें उचल खाल्ली. पेशव्यानीं राक्षसभुवनाच्या लढाईत त्याचा चागलाच पराभव केला व नतर माधवरावानीं हैदरअल्लीकडे दृष्टि फिरवली. या वेळीं हैदरअल्लीने मुराररावाचा पराभव करून सदूर घेतले व कृष्णेपर्यंतचा मुलुख घेऊन स्वतःला शीराचा नबाब म्हणून जाहीर केलें नतर धारवाडातील मराठी सैन्यास त्याने हुसकून लावले हे पाहून १७६४ सालीं माधवरावाने पश्चिमेकडून म्हैसूरवर स्वारी केली. हैदरअल्ली योद्धा खरा, पण माधवराव पेशवा हा त्याला 'शेराला सव्वाशेर' भेटला. त्याने हैदराचा दोनदा पराभव केला. पहिल्या लढाईत हैदर व त्याचे ५० घोडेस्वारच उरले व रणागणातून पळाल्यामुळेच त्याचे प्राण वाचले दुसऱ्या लढाईत हैदरचे ३००० घोडेस्वार व ६००० पायदळ कामास आले तेव्हा त्याने तहाचे बोलणे सुरू केले. हैदराच्या सुदैवाने तहाच्या अटी पेशव्याचे बेइमानी चुलते जे रघुनाथराव यानी ठरविल्या होत्या मग काय ! हैदरचे बरेंच फावले. तसेंच मुरारीराव घोरपड्यास त्याचे राज्य परत देणें ही त्या अटींत एक अट होती. माधवरावास या अटी पसत नव्हत्या. तरी रघुनाथरावाने ठरविलेल्या तहाच्या अटी मान्य करून तो १७६५ त पुण्यास परतला. पण पराभवाने मनात जळत असणारा हैदरअल्ली थोडाच स्वस्थ बसतो ! त्यानें मराठ्यास पुनः त्रास देण्यास सुरवात केली. १७६६ सालात माधवरावानें हैदरवर पुन्हा स्वारी केली. हैदरअल्लीने मोठी खडणी देऊन पुन्हा तह केला व पेशवा १७६७ त पुण्यास परत आला. परतु १७६९त हैदरला मराठ्याशीं सामना देण्याची पुन्हा हुक्की आली व त्यानें या वेळीं इग्रजाशीं सख्य केले. माधवराव पुन्हा १७६९ सालीं म्हैसूरावर चाल करून गेला. मराठे एकामागून एक किल्ले सर करीत होते, पण हैदर लढाई करण्याचे टाळून पळत सुटला. इतक्यात हैदरचे दैव त्याच्या मदतीस आले. स्वारींत असतानाच माधवराव आजारी पडले व १७७० त त्याना परत पुण्यास यावे लागले. मराठी सैन्याने लढाई पुढे चालविली होती व १७७२ त हैदरला तहाची याचना करावी लागली. या तहान्वये हैदरने मराठ्यास शिवाजीच्या वेळचा कर्नाटकातील मुलूख,व कडप्पा जिल्ह्यातील गुर्रमकोन्ड वगैरे मुलूख परत दिला, पुढें याच वर्षी म्हणजे १७७२ त माधवराव पेशवा आपल्या वयाचे अठ्ठाविसाव्या वर्षी क्षयानें वारला.

## सालबाईच्या तहापर्यंतचा धुमाकुळीचा काळ (१७७२–८२)

माधवरावाचे मृत्यूनतर त्याचा भाऊ नारायणराव यास पेशवाईची वस्त्रे देण्यात आली, पण एक वर्षात त्याचा खून झाला. त्यानतर रघुनाथराव गादीवर आला खरा पण सालबाईच्या तहाप्रमाणें रघुनाथराव पेशवाईचा हक्क सोडीपर्यंत महाराष्ट्रात बेबदशाही माजून राहिली होती. नारायणरावाच्या खुनाची बातमी ऐकून हैदरानें टिपूस मराठ्याना दिलेले मुलूख परत घेण्यास पाठविलें. थोडयाच दिवसात टिपूनें सर्व मुलूख परत मिळविला, हें ऐकून रघुनाथरावानें १७७३

त म्हैसूरकडे सैन्यासह कूच केले, पण बल्लारीजवळच हैदरने खडणी देण्याचे व नारायणरावाच्या लहान मुलाविरुद्ध रघुनाथरावास मदत करण्याचे कबूल करून परत पाठविले रघुनाथराव परतल्यावर हैदरने १७७४ त मुरारिरावावर स्वारी केली अदोनी व बल्लारीचे किल्ले घेऊन त्याने गुटीस वेढा दिला मुरारिरावाने गुटीहुन पुण्यास मदतीकरिता धाडलेली पत्रे हैदरच्या हाती पडली व शेवटीं मुरारीस पकडण्यात आले. व अखेर कब्बलदुर्गच्या किल्ल्यात त्याना आपले शेवटचे दिवस बंदिवासात कठावे लागले. १७७७ त मराठयानी इग्रजाच्या सहाय्याने हैदरवर स्वारी केली पण गुटीस ठाणे देऊन हैदरने रारावी येथे मराठयाचा पराभव केला व १७७५ त त्याने सदूर घेतले व १७७९ त कडप्पाच्या नबाबास जिंकून त्याचाही मुलुख हैदरने आपल्या राज्यास जोडला कर्नूलचा नबाब हा त्याचा माडलीक त्यापूर्वीच बनला होता याप्रमाणे सालबाईचे तहापूर्वीच सीडेड जिल्ह्याचा मुलुख मराठयाचे हातून गेला होता इतक्यात म्हणजे १७८२ च्या डिसेंबरात हैदर मरण पावला

## नाना फडणवीसाची फडणिशी ( १७८२–९५ )

सालबाईचे तहापासून नाना फडणवीस लहान पेशव्याचे नावे राज्यकारभार करू लागले त्याचें लक्ष प्रथमच टिपूकडे गेले कारण टिपूने धारवाडपर्यंतचा सर्व मुलूख घेतला होता १७८४ पासून १७९० पर्यंत टिपू व मराठे यामध्ये लहान चकमकी बऱ्याच झडत होत्या पण १७९० साली म्हैसूरवर स्वारी करण्याकरिता इग्रज व निजाम याच्याशी त्यानें सख्य केले या स्वारीमुळे १७९२ त टिपूचा पराभव होऊन श्रीरगपट्टणचा तह झाला या तहान्वये मराठ्यास बल्लारी जिल्हा व धारवाडच्या आजुबाजूचा मुलूख मिळाला त्या तहात मराठ्यानीं तैनाती फौज ठेवावी अशी एक अट होती, पण नाना फडणवीसानीं ही अट मान्य केली नाही निजामास गुटी व कडप्पा हे जिल्हे मिळाले. यानतर १७९५ त सवाई माधवराव पेशवे यास गच्चीवरून पडून मृत्यु आला व दुसऱ्या बाजीरावाची कारकीर्द सुरू झाली

## दुसरे बाजीराव ( १७९५- १८०० )

त्यानतर शेवटचे पेशवे दुसरे बाजीराव याची कारकीर्द सुरू झाली १७९९ त म्हैसूरची चौथी लढाई होऊन श्रीरगपट्टण येथे टिपू मारला गेला. मराठ्याची मदत लढाईत फार कमी झाली असे सागून मराठ्यास फक्त सह्याद्रीखालील हरपनहळ्ळी, सुन्द व आनेगोन्दी आणि घाटावरील चितलदुर्ग, शीरा, नन्दिद्रुग व कोलार हे भाग देण्याचे ठरले तसेच निजामास गुटी, अनतपूर व कर्नूल हे जिल्हे देण्याचे ठरलें ( कर्नूलचे नबाबास जहागीर देण्यात आली होती पण ती १८३८ सालीं खालसा झाली ) आपणास देऊ केलेला भाग कमी आहे अशी पेशव्याची तक्रार होती पण पुढे तो मुलूख निझाम व इग्रज यानीं आपसात वाटून घेतला १८०० सालीं तैनाती फौजेच्या खर्चाकरिता म्हणुन निजामाने इग्रजास म्हैसूरच्या तिसऱ्या व चौथ्या लढाईनतर मिळालेला सर्व मुलूख दिला व याच मुलुखाचे चार जिल्हे करण्यात आले व त्याना वरीलप्रमाणें सीडेड जिल्हे म्हणतात. अशा रीतीने १८०० सालीं या जिल्ह्यास महाराष्ट्राशीं शिवाजीचें वेळेपासून सुरू झालेला सबध दुसरे बाजीरावाचे कारकीर्दींत तुटला दुर्दैवाने थोडया दिवसात खुद्द महाराष्ट्रच इग्रजाचे हातीं गेला. ( म्हैसूरच्या चौथ्या लढाईनतर बाजीरावाने सदूर परत मागितले होते. पण पेशवाई नष्ट झाल्यानतर ते सध्याच्या सस्थानिकाच्या पूर्वजास परत देण्यात आलें.

## उपसंहार

मुख्यत: ब्रिटिश फौजेतील अधिकारी बाधवासाठीं लिहिलेल्या आपल्या ऑक्सफर्ड हिस्ट्री ऑफ इन्डिया या पुस्तकात व्हिन्सेन्ट स्मिथ लिहितो कीं " १८१८ सालीं मराठी साम्राज्याचा

पूर्णपणे पाडाव झाला म्हणून हिंदी किंवा हिंदीतर कोणीही मनुष्यास सहानुभूतिपर अश्रु ढाळण्याचें काहींच कारण नाहीं हे त्याचे मत कोणीही मराठा कालत्रयींही कबुल करणार नाहीं एवढीच आशा करता येईल कीं, क्लाइव्ह व वॉरन हेस्टिंग्ज, डायर व ओड्वायर, ब्रिटिशाची साम्राज्यतृष्णा व दुबळ्या राष्ट्राचे अपहरण याबद्दल एकविसाव्या शतकातील हिंदी इतिहासकार जरा सौम्य व कमी दुष्ट भाषा वापरतील. इग्रजींत म्हण आहे कीं, प्रेम न केल्यापेक्षा प्रेम करून त्यात पराजय झालेलाच बरा त्याचप्रमाणे साम्राज्य न उभारण्यापेक्षा साम्राज्य स्थापून हिंदुस्थानातील दुहीची कारणे शोधून काढणे हेच बरे हे लक्षात ठेवलें पाहिजे कीं, मराठे हिंदी साम्राज्य स्थापण्यासाठीं प्रयत्न करीत होते, नुसत्या मराठी साम्राज्यासाठीं नव्हे, कारण ज्याप्रमाणे मराठे सरदार निजाम व मोगल यांचे हाताखालीं लढत होते तसेच मुसलमान सरदारही मराठी सैन्यात लढत होते हिंदुस्थानात लष्करी हिकमत व मुत्सद्देगिरीची मुळीच उणीव नाहीं हे औट घटकेच्या मराठी साम्राज्याने सिद्ध करून दिले आहे, व कर्नाटकात ठाणीं ठेवून महाराष्ट्रापर्यंत सीडेड जिल्ह्यातून दळणवळण ठेवण्याचे मार्ग खुले ठेवण्याचा विचार हे एक या मुत्सद्देगिरीचे उत्कृष्ट उदाहरणच होय.

# म्हैसुरांतील मराठे



( लेखक रावसाहेब सी. हयवदनराव, बेंगलोर )

म्हैसूर संस्थानातील मराठ्याच्या इतिहासास विजयानगर साम्राज्याच्या काला-पासून खरी सुरवात होते. त्या काळीं बहुतेक मराठा घराणीं विजापूर, गोवळकोंडा व अहमदनगर येथील सुलतानाच्या पदरी नोकरी करीत असत; तरीपण काहीं मराठे विजयानगरच्या साम्राज्याच्या भरभराटीच्या वेळेस ( १३३६–१५६५ ) विजया-नगरच्या हिंदु राजाकडेहि नोकरी करीत होते विठ्ठलेश्वरदेव–महा–अरसु नावाचा एक मराठा सरदार १५४४ साली विजयानगर साम्राज्याच्या शिवासनसमुद्र- सीमा भागाचा सुभेदार होता व बेंगलोर भाग त्याचे हाताखालीं असून त्याच्यातर्फेचा एक कामगार बेंगलोरास राही असा उल्लेख सदाशिवानें लिहिलेल्या शिलापत्रकात आला आहे

विजयानगरच्या साम्राज्याचा १५६५ साली निमोड झाल्यानंतर मराठ्यांचा दक्षिणेशीं असलेला संबंध जवळ जवळ तुटलाच. नंतर बहुतेक मराठे विजापूरच्या दर बारीं राहू लागले. विजापुरच्या मुसलमानी अमदानींत पुढील शंभरावर वर्षे बरेच मराठे सरदार सैन्यात व राजकारणांत पुढें आले याच कालात विजयानगरच्या राजाचें आरविदु घराणें मोडकळीस येऊन वडयाराचे म्हैसूरचें राज्य पुढें आले व हे वडयार रोज धिमेपणानें कर्नाटक व्यापून विजापूर व गोवळकोंडा सुलतानाच्या मुल-खावर स्वाऱ्या करू लागले या वेळच्या इतिहासात मुसलमानाच्या सैन्यामध्यें लढणाऱ्या मराठे सरदारात शहाजी, माठाजी, वेदोजी, अनन्तोजी व बाळाजी हैबतराव याची प्रामु-ख्याने गणना होते.

म्हैसुरात मराठा सत्तेचा पाया घालण्याचा मान मालोजी भोसल्याचा मुलगा शहाजी ( १५९४ - १६६४ ) यास आहे शहाजी प्रथम अहमदनगरच्या सुलता-नाचे पदरीं सरदार होता. नतर विजापुरच्या सुलतानाकडे तो नोकरीच्या निमित्तानें होता. विजापुर सोडून कांहीं दिवस मोगल बादशहाचे पदरीं राहून शेवटीं (१६३२) विजापुरच्या आदिलशाहीस जाऊन तो मिळाला १६३७–१६३८ सालीं रणदुल्ला खानाबरोबर कर्नाटकाचे स्वारीवर शहाजी गेला व मागडिच्या इम्माडी केम्पगौडा-पासून (१५६९–१६५९) घेतलेल्या बेंगलूरचा तो सुभेदार झाला. पुढें १६४९–५० मध्यें शहाजी विजापुरास कैदेंत होता. तो काल सोडून दिला तर बेंगलोर घेतल्या-

पासूनच्या पुढील पंचवीस वर्षात शहाजीनें बेंगलोर व कोलार जिल्ह्याचा बहुतेक भाग जिंकून तेथें आपले जवळजवळ स्वतंत्र असें राज्य चालविलें असें म्हणण्यास हरकत नाहीं पण नावाला मात्र तो भाग विजापूरच्या सुलतानाचा आहे. असे तो दाखवीत असे. मध्यतरी १६५४ सालीं विजापूर व गोवळ-कोंड्याच्या सुलतानाच्या फौजानीं बहुतेक सगळा कर्नाटक जिंकला म्हणून १६५६ सालीं दोघा सुलतानानीं कर्नाटक प्रात आपसात वाटून घेतला. म्हैसूर राज्याच्या उत्तरे-कडील घाटावरील कर्नाटक —विजापूर—बालाघाट हा भाग व म्हैसूरच्या आग्नेये कडील सरहद्दीवरील घाटाखालील कर्नाटक—विजापूर—पायन्घाट हा भाग विजापुर कराकडे आला शाहाजीला या सर्व भागाची सुभेदारी मिळून बेंगलोर, होस्कोट, कोलार, दोदबाळापुर व शीरा हा भाग जहागींर म्हणून याचवेळीं मिळाला. या घडामोडींमुळें शहाजीचे या भागात बरेंच वर्चस्व वाढलें व १६५७ सालीं त्यानें स्वत चा अजरकखान महाराज राजश्री शाहाजीराजा साहेब असा उल्लेख केल्याचें आढळतें. बेंगलोरास दक्षिणेतील जहागिरीचें ठाणें ठेवून व उत्तरेस पुणें व सुपें या परगण्याचा कारभार शिवाजीकडे सोंपवून शहाजीनें विजापुरकराच्या नोकरींत १६६४ सालापर्यंत सबध कर्नाटकात धुमाकूळ घातला होता. पुढें १६६४ सालीं बसवापट्टण येथें शहाजीस अकस्मात मृत्यु आला.

शहाजीस, त्याच्या तुकाबाई(मोहिते)या दुसऱ्या पत्नीपासून झालेला व्यंकोजी म्हणून मुलगा होता शहाजीच्या मृत्यूनतर म्हैसूरातील जहागीरी व्यंकोजीकडे आली असें दिसते कीं, आपल्यामागें व्यंकोजीस ही जहागीरी मिळावी अशी शहाजीची इच्छा होती. विजापुरकराचा सेनापती म्हणून व्यकोजी १६७५ पर्यंत बंगलोरास होता; पण त्या सालीं व्यंकोजीनें तजावरावर स्वारी करून तेथील राजाचा पराभव केला व स्वतःच तें राज्य बळकाविलें या नतर विजापुरच्या सुलतानाचें स्वामित्व झुगारून देऊन त्यानें तजावर हीच आपली राजधानी केली. व्यकोजीचा तजावरवरील विजय ही मराठ्याच्या दृष्टीनें अत्यत महत्वाची गोष्ट आहे. त्यावेळीं विजापूर व गोवळ-कोंडाची राज्यें मोंगलाच्या व शिवाजीच्या स्वाऱ्यामुळें फार जेरीस आली होती व त्यास कर्नाटकातील मुलुखगिरीला चागलाच वाव मिळाला.

तजावर जिंकल्यावर देखील व्यकोजीनें बेंगलोरची जहागीर सोडली नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याचा मराठा सैन्यानें म्हैसूरच्या राज्याच्या सरहद्दीवरील बराच मुलूख पादाक्रात केला, परंतु १६७५ पासूनच व्यकोजीचा कारभार फारच अव्यव-स्थित झाला, यामुळें कटाळून जाऊन शहाजीचा जुना व विश्वासू प्रधान व व्यकोजीचा म्हैसुरातील जहागिरीचा कारभारी रघुनाथपत हा शिवाजीस जाऊन मिळाला व शिवाजीनें १६७७ सालीं कर्नाटकावर स्वारी केली या स्वारी मुळें व्यंकोजीच्या तंजावरातील राज्यास कांहीं धक्का बसला नाहीं. शिवाजी आपल्या वाडिलोंपार्जित जहागिरीवरून महाराष्ट्रास १६७८ सालीं परत गेला. त्यावेळीं राजा



रावसाहेब उदारशिरोमणी
टी. पद्मनाभ राव, त्रिवेंद्रम्
म. ए फंडाचे पेट्रन.



**दि. ब. टी. वेंकस्वामी राव**
रामनद्‌चे दिवाण



राजसभा भूषण
**कर्पूर श्रीनिवास राव**
चीफ इंजिनिअर, म्हैसूर.

चीक देवराज वडयार ( १६७३–१७०४ ) हा म्हैसूरचा राजा होता. शिवाजीच्या कर्नाटकावरील स्वारीमुळें म्हैसूरच्या राज्यास कांहीं धक्का बसला नाहीं इतकेंच नव्हे तर ऑगस्ट १६७७ मध्यें ( जिंजीहून जाताना ) शिवाजीनें म्हैसूरकडे मोर्चा फिरविला होता. तेव्हां चिक्कदेवराज वडयारनें त्यास अडविल्यामुळें परतावे लागले होते. असे म्हणतात.

शिवाजीच्या कर्नाटकांतील स्वारीनंतर मराठ्यांच्या दक्षिणेतील मुलुखाच्या स्वामित्वास बळकटी आली. दक्षिणेकडील मराठी मुलुखाची वाढ व जिंकलेल्या मुलखातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्यास उपयोगी असे सर्वत्र पसरलेले किल्ल्यांचें जाळें हीं त्याच्या स्वामित्वाची दिग्दर्शक होती. १६७८ सालीं बेंगलोराखेरीज जिंजी वेल्लोर व तंजावर हीं मराठ्याची नाक्याची ठाणीं होऊन बसली होती १६७८ते १६८० पर्यंतच्या दोन वर्षांत उत्तरेकडील कर्नाटक–विजापूर बालाघाटापासून दक्षिणेतील त्रिचनापल्लीपर्यंतच्या सर्व भागात मराठे नवीन नवीन मुलूख जिंकत होते.

मराठ्याच्या या मुलुखगिरीमुळें त्यांचा १६८० ते ८६ च्या कालात म्हैसूरच्या चिक्कदेवराज वडाऱ्याशीं झगडा झाला चिक्कदेवराजानें गादीवर आल्यापासून आपले राज्य वाढविण्यास सुरवात केली. दक्षिणेस मदुरेच्या राज्याचा व उत्तरेस विजापुरकराचा बराच मुलुख त्यानें जिंकला होता १६८२ सालीं त्यानें त्रिचनापल्लीस वेढा दिला. या झगड्यात प्रथम श्रीरंगपट्टणच्या आसपास मराठ्याची पिछेहाट झाली पण शेवटीं मराठ्यांना जय मिळाला.

त्या वेळीं मोंगल बादशहा औरंगजेब सर्व सेनेनिशीं महाराष्ट्रात उतरला होता त्यास तोंड देण्यासाठीं मराठ्यांनाहि दक्षिणेंतील आपल्या फौजेची फार जरूर होती म्हणून मराठ्यानीं म्हैसूरच्या राजाशी ( जुलई १६८६ ) मध्यें तह केला. मराठ्याचें सैन्य म्हैसूरातून आपल्या मुलुखात गेले, व विजापूरच्या राज्याचा लवकरच ( सप्टेंबर १६८६ ) शेवट झाला हें पाहून चिक्कदेवराजानें मराठ्याशीं झालेल्या लढाईतील आपले नुकसान लवकरच भरून काढलें. या परिस्थितींत व्यंकोजीस तंजावराहून बेंगलोरची आपली जहागीरी पाहाणें फार अवघड वाटूं लागले, म्हणून त्यानें १६८७ सालीं तीन लक्ष रुपये घेऊन ती जहागीर चिक्कदेवराजास विकली अशा रितीनें जवळ जवळ पन्नास वर्षे मराठ्याच्या हातीं असलेले बेंगलोर त्याच्या हातांतून १६८७ सालीं कायमचे गेले.

पुढे असें झाले तरी मराठ्यांचा बेंगलोर, कोलार व टुमकूर जिल्ह्यांतील कांहीं भागांशीं मराठ्याचा संबंध सतराव्या शतकाच्या अखेरीस ( १६८७–१७०० ) व अठराव्या शतकाच्या सुरवातीपासून १७६१ पर्यंत पुढें कांहीं दिवस टिकून होता. कर्नाटकात मराठ्याच्या फौजा व शिपायांच्या टोळ्या मोगल सैन्याशीं बराच काल (१६८९–९८) झुजत होत्या त्यावेळीं या मुलखातून मराठे मारखे जात येत असत. पुन्हा अठराव्या शतकात मराठ्यानीं दक्षिणेकडे लक्ष दिलें त्यावेळीं ( १७२०—६१ )

म्हैसूरचे राजे, निजाम व अर्काटचा नबाब यांचेविरुद्ध लढाया करण्याची तयारी करण्यास पेशव्यांनीं या भागाचा चांगला उपयोग केला तसेंच या मुलुखातील ठाण्याचा उपयोग मराठ्यांना कर्नाटकातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्यास चांगलाच झाला. बाळाजी बाजीराव पेशव्याची 'हिंदुपद पातशाही' स्थापण्याची फार मोठी महत्वाकांक्षा होती, पण दुर्दैवानें पानिपतच्या लढाईंत मराठयांचा पराभव होऊन ती निष्फळ झाली अबदालीला तोंड देण्यासाठीं आपली मोठी फौज उत्तरेकडे पाठवावयाची म्हणून पेशव्यानें म्हैसुराकडील सर्व मराठी सैन्य परत बोलाविलें मराठी सैन्य परत गेले म्हणूनच हैदरानें आयतेंच असतां बळकाविलेले म्हैसूरचें राज्य त्याला पूर्णपणें बळकावितां आले. एवढ्यावरच तो थांबला नाहीं, पण त्यानें मराठयांचीं तिकडील सर्व ठाणीं एका मागून एक काबीज केली अशा रितीनें म्हैसुरातील मराठी सत्ता विलयास गेली मराठयांचा म्हैसुरावर यानंतरही बरेच दिवस डोळा होता पण त्यांना कांहींच करितां आले नाहीं टिपू सुलतान गेल्यानंतर [१७९९] पुष्कळ मराठे संस्थानच्या मुलकी व लष्करी नोकऱ्यांत पुढें आले परंतु याच वेळीं मराठी साम्राज्याचा ऱ्हास सुरु होऊन लवकरच मराठी साम्राज्य लयास गेले

सतराव्या व अठराव्या शतकातील म्हैसुरातील मराठ्यांच्या सत्तेचीं स्मृतिचिन्हें बरीच अस्तित्वात आहेत हीं कानडींत लिहिलेल्या शिलालेखाचें रूपानें असून बेंगलोर, चन्नपट्टण, होस्कोट, नेलमंगल, डोडबाळापूर, कोलार, मुळबागल, चिन्तामणी, श्रीनिवासपूर, बागेपल्ली, मधुगिरी व चन्नगिरी तालुक्यांत विशेष प्रमाणांत सांपडतात मराठ्यांनीं या मुलुखांत येऊन नुसती लुटालुट वगैरे न करतां स्थानिक प्रजेच्या हिताकरितां बऱ्याच गोष्टी केल्या हें या शिलालेखावरून उत्तम प्रकारें कळून येते.

उपलब्ध असलेल्या कागदपत्रांत श्रीमंत शामण्णा देशकुलकर्णी यांनीं हसुगुर येथील बिनसन्नाच्या एका जमिनीचे ता. ३-११-३७ रोजीं केलेलें बक्षीसपत्र सगळ्यांत जुनें आहे. यानंतर शहाजीच्या वेळीं १६४७ ते १६६३ सालीं लिहिलेले अनेक कागदपत्र उपलब्ध आहेत २८-९ १६५७ रोजीं त्यानें बावानूर अहमद यास चांगल्या कामाबद्दल दिलेल्या नेलमंगल तालुक्यातील सक्कर गांवातील कांहीं जमिनीचें बक्षीसपत्र उपलब्ध आहे दुसऱ्या एका कागदांत ता. १२-१-१६६० रोजीं पचन्नट्टणातील नागु ली गाव सिद्धलिंगगौडा यास इनाम म्हणून दिल्याचा उल्लेख आहे तिसऱ्या एका कागदांत ५-१०-१६६० रोजीं अंत्राजी पंडित नांवाच्या मराठी ब्राह्मण अधिकाऱ्यास इनाम जमीन दिल्याचा उल्लेख आहे. चौथ्यांत १९-१६६१ रोजीं ब्यालिसी जाविरण्णा यास १०० खंडुगा जिराईत जमीन इनाम दिल्याचा उल्लेख आहे पांचव्यांत १-५-१६६३ रोजीं अलम्बिगिरी टिप्पाशेटी यास कोलार परगण्यातील होलूर गावचें जुनें तळें दुरुस्त केल्याबद्दल सहा खंडुगे भाताची जमीन इनाम दिल्याचा उल्लेख आहे. आणखी एक कागदांत ता.

## रौप्यमहोत्सव कमिटीचे सभासद.



पी सखाराम राव बी. ए., बी. एल.
वकील, त्रिवेंद्रम्



एम. राजा राव एम्. ए.
हेडमास्तर, हायस्कूल, माधवगिरी

३-३-१६४० रोजीं शहाजीचा ज्येष्ठपुत्र सभाजी यानें सजी मठाच्या चनबसप्पा वडेर यांस हशीपूर गाव इनाम दिल्याचा उल्लेख आहे ता ५-११-१६५३ च्या एका कागदात कोलार सीमा भागातील कनयाज पंडित नावाच्या कारभाऱ्यानें कोंडिगणहल्ली गाव इनाम दिल्याचा उल्लेख आहे ता २०-१०-१६५४तील एका कागदात याच कनयाज पडितानें चदया ताम्राळी दीपगौडा याप मुदुवाडी-मल्लसमुद्र तडाव बाधल्याबद्दल त्या तलावाखालील काहीं जमीन इनाम दिल्याचा उल्लेख आहे. १६-८-१६६१ च्या एका कागदात धोंडाजी हैबतराव नावाच्या शहाजीच्या एका कारभाऱ्यानें चन्नपट्टणच्या मलूर होबळींतील बेबूरच्या डोंगरावरील व्यकटेश्वराचे देवळात दीपस्तंभ बाधला असा उल्लेख आहे १४-३-१६६२ सालातील एका कागदात शहाजीच्या हाताखालील रहदुर्गच्या बारणाजय राजा हवालहार यानें सीमगळ चिक्कदेव याचा मुलगा तिमप्पा याचे स्मरणार्थ काहीं इनाम जमीन दिल्याचा उल्लेख आहे व्यकोजीच्या वेळचाहीं एक कागद उपलब्ध आहे, त्यात ता २०-१-१६३६ रोजीं जयन्ता बाईनें काश्यप गोत्री विरुपाक्ष शंकर याचा मुलगा भाऊजी पंडीत यास कोलारसीमेतील उत्तर गाव अग्रहारासाठीं इनाम दिल्याचा उल्लेख आहे छत्रपती सभाजी महाराजानीं ता ३१-७-१६८० रोजीं उत्तणूर-मदवास गावच्या चेन्नीभट्टाच्या व्यकटेश शास्त्री नावाच्या मुलास काहीं बक्षिस देण्या बद्दल कोलारच्या कारकुनास पाठविलेले आज्ञापत्रही आज उपलब्ध झाले आहे. दुसऱ्या एका कागदात ता २९-१-१६८९ रोजीं होस्कोट तालुक्यातील अग्रहारम् गावातील अर्धा खडुगा पेरण्याइतकी जमीन देवरना नाईक यास माडेश्वराची पूजा अर्चा करण्याबद्दल इनाम दिल्याचा उल्लेख आहे मल्कोजीनें ता. ४-१-१६८६ रोजीं तिरुवेगलनाथाचे सेवेसाठीं कोलारसीमेतील अलमगिरी गाव इनाम दिल्याचा उल्लेख एका कागदात आहे

आठराव्या शतकातील कागदपत्रांपैकीं एकात एप्रिल १७२७ मध्ये माणकोजी राजानें हदकन्नळी बैरागौडा यास इनाम जमीन दिल्याचा उल्लेख आहे १९ जानेवारी १७२८ च्या दोन कागदपत्रात आण्णाजीनें शेषोपतास होस्कोट तालुक्यातील सूळिबेले येथें मोठे तळें बाधल्याबद्दल इनाम दिल्याचा उल्लेख आहे त्याचप्रमाणें १०-१-१७४० च्या एकात सुभेदार यन्ताजी बसलेराव यांनीं मरिगौडा यांस कोलार तालुक्यातील वोक्कलेरी जवळील दादरेहल्ला येथें तळें बाधल्याबद्दल इनाम दिल्याचा उल्लेख आहे. ता. २८-८-१७५९ च्या एका कागदात श्रीमत साहेबानीं (नानासाहेब पेशव्यानीं) सरजामीदार व बसवपट्टणच्या सागर पेटयातील शेट्टी लोकासमोर मर्रालिंगाप्पा शेट्टी यास पालखी अबारीच्या मानासाठीं सुलिकेरी सीमेतील कोळे भागातलि उदोवा गाव इनाम दिले असा उल्लेख आहे. १७६७ व १७७५ साली मल्हारराव, पहिले माधवराव पेशवे व मुरारीराव घोरपडे यानीं दिलेल्या इनामाच्या बक्षिसपत्राचे काहीं कागद उपलब्ध झाले आहेत.

अवव्व्याव्या व सोळाव्या शतकांच्या दरम्यान श्री. शंकराचार्य व श्री. माधवाचार्य यांच्या पीठाधिपतीकडे आलेले काहीं कुटुंबाचे वंशज सोडून दिले तर संस्थानांतील बहुतेक सर्व मराठे लोक १६६२नंतर मराठी सैन्याच्या स्वाऱ्याबरोबर आलेल्या लोकांचे वशज आहेत असे दिसून येते. म्हैसूरच्या पहिल्या राजाचे वेळीं कांहीं मराठे मोठमोठ्या हुद्यावर होते यात ब्राह्मणाचा भरणा बराच मोठा होता. हैदरअलीस गादी बळकाविण्याच्या वेळीं प्रतिकार करणारा प्रसिद्ध खंडेराव हा अशा मराठ्यापैकीं एक होय. खंडेराव दुसऱ्या कृष्णराजाचा विश्वासू प्रधान होता. ज्यातोशीखाना कृष्णरावानें टिपुविरुद्ध बंड केले तो पूर्वीच्या हिंदू राजांचा खजिनदार होता वेलिंग्टनच्या पत्रात उल्लेखिलेला ' विष्णप्पा पण्डित ' हा एक मराठी ब्राम्हण होता. याचे खरें नाव भिष्टोपंत बदामी असून हा म्हैसूरच्या राज्याची पुन:स्थापना झाल्यावर बरीच वर्षे म्हैसूर सस्थानातील सैन्याचा सेनापती होता. त्याच्या कामाची व शौर्याची वाखाणणी तिसरे कृष्णराज वडयार व ब्रिटिश सरकार या दोघांनींही केली होती असे समजते

१८१८ सालीं पेशव्याचे राज्य खालसा झाल्यावर बरीच मराठा घराणीं म्हैसुरास आश्रयाकरितां आली. तिसऱ्या कृष्णराजानें त्याना आश्रय दिला इतकेंच नव्हे तर त्यांना सस्थानच्या नोकरींत काम करण्याची संधी दिली. या मराठी कुटुंबाच्या आगमनानें संस्थानातील कारभाराची भाषा म्हणून एकेकालीं मराठीचा फार प्रसार झाला व राज्याची सेवा करणें हें आपले पहिले कर्तव्यकर्म आहे असें समजणाऱ्या मराठी संस्कृतीचा प्रसार याचवेळीं झाला. लष्करी व इतर अधिकाराच्या मोठमोठ्या जागावर म्हैसुर येथील मराठ्यांनीं हुद्याचीं कामें करून आपली कर्तव्यनिष्ठा व उद्योग या गुणामुळें आपले नाव म्हैसुर संस्थानांत प्रसिद्ध केले आहे. शहाणपणा व दक्षता या गुणामुळें ते राजकारणांत पुढें आले आहेत सध्या म्हैसूर सस्थानातील मराठयाची लोकसख्या ९२००० वर आहे, पण त्यात मराठा ब्राम्हणाची गणना केली गेली नाहीं मराठे लोक सस्थानातील सर्व जिल्ह्यांत पसरलेले आहेत, पण शिमोगा, कोलार व बेंगलोर या जिल्ह्यांत त्याची बरीच वस्ती आहे स्थानिक परिस्थितीमुळें बऱ्याच मराठयांनीं कानडी भाषा स्वीकारली आहे व त्यामुळें म्हैसूर सस्थानात मराठी भाषा बोलणारे लोक ९०,००० च आहेत. म्हसूरच्या फौजेंत अद्यापि मराठ्यांचा बराच मोठा भरणा आहे. म्हैसूर राजाच्या सेवेंत पूर्वीं पुढे आलेल्या मराठा ब्राम्हण सेना–नायकांचे बरेच वशज सध्यांच्या म्हैसूरच्या सैन्यात मोठया अधिकाराच्या जागेवर आहेत.

---

# दक्षिण हिंदुस्थानांतील मराठे.



ले० रा. ब. आर. कृष्णराव भोसले, आय एस. ओ.

[ या लहानशा लेखात गेल्या तीनशें वर्षांत मराठ्यानी दक्षिण हिंदुस्थानात केलेल्या कामगिरीचा गोषवारा दिला आहे सपादक— ]

## ऐतिहासिक व प्राचीन .

" हे लोक आपल्या आश्रयदात्याशीं कृतज्ञ असतात, शत्रूची दयामाया करीत नाहींत, सकटात पडलेल्याने सहाय्य मागितले तर मदत करण्यास काकू करीत नाहीत " असे प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएन त्संग याने मराठ्याविषयीं लिहिले आहे तसेच प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार मेकॉले म्हणतो " मराठे लोक शूर असून बराचवेळ हिंदुस्थानातील इतर राजेरजवाडे याचे नावसुद्धा ऐकताच चळचळ कापत. इंग्रजाच्या चातुर्यास दैवाने हात दिला तेव्हाच पुष्कळ अनिश्चित व जिवावर उदार होऊन केलेल्या लढायानतर त्याना मराठ्याचा पाडाव करिता आला "

पुणे येथे १९२१ साली श्रीशिवछत्रपतींच्या स्मारकाच्या पायाचा दगड बसविण्याच्या समारभाचे वेळीं हिज रॉयल हायनेस, प्रिन्स ऑफ वेल्स म्हणाले " थोड्याच वेळापूर्वी ज्या मराठा योध्यानीं गेल्या महा युद्धात साम्राज्यासाठीं प्राणाहुति दिली त्याच्या स्मारकाचा पायाचा दगड मी बसविला. खरोखर शिवाजीच्या शिपायामध्ये जी भावना असे ती अजून जागृत आहे हे योध्यानीं सिद्ध केले आहे."

* टीपः— हा दगडी स्मारक स्तभ प्रथम शनवारवाड्यासमोरच्या तिकोनी जागेत होता. परतु तेथून काढून तो सध्या पुणे लष्करातील एका प्रमुख जागेवर बसविण्यात आला आहे.

---

## शिव छत्रपतींची कुळकथा,

उदेपूरचे राणे हे चितोडच्या राण्याचे वशज. उदेपूरचे घराणे हिंदुस्थानातील सर्वांत जुनें घराणें आहे हे सर्व विश्रुत आहे आणि याच कुळात शिवाजीचा जन्म झाला.

शिवाजीचा जन्म भोसले घराण्यात झाला. भासवकुल ( सूर्याचा वश ) याचा ' भोसले ' हा प्राकृतात अपभ्रश झाला असावा. तजावरचे राजे महाराष्ट्रांतील स्वराज्य सस्थापक शिवाजी महाराजाचे इतके जवळचे आप्त असताना व येथील राज्य इतर मराठा राज्यापेक्षा पुरातन असून जवळ जवळ दोनशें वर्षें ( १६७५–१८५५ ) टिकले असताना देखील ग्रँट डफ किंवा हिंदी बखरकारानीं तजावरच्या राज्याच्या इतिहासाकडे फार कमी लक्ष दिलें हे आश्चर्य आहे. असें न्यायमूर्ति रानड्यांनीं आपल्या ' मराठी सत्तेचा उदय ' या पुस्तकात म्हटलें आहे, ते सर्वस्वी खरें आहे,

## दक्षिण हिंदुस्थानांतील मराठी राज्य.

१६६८ साली शहाजी भोसल्याच्या नेतृत्वाखाली मराठे पहिल्याने दक्षिण हिंदुस्थानात आले त्यावेळी विजापूर दरबारचा सेनापति म्हणून शहाजीने दक्षिणेत स्वारी केली होती. शहाजीला कर्नाटकात तीस एक वर्षे लढावे लागले. या मुदतीत त्याने वेल्लोर व जिंजि हे किल्ले जिंकले. शिवाय म्हैसूर, कोलार व इतर ठिकाणीहि जहागिरी मिळविल्या. या व्यतिरिक्त त्याने मदुरा व तजावर येथील नायक राजास विजापुर दरबारची मांडलिकी पत्करावयास लावून त्याना खंडणी द्यावयास लावली.

शहाजीच्या मृत्युनतर त्याचा मुलगा व्यकोजी याजकडे दक्षिणेतील जहागिरी आली या वेळी तजावर व मदुरा येथील नायक राजामध्ये भांडणे सुरू झाली ही संधि साधून व्यकोजीने तजावर घेतले व १६७५ साली तेथेच आपले स्वतत्र राज्य स्थापन केले

---

## तंजावरचे राजे

१६७६ साली शिवाजीने जेव्हा कर्नाटकावर स्वारी केली व मुलुखामागून मुलूख जिकले तेव्हा व्यकोजीला आपले राज्य जाते की काय अशी भीति पडली निराश होऊन सन्याशी होण्याचा त्याने विचार केला हे ऐकून शिवाजीने आपल्या भावास एक पत्र लिहिले व त्यात व्यंकोजीला आपल्या कर्तव्याची जाणीव करून दिली व्यकोजीनेही बैरागी होण्याचा मानस सोडून दिला यावेळी शिवाजीने व्यकोजीच्या तजावरच्या राज्याची सत्ता दृढ करून मग महाराष्ट्रात प्रयाण केले.

व्यकोजी १६८७ पर्यंत राज्य करीत होता त्याच्या निधनानतर त्याचे शहाजी, सर्फोजी व तुकोजी या नावाचे तिन्ही मुलगे एकामागून एक गादीवर आले. त्या तिघानीं मिळून जवळ जवळ पन्नास वर्षे राज्य केले. १७३५ मध्ये तुकोजी मरण पावला व त्यानतर १७४० मध्ये प्रतापसिंह गादीवर येईपर्यंत एकामागून एक बरेच राजे गादीवर आले. प्रतापसिंहाने तेवीस वर्षे राज्य केलें व त्याचेनतर तुळजाजी गादीवर आला.

तुळजाजीनतर त्याचा दत्तक पुत्र सर्फोजीराव गादीवर यावयाचा पण त्याचा सावत्र भाऊ अमरसिंग यानें गादी बळकावली श्वार्ट्झ नावाचा डॅनिश मिशनरी सर्फोजीचा मित्र होता त्याने मदत केल्यामुळे गादीवरील सर्फोजीचा हक्क पुन. प्रस्थापित झाला व १७२८ साली तो गादीवर आला. ( मध्यतरी अमरसिंगास वर्षासन घेऊन स्वस्थ बसावे लागले ).

सर्फोजीनतर त्याचा मुलगा शिवाजी गादीवर आला पण १८५५ साली तो निपुत्रिक वारल्यामुळे तजावरचे राज्य ईस्ट इंडिया कपनीने खालसा केले शिवाजीच्या राण्याना मात्र वर्षासनें मिळून राजवाड्यात राहण्याची परवानगी देण्यात आली.

---

## अर्णी, अर्काट, कोचीन, पदुकोटा व सन्दुर

अर्णी येथील लहानशी जहागीर आजतागायत एका मराठी ब्राह्मण जहागीरदाराकडे आहे. दोनशे वर्षांपूर्वी विजापुरच्या सुलतानाने ही जहागीर सध्याच्या जहागिरदाराच्या पूर्वजास त्याच्या



आर. एस. शेळवणकर एम. ए.
वृत्तपत्रव्यवसायी, मुंबई.



व्ही. के. बदामी, पीएच. डी., ( कँब्रिज )
डेप्युटी डायरेक्टर, शेतकी खाते, म्हैसूर



**रावसाहेब टी. माधव राव,**
**एल्. आर. सी. पी. ॲन्ड एस्.**
**रिटायर्ड डिस्ट्रिक्ट मेडिकल ऑफिसर, विझाग**



**बी. के बदामी जी. बी. व्ही. सी.**
**डायरेक्टर, गुराचे दवाखाने, द. हैद्राबाद**

लढाईतील शौर्याकरिता दिली होती अर्काटच्या नबाबाकडेहि निजामशाहीत ब्राह्मण या नावाने संबोधिले जाणारे काहीं मराठी ब्राह्मण मोठ्या हुद्यावर होते तसेच पदुकोटा व कोचीन संस्थानात मराठ्यांची बरीच वस्ती आहे, यापैकी काहीं मोठ्या हुद्याच्या जागापर्यंत चढले. बल्लारी जिल्ह्यातील संदूरचे मराठी संस्थान मात्र आजहि टिकून आहे. हे संस्थान प्रसिद्ध मराठे सरदार सन्ताजी घोरपडे यांच्या एका वंशजाने स्थापन केलेलें आहे.

मद्रास इलाखा व जवळची संस्थाने यांत असा एकही जिल्हा नाहीं कीं ज्यात तेथेच स्थाईक झालेल्या मराठ्यांची लहानशी का होईना, पण वसाहत नाहीं ( हे विधान पान यावर दिलेल्या लोकसंख्येच्या आकड्यावरून स्पष्ट कळून येईल ) दक्षिण कानडा, मलबार, कोचीन व त्रावणकोर या संस्थानातील मराठे लोक मात्र बहुतेक समुद्रमार्गे आलेल्या लोकांचे वंशज आहेत व शहाजी व त्यांचे मुलगे यांच्या स्वाऱ्यामुळे सत्राव्या शतकात प्रस्थापित झालेल्या राजकीय सत्तेशीं त्यांच्या वसाहतींचा संबंध नाहीं

तंजावर व त्याच्या आजुबाजूचा प्रदेश, उत्तर अर्काट, सेलम व मद्रास शहर यांत मराठ्यांच्या सर्वांत मोठ्या वसाहती असतील ही अटकळ बरोबर आहे त्रावणकोरच्या महाराजांनीं तंजावरास ' मराठ्यांचे दक्षिणेकडील घर ' असे नांव दिले ते यथार्थ आहे आपल्या मूळच्या मुलुखापासून इतके दूर असल्यामुळे व एकजूट झाल्यामुळे इकडील सर्व मराठ्यांना देशस्थ या सदराखालीं घालण्यात येते

तंजावरचे राजे आपल्या औदार्याबद्दल प्रसिद्ध होते असे या ग्रंथातील इतर काहीं लेखावरून कळून येईल कला व साहित्य यांविषयी त्यांना फार प्रेम असे सर्व मराठे राजे गुणग्राहक होते व त्यांनीं मोठ्या प्रमाणावर धर्मादाय केला तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालयासारखा अद्वितीय प्राचीन ग्रंथसंग्रह दुसऱ्या कोणत्याहि हिंदी संस्थानात आढळत नाहीं. त्यांच्या आश्रयाखालीं संगीतास ( तोंडचे व वाद्याचे दोन्हीहि ) इतकी उर्जितावस्था कीं तंजावरास अजून ' दक्षिण हिंदुस्थानातील संगीताचें माहेरघर ' असे म्हणतात इतरत्र गायनवादन पटु कलावंताच्या दिलेल्या चरित्रावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, दक्षिण हिंदुस्थानातील मराठे लोकांतून मोठे राज्यकार्यधुरंधर, अध्यापक, वकील, न्यायाधीश, एंजिनियर व संशोधक पुढे आले आहेत.

---

## सारांश

इकडील मराठ्यांची सद्यःस्थिति असावी तितकी चांगली नाहीं असें कोणास वाटण्याचा संभव आहे सर ए शेषय्या शास्त्र्यांनीं म्हटल्याप्रमाणे ते श्रीमंत नाहींत, त्यांना भीक मागता येत नाहीं, त्यांना उपाशी राहता येत नाहीं आणि जीवनकलहातून त्यांना वर डोकें तर काढलेच पाहिजे सर्वांना चांगला चरितार्थ चालविण्याइतकें द्रव्य मिळविण्यास मुख्य आवश्यकता म्हणजे सर्वांना चांगलें शिक्षण मिळणें ही होय. कोणच्या का मार्गाने होइना पण समजात असलेली निरक्षरता व अज्ञान नाहींसे केले पाहिजे १९२१ सालीं प्रिन्स ऑफ वेल्स आपल्या भाषणात म्हणाले त्याप्रमाणे भावी कालात मराठे शिक्षणाचे फायदे घेण्यास तयार व उत्सुक झाले पाहिजेत. निव्वळ शिक्षणानेंच या आधुनिक जगात त्यांचे सध्यांचे महत्त्व, पूर्वीचा मोठेपणा व स्वावलंबी व व्यावहारिक स्वभाव हे गुण यास साजेसा दर्जा ते कायम ठेवू शकतील

म. ए. फंड हाच दक्षिणेत निरक्षरता व शिक्षण यामधील एकटाच दुवा आहे.

---

# दक्षिण हिंदुस्थानी संगीत व महाराष्ट्रीय.

ले.—टि अप्पाजीराव, बी. ए बी एल. ॲडव्होकेट, मद्रास.

[ या लेखाचे लेखक श्री टी अप्पाजीराव याना सगीताची फार आवड असून त्याना हिंदी सगीत ( वीणा ) डिप्लोमा मिळाला आहे. ह्या विशिष्ट लेख लिहिण्यास आपल्या विषयाचे चागले ज्ञान असलेला लेखक मिळाला याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहोत.—स ]

दक्षिण हिंदुस्थानी सगीताची वाढ होण्यास महाराष्ट्रीयानीं पुष्कळ मदत केली यात शकाच नाहीं

'स्वरगत' हे वाद्य महाराष्ट्रीयानींच सुरू करून लोकप्रिय केले हे वाद्य वाजविण्यात चिटुस्वामीराव व त्याचे बधू कन्नुस्वामीराव हे प्रसिद्धीस आले ( चिटुस्वामीरावाचे चिरंजीव श्री. मल्हारीराव हे सध्या स्वरगत् वाजवितात पण वडिलाइतके ते अजून प्रवीण झाले नाहींत ). गोटवाद्य ( किंवा महानाटक वीणा ) श्रीनिवासराव व त्याचे चिरजीव सखारामराव यानीं पुढे आणला व त्यास जलशातील प्रमुख वाद्यात स्थान मिळवून दिले उत्तर हिंदुस्थानी 'मयूर' ( फारशीत याला 'तस' हे नाव आहे ) हे वाद्य 'बालसरस्वती' या नावाखालीं दक्षिणेंत आणण्यात आले व हे वाद्य वाजविण्यात जगन्नाथ भटगोस्वामींची बरोबरी अद्यापि इकडे कोणी केली नाहीं. जलतरग इकडे क्वचितच वाजविण्यात येते, पण ते वाजविण्यात रामराव इकडच्या लोकात पाहिले असून त्याची सर कोणाही आली नाहीं

व्हायोलिन फ्लुट वगैरे इतर वाद्याच्या बाबतींत म्हटले तरी फिडल वेंकोबाराव व फ्लुट कानुस्वामीराव या महाराष्ट्रीयाचीं नावे सगीतप्रेमी जनतेंत मशहूर आहेत

गवई घेतले तर तोडी सुदरराव व खमास माधवराव यानीं नावे प्रसिद्ध आहेत, हे दोघेही आपले राग गावून श्रोत्याना माना डोलवायला लावीत असत

दक्षिण हिन्दुस्थानी सगीतात सध्या लोकप्रिय झालेल्या हरिकथाकालक्षेपम् ( कीर्तन )ची वाढ होण्यास महाराष्ट्रीय लोकच कारणीभूत झाले आहेत. महाराष्ट्रीय कीर्तनकार इकडे येण्या-पूर्वी तामील प्रातात पुराणपठण व भागवत लोकानीं घराच्या ओट्यावर बसून जमलेल्या लोकास गोष्टींच्या रूपाने केलेला धार्मिक उपदेश करणे एवढीच पद्धति रूढ होती. धार्मिक प्रवचने सगीताच्या सहाय्याने करणें म्हणजे कीर्तन करणें ह्याच दक्षिणेतील जनतेने महाराष्ट्रीयापासूनच अनुकरण केले. साथकरी व मृदग वाजविणारे याना घेऊन मराठी पद्धतीनें तामील भाषेत हरिकथा—काल-क्षेपम् करण्यास सुप्रसिद्ध तजावर कृष्ण भागवत यानीं प्रथम सुरवात केली असें समजते.

कर्नाटक सगीतात 'आदि' ताल होता पण ज्यास 'देशादि' ताल म्हणतात ( हिंदु-स्थानी तालास हे दक्षिणेत नाव आहे ) तो महाराष्ट्रीयानींच दक्षिणेत लोकप्रिय केला. देशादि तालात प्रथम दोन अक्षरकालाचा विसर्ज असून नतर एकेक अक्षरकालाच्या विसर्जानें तीन ठोके असतात. आदितालात प्रथम एक ठोका, मग तीन अक्षरकाल थाबून एक ठोका मग एक अक्षर-काल विसर्ज, पुन्हा ठोका आणि मग एक अक्षरकाल विसर्ज असे आहे. अशा रितीनें प्रत्येकाला

एकूण आठ अक्षरकाल लागतात पण रचना मात्र विभिन्न आहे. त्यागराजाने या नवीन तालाच्या फायद्याकडे पाहून या तालात रघुनायका, सीतापते, मस्केलरा, सननना परमपावन इत्यादि पुष्कळ नव्यानव्या कृति बसविल्या. शिवाय महाराष्ट्रियांनीं संत तुकाराम, नामदेव, रामदास, मोरोपंत, विठ्ठलपंत इत्यादिकांचीं कवने लोकप्रिय केली, आणि यामुळेच सध्या भजनमंडळे व हरिकथा–कालक्षेत्रात वापरल्या जाणाऱ्या अभंग, दोहरे, ओव्या, साक्या व दिंड्या या चाली दक्षिणेत आल्या.

तुळजाजी व सर्फोजीसारख्या तंजावरच्या राजांनीं संगितशास्त्राच्या वाढीस फार मदत केली. तुळजाजीनें तर स्वतः त्या वेळच्या संगीतावर ‘ संगीत सारामृत ’ * हा ग्रंथ लिहिला ह्या राजाश्रयामुळे संगीताची भरभराट झाली व तंजावर हे संगीत शिक्षणाचे इतके मोठे केन्द्र बनले कीं त्या शहरास ‘ दाक्षिण हिंदुस्थानी संगीताचे माहेरघर ’ असे म्हणतात.

---

* हें पुस्तक सध्या इकडील कॉलेजांत व विद्यापीठात टेक्स्ट बुक म्हणून मंजूर झाले आहे.

# तंजावरचे कांहीं मराठी कवि.



( लें:—श्री. जी कृष्णराव, एम. एल ए. )

तजावरच्या मराठी राज्याच्या भरभराटीच्या काळीं महाराष्ट्रातून दक्षिणेकडे बरीचशी महाराष्ट्रीय ब्राम्हण कुटुंबे आली, व ती तजावरास स्थायिक झाली, अशा घराण्यातील पुष्कळांनी मराठी वाङ्मयाच्या वाढीस मदत करून प्रसिद्धी मिळविली आहे तजावर राजवाड्याच्या ग्रथालयातील पुरातन व बहुमूल्य कागद पत्र, लढवय्या मराठ्याना तलवार गाजविण्याच्या हौसेबरोबर फुरसद व सधी मिळाल्यास लेखणी चालविण्याची आवड होती याची साक्ष अजून पटवून देतात. तजावरच्या कित्येक मराठे राजानासुद्धा लिहिण्याची किती आवड होती हे त्यानी स्वतः लिहिलेल्या लेखावरून कळून येते

तंजावर राजवड्यातील ग्रंथालयात असलेलीं सर्व मराठी कागदपत्रे व पुस्तके याची यादी तंजावर येथील विद्वान श्री टी बी रामचद्रराव, बी. ए. यानीं मोठ्या परिश्रमानें तयार केली आहे ही यादी अभ्यासू लोकास उपयुक्त असून पूर्वीच्या मराठ्याच्या वाङ्मयविषयक कार्याची चागलीच कल्पना देते. पुढे मागें एकाद्या उत्साही व विद्वान प्रकाशकांच्या सहकार्याने ही यादी छापून प्रसिद्ध केली तर मराठ्याच्या इतिहासावर व वाङ्ममयावर पुष्कळच प्रकाश पडेल.

दक्षिण हिंदुस्थानातील प्रसिद्ध मराठी ग्रथकारात ताण्डलम् रामचंद्रराव याची गणना प्रामुख्यानें होते. ताण्डलम् हें खेडेगाव तजावराजवळ आहे. व चरितार्थासाठीं रामचद्ररावाचे पूर्वज ताण्डलम् येथें जाऊन राहिले. या ताण्डलम् घराण्यांत पुष्कळ विद्वान ग्रथकार व कवी होऊन गेले. त्यापैकीं रामचद्रराव, कृष्णराव व गोपाळराव हे तीन बधू शेवटचे होत. विद्वान मराठी कवि रामचद्रराव हे कुम्भकोणम येथें गाव मुन्सफ होते. कृष्णराव सरकारी नोकरीत शिरून डेप्युटी कलेक्टरच्या हुद्यापर्यंत चढले. व रावबहादूर गोपाळराव हेही सरकारी नोकरींत शिरले व आपल्या इग्रजी भाषेवरील प्रभुत्वामुळें प्रसिद्धीस पावून कुम्भकोणम येथील सरकारी कॉलेजाचे प्रिन्सिपॉल झाले.

सगळीकडे पाश्चात्य सस्कृतीच्या अनुकरणाची लाट उसळत होती तरी ताण्डलम घराण्यातील या तीन भावाच्या मनामध्यें मराठी सस्कृतीबद्दल जाज्वल्य अभिमान वसत असे. रामचद्ररावांनीं निरनिराळ्या वृत्तात मराठी काव्यें लिहून छन्दोबद्ध रचना व शब्दसौष्टव यामुळें आपले मराठी भाषेवरील असामान्य प्रभुत्व दाखविलें आहे.

त्याची कविता कर्णमधुर व समजण्यास सोपी आहे. त्यांच्या ‘ सुदामा भाग्योदय ’ या काव्यांतील कांहीं कविता वाचल्यास कविवर्य मोरोपताच्या काव्याची आठवण झाल्यापाचून राहात नाहीं. ‘ सुदामा भाग्योदय ’ या काव्यांत श्रीकृष्णाचा बालमित्र गरीब सुदामा हा दारिद्र्य व कष्ट बरीच वर्षे सोसून पुढें श्रीकृष्णाच्या कृपेमुळें श्रीमत होतो याचे वर्णन केले आहे.

सुदामा भाग्योदयातील कांहीं प्रासादिक व भक्तीनें ओथबलेल्या कवितांचे उतारे देण्याचा माझा विचार होता, पण जागेच्या अभावी तें शक्य नाहीं. रामचंद्रराव यांस सस्कृत

भाषेचें चागले ज्ञान होते दक्षिण हिंदुस्थानी संगीताचीहि त्यांना फार आवड होती. स्वभावानें ते भिडस्त व शात होते. रात्रीं सगळे शात झाले म्हणजे लहर लागल्यास स्वतः गाण्यास सुरुवात करीत व तासचे तास गात बसत. त्यांचा आवाज फार मधुर होता. असें सांगतात कीं ते त्याग राजाची कीर्तनें म्हणू लागले म्हणजे रसिक लोक शातपणें येउन त्याना न कळत ऐकत उभे राहात असत. अशा सतीतज्ञ कवीनें इतकीं भावनामय व प्रासादिक काव्यें लिहिली यांत आश्चर्य कसचें.

कृष्णरावानीही कांही चागल्या लहान कविता लिहिल्या आहेत सरकारी नोकरी करीत असताना फुरसदीच्या वेळात त्यांनी या कविता लिहिल्या आहेत.डेप्यूटी–कलेक्टरांना स्वतःचा असा वेळ किती थोडा मिळतो व त्याचे आयुष्य नीरस व रूक्ष किती असतें याची माहिती असणाऱ्या लोकांना कृष्णराव इतक्या चागल्या कविता लिहित हें सांगितले तर फार आश्चर्य वाटेल.

रावबहादुर गोपाळरावांनीं आंग्लकवी गोल्डस्मिथ यांच्या 'हर्मिट' नावांच्या काव्याचें मराठी काव्यमय भाषांतर केलें आहे हें काव्य गोपाळरावांच्या विद्वत्तेची व प्रतिभेची साक्ष देते. परभाषेंतील काव्याचे काव्यमय भाषांतर साध्या भाषेंत करून मूळ पुस्तकांतील भावना व विचार दुसऱ्या भाषेंत तंतोतंत आणणें हें कांहीं सोपे काम नाहीं, पण या काव्यांत गोपाळरावांनी तें साधले आहे.

या तीन बधूंच्या कविता एकत्र करून एका पुस्तकांत छापल्या आहेत. या पुस्तकामुळें दक्षिणेंतील मराठी वाङ्मयात चागलीच भर पडलीच भर पडली आहे.

---

# तंजावर येथील मराठ्यांच्या कालांतील वाङ्मय व कला

तंजावरच्या मराठे राजानीं अजरामर होण्यास योग्य अशा कांहीं लढाया मारल्या नाहींत किंवा तसेंच मुत्सद्दीगिरीचे डावपेच लढविले नाहींत तरी त्यांनीं सध्याच्या पिढीला कल्पना नाहीं इतकें वाङ्मयविषयक व संस्कृतिविषयक कार्य करून ठेवले आहे यांत शंका नाहीं. या लहानशा राज्याच्या उदयाबरोबर महाराष्ट्रीय समाजाचा बौद्धिक उत्कर्ष झाला. व्यकोजी व शिवाजी याचे वडील शहाजी भोसले विद्वानांस सढळ हातानें मदत करीत. जयराम कवीस एक सस्कृत समस्या सपूर्ण करण्यासाठीं व्यकोजीनें दिली होती. यावरून व्यकोजी थोडाबहुत विद्याव्यासंगी होता. असें दिसतें. त्यानें तेलगू भाषेंत द्विपद रामायण लिहिलें असें म्हणतात. व्यकोजीची बायको दिपाबाई इगळे हिनें कांहीं भक्तिरसप्रधान लहान गाणीं व कविता केल्या आहेत.

व्यकोजीचा प्रधान नरसिंगराव यानें 'त्रिपुर–विजय–चंपु' नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला. तसेंच जयराम कवीनें व्यंकोजच्या राजवटींत * 'पर्णाल–पर्वत–ग्रहणाख्यान" व 'राधामाधव–विलासचपू' हे दोन सस्कृत ग्रथ लिहिले. या चंपूंत तामीळ, तेलगू व मल्याळी भाषेतील शब्द आढळतात म्हणून त्यावेळीं मराठ्यांच्या दरबारांत या भाषानाही मान मिळे असें म्हणण्यास जागा आहे.

त्यावेळचे मराठी कवि ग्रंथकार म्हणून रघुनाथ, आनन्दतयय, गोसावीनन्दन व सुमानराव त्यांची विशेष ख्याति असे. पौराणिक व धार्मिक विषयावर लहान काव्यें हे त्यांचें लिखाण. तेलगू भाषेंतील 'कामकलानिधि' म्हणून शृंगारिक प्रबंधाचा कर्ता नेल्लोर शिव

राम कवि, व स्वामि नाथ देशिकर व वैद्यनाथ देशिकर हे तामिळ भाषेचें वैय्याकरणी याच कालात होऊन गेले.

व्यकोजीच्या पाठचा राजा शहाजी याच्या कारकीर्दीत सस्कृत व मराठी वाङ्मयाची फार भरभराठ झाली. शहाजी स्वतः तामीळ तेलगू व सस्कृत या भाषात लिही. शहाजीनें सस्कृत भाषेत ' शद्ब-रत्न-समन्वयम् ' नावाचा कोश व ' शृगार-मजरी ' नावांचा शृगारिक ग्रथ लिहिला असें म्हणतात

१६९३ साली शहाजीनें तिरु वाशनल्लूर गावाचें नाव शहाजीराजापुरम् म्हणून ठेवले व तें सबध गाव विद्वान अशा सेहेचाळीस ब्राह्मणास इनाम दिलें. या ब्राह्मणात कवि, नाटककार व तत्ववेत्ते होते व त्यायध्यें ' द्वितीय पतजळी ' ज्याना म्हणत असें रामभद्र दिक्षित प्रमुख होते. रामभद्राचे पुष्कळ शिष्य विशेषतः श्रीनिवास दिक्षित, वेंकटेश्वर कवी, वैद्यनाथ व भूमिनाथ कवी हे शहाजीच्या कारकीर्दीत पुढें आले. यांच्यापेक्षां कमी कमी प्रसिद्ध अशा तत्कालीन विद्वानाची नावें सागावयाची म्हटले तर वेंकटेश्वर दिक्षित, श्रीधर वेंकटेश, आप्पाशास्त्री व महादेव वाजपेयी याची नांवे सांगता येतील.

मराठी कवींत चिन्दाडशकर, नामजोशी, रगस्वामी, दिगबर व त्र्यबक ज्योतिर्विद यांचा उल्लेख करता येईल. यानीं शहाजीराजे, माता दीपाबाई व तजावरचे तत्कालीन वैभव यावर लहानलहान काव्यें केली आहेत. शहाजीच्या कारकीर्दीत तायुमानवर नांवाचा विख्यात तामीळ कवी होऊन गेला. त्यानीं केलेली गार्णी हिंदुस्थान, सिलोन, ब्रह्मदेश व मलाया या भागांत अजून लोकप्रिय आहेत. हा कवी वेदारण्यम् येथें जन्मला तारुण्यातच विरक्ति होऊन त्यानें ' मौनास्वामी ' गुरुकडून दीक्षा घेतली होती.

सरफोजीनें आपल्या बापाच्या वेळच्या विद्वानास आश्रय देण्याची प्रथा पुढें चालू ठेवली. त्यालाही सस्कृत व मराठीचें बरेंच ज्ञान होते. त्यानें लिहिलेल्या लहान कविता तजावरच्या सरस्वतीमहाले ग्रथालयात असलेल्या कागदपत्रात सापडतात. त्याच्या कारकीर्दीत जगन्नाथ व वेदकवि हे सस्कृत भाषेतले व शिवकिर योगी व ओप्पिलामणी पुलवर हे तामीळ भाषेतले ग्रथकार उदयास आले.

सरफोजीच्या मागून तुकोजी गादीवर आला. तुकोजीस सस्कृत मराठी, तामील व फारशी भाषा चांगल्याच अवगत होत्या त्यानें स्वत. ' धनवतारि विलास ' सगीत सारामृत ' हे ग्रंथ लिहिले. तुकोजीच्या दरबारीं सदाशिव व घनश्याम या नांवाचे दोन जाडे विद्वान होते. घनश्यामानें संस्कृतात ६४, प्राकृतांत २०, व इतर भाषात २५ ग्रथ लिहिले असें म्हणतात

वयाच्या बाराव्या वर्षीच त्यानें ' युद्धकाड ' लिहिले. विसाव्या वर्षी ' मदन संजीवन-भाव ' बाविसाव्या वर्षी ' नवग्रह-चरित्र व लवकरच 'दम्रुक' नावाचें नाटक त्यानें लिहिलें. घनश्यामास तत्कालीन वाङ्मय टीकेचे प्रमाण म्हणून मानले जाणारे नियम चागलेच अवगत होते. दक्षिणेंत ज्या कवींनीं जुन्या काव्यांतील ' वैदर्भी ' नांवाच्या काव्यरचनेच्या रीतीचे पुनरुज्जीवन केले त्यापैकीं घनश्याम एक होता. त्याची कविता साधी पण त्याचे ज्ञान अगाध व शब्दसंपत्ती दांडगी,कोट्या व अनुप्रास थोड्या फार असल्या तरी त्याची भाषा बहुतेक स्पष्ट व खोचदार आहे. त्याला फार गर्व असे व वंच्छेश्वरानें त्यालाच उद्देशून ' महिषाष्टक ' नांवाचें विडबनात्मक काव्य लिहिले.

गादीच्या वारसासाठीं दोनतीन वर्ष भांडणें झाल्यावर प्रतापसिंह १७४१ साली तंजावरच्या गादीवर बसला. त्यानेंहि मराठींत पुष्कळच काव्य ग्रथ उगम लिहिले आहे. ऋषिपचम-

* टीप-दोन्ही ग्रंथ इतिहासाचार्य प. वा: राजवाडे याना छापविले आहेत.

वृत्त, ध्रुवचरित्र, प्रबोध-चद्रोदय व कृष्ण-जनन व इतर कांहीं ग्रन्थ त्यानें लिहिले असें म्हणतात. कावेरीच्या तीरावरील त्रिवदुर हें यावेळीं मराठी विद्येचें अगर होते असें दिसतें. माधवसुतानें लिहिलेल्या 'भारता' ची एक प्रत तजावर ग्रथालयात आहे. राज्यकारभाराच्या कामातून वेळ काढून अमरसिंहानें कृष्ण अमात्य यास रुक्मिणी-स्वयंवर लिहिण्यास आज्ञा केली.

अरुणाचल कविराय शकरै पुलवर हे प्रतापसिंहाच्या वेळचे प्रसिद्ध तामील ग्रथकार होते. अरुणाचलानें लहानपणींच सन्यास घेतला व धर्मापुरम् मठांत वास्तव्य केले. त्यांच्या ग्रथातील 'असोमुखि नाटकम्' 'शिकली कोवै' व 'हनुमार पिळ्ळै तामील' यांचा उल्लेख करता येईल. त्याचे 'रामनाटकम' हे तामील रंगभूमीवर फार लोकप्रिय आहे असें समजतें. सर्करथ पुलवारचे 'मिशलय शतकम्' या एकाच पुस्तकात 'मिशलय नाड' चा वृत्तांत दिला आहे. याचा नामोल्लेख मात्र 'पुराणनुरु' सारख्या पुरातन ग्रथातही आहे.

तेलगू भाषेंतील 'राधिका—सान्त्वनमु' नावाची शृंगारिक कविता प्रतापसिंहाची कलावतीण 'मदुपलनी' हिनें लिहिली या कवितेंत लेखिकेची विद्वत्ता दिसून येते. तिला ही कविता लिहिण्यास तिचा शिक्षक राघवाचारी यानें मदत केली असें दिसतें. याशिवाय तिनें 'सप्तपदुलु' नावाची रसात्मक कविता लिहिली आहे.

प्रतापसिंहाच्या मागून तुळजाराजा गादीवर आला राजकारणाच्या दृष्टीनें याचें राज्य चांगलें झालें नाहीं परतु त्या वेळच्या हालात व दुःखद स्थितींत देखील राजदरबारी विद्वानाना आश्रय देणें व इतर रीतिरिवाज कायम ठेवणें वगैरे क्रम त्यानें कायम ठेवला होता. त्या वेळीं 'आचार्य विजयमु' चा कर्ता अलुरी कुप्पण्णा हा प्रसिद्ध तेलगू ग्रंथकार होऊन गेला. त्यास तुळजानें 'आन्ध्र कालिदास' ही पदवी दिली होती

त्या वेळीं शिवज्ञानस्वामि नावाचा तामील कवि, तत्ववेत्ता व टीकाकार होऊन गेला. मैकण्ड तेवरच्या 'शिवज्ञान' बोधम' या ग्रथावर त्यानें टीका लिहिली ती फार प्रसिद्ध आहे. त्यानें 'सिद्धान्त—मरबु खण्डन खण्डतम, नावाचा वादविवादात्मक ग्रथ व पांची पुराणाचा पाहिला खड लिहिला. या खडातील वर्णनें व त्याचें नाविन्य ही फार प्रशसनीय आहे.

वाङ्मयाकडून आपण आता सगीताकडे वळू तजावर हें हिंदी सगीताच्या 'कर्नाटक' पद्धतीचे फार जुने व महत्त्वाचे केन्द्र आहे. प्रसिद्ध त्यागय्याचा आजा गिरी—राज कवि हा शहाजीच्या दरबारीं गवई होता व त्याची वेदान्ती व भक्तिपर गाणीं शहाजीला फार आवडत. प्रतापसिंहाच्या कारकीर्दींत आदप्पैय्यर नावाचा गवई व वीणा वाजवणारा दरबारी गवई होता. वीणा कृष्ण अय्यर हा त्याचा मुलगा वीरभद्र अय्यर नावाचा गवई प्रतापसिंहाच्या दरबारीं होता. त्यानें पुष्कळ कीर्तनें, पदें, लिहिली आहेत. स्वतः तुळजाराजा व त्याची पत्नी वीणा वाजविण्यांत प्रवीण असून गवयाना दोघेहि उत्तेजन देत असत. तत्कालीन कलावंत लोकाना सर्वमान्यम् जमिनी व राहण्याचे वाडे देण्यात तुळजानें सढळ हातानें खर्च केला. प्रसिद्ध गवई साधू त्यागय्या याचा जन्म १७५९ सालीं झाला व त्यानें आपलें बालपण तंजावराजवळ तिरुवादी येथें घालविलें. तुळजाराजाचे वेळीं तिरुमलय अय्यर व वेंकटसुब्बा अय्यर नांवाचे दुसरे प्रसिद्ध गवई तजावरचे दरबारीं होते. वेंकटसुब्बास पांच वेली नन्जई जमीन देण्यांत आली. कीं, त्यानें ४००० निरनिराळे राग गायिले. असें म्हणतात

शिवाय तुळजाराजानें तिनेवेल्लीहून महादेव अण्णवी अथवा महादेव नाट्टुवाणर यास दक्षिणी सगीत पद्धत बसविण्याकरिता बोलाविलें. त्यानें तामील व तेलगू भाषांत पुष्कळ कीर्तनें लिहिलीं. वनजाक्षि व मुट्टुमानार नावाच्या दोन कलावतिणी महादेवाबरोबर तंजा-

वरास आल्या त्या राजासमोर ‘ नाच ’ करीत व ‘ भोंसला तुळजेन्द्र राजा ’ येथून सुरू होणारे वर्ण महादेव गाई. राजानें महादेवास तंजावरास एक वाडा व दहा वेली जमीन बक्षीस दिली.

सुब्बराय नट्टुवनर या दुसऱ्या संगीतज्ञानेंही तुळजाराजावर गाणीं रचली. राजानें त्याला बक्षीस दिलेली इमारत अजून ‘ नट्टुवान चावडी ’ म्हणून प्रसिद्ध आहे. सुब्बरायाचे चिन्नय्या व पोन्नय्या हे दोन्ही पुत्र संगीतांत प्रवीण होते भागवतर लोक व्हायोलिन व मृदंगाच्या सहाय्यानें ‘ कालक्षेपम् ’ करतात ती व शिन्नमेलम्‌च्या सहाय्यानें नाच होतो ह्या दोन्ही पद्धती तंजावरासच सुरू झाल्या.

---

# तंजावर येथील मराठ्यांच्या सैन्याची व्यवस्था व सरंजाम



[ ले. आर. एस. एस. ]

[ दक्षिणेकडे गेलेल्या महाराष्ट्रीयांनीं बुद्धिमत्ता व धडाडी या बाबतींत आपले नाव फार पूर्वीपासून गाजविले आहे पण अलिकडे त्याचा शारिरीक ऱ्हास होत आहे या लहान लेखात तजावरचे भागातील मराठे आपल्या शौर्याबद्दल पूर्वी किती प्रसिद्ध होते हें दाखविले आहे. सध्या लष्कर, आरमार व वैमानिक दल यामध्ये हिंदी लोकास प्रवेश मिळत आहे त्याचा फायदा आपल्या समाजातील तरुणानी अवश्य घेतला पाहिजे 'मराठा एज्युकेशन फड' आपल्याकडील तरुण विद्यार्थ्यास डेहराडूनहून, पुणे व इतर ठिकाणच्या लष्करी शाळेत शिकण्याकरिता पाठविण्यासाठीं शक्य ती मदत करण्यास सदैव तत्पर राहील.—सपादक ]

तजावरच्या मराठी सैन्याचें पायदळ व रिसाला हे दोन मुख्य भाग होत. हत्ती व रथ याचा उपयोग त्यावेळीं नव्हताच तोफखाना मात्र तजावरच्या राजापाशीं थोड्याबहुत प्रमाणात होता व जो होता तो युरोपियन वसाहतींनीं तोफा व त्या चालविण्यास गोलदाज दिले त्यावर अवलबून होता जरी तोफखाना जवळजवळ निरुपयोगी होता तरी तोड्याच्या बदुका व रायफली वापरण्यात तजावरचे शिपाई फार तरबेज होते लढाईतील आणीबाणीच्या वेळीं या बदुकाच्या माऱ्यानें आधीच जेरीस आलेला शत्रू रिसाल्याच्या हल्याने नामोहरम होऊन जाई. महमदअली व इग्रज हे दोघेही तजावरच्या रिसाल्यावर अवलबून होते व तो नसला तर निव्वळ स्वसरक्षणाची लढाई करीत त्याचा ( तजावर रिसाल्यातलि रिसालदाराचा ) हात शौर्याच्या बाबतींत मराठ्याखेरीज कोणी धरणार नाहींत असे त्यावेळच्या मद्रास सरकारचेंहि मत होतें. मेजर लॉरेन्सने १७५३ त म्हटल आहे कीं, तजावरी लोकासारखे उत्तम घोडेस्वार सर्व हिंदुस्थानात नाहींत.

सैन्यातील जागा निव्वळ तजावरच्या मराठा राज्यकर्त्यांच्या जातभाईबांधवानाच मिळत असे नाहीं. अनुभव व सामर्थ्य पाहून व जातभेद न पाहता जागा दिल्या जात. १७५८ त चोक्कालिंगमला सेनापतीचे काम मिळाले होते तसे तें तामिल लोकानाही देत. सैन्याचा पगार अशत: पैशाचे रूपाने व अशतः जमीनधाऱ्याच्या नेमणुकीच्या रूपानें मिळे. तुळाजीरावाचे वेळीं ९ महिन्याचे पगारावर फौज १२ महिने काम करी नऊ महिन्याचाही पगार थकून शिपाई सेनापतीच्या घरापुढे किंवा राजवाड्यापुढें धरण धरून बसले आहेत असेंही तजावरच्या मराठी राज्याचें वेळीं बरेच वेळा घडले आहे बदुकीची दारू व इतर दारूगोळा याचा वापर हिंदी सैन्यात सुरू होण्यास फार वेळ लागला. तलवारी, खजीर, सुरे, भाले, व धनुष्यबाण हींच लढाईचीं त्यावेळीं मुख्य आयुधे होती तलवारी सरळ, वाकड्या किंवा दुधारी असत. काहीं

तलवारीवर उत्तम नक्षीकाम असून मुठीवर सोन्याचे बारीक काम केलेले असे. फिरगी लोक लाब दुधारी व चागल्या पोलादाच्या तलवारी वापरीत.

काहीं रुद तलवारीच्या पातीवर मराठी किंवा कानडी अक्षरे खोदलेली असत. व काहींना इतके उत्तम पाणी दिलेले असे कीं त्या वाकून लटलटा कापत असत खजीर व कट्यारी निरानिराळ्या आकाराच्या असून काहींना दोन किंवा तीन पातीही असत काहींच्य मुठींत पिस्तुलें तर काहींच्या मुठींत स्प्रिंगाची पाती असत. हाडाचे किंवा हस्तिदती मुठीचे लाबा पातळ पातीचे सुरेही सैनिक वापरत असत.

धनुष्यबाणाचेही प्रकार पुष्कळ होते. बाण वेळूचे असुन त्यास हाड हस्तीदत किंवा पोलादाची अणकुचीदार टोके असत. काहीं बाण काटरी असत व काहीं सरळ असत. बाणाच्या दोन्ही टोकापासून ५-६ इच अतरापर्यंत रग देत असत.

---



बदामी कृष्ण राव
असिस्टंट कमिशनर, बगलोर



पी. व्ही. कृष्णस्वामी नाइग
ललितकलेचे पेट्रन, तजावर



जी. कृष्ण राव एम्. एल. ए.
मैलेरिपलयमचे जमीनदार
डायरेक्टर म. ए. फंड.



आर. एच. रंग राव एम .ए.
पेट्रन, म. ए. फंड.

॥ श्रीरामसमर्थ ॥

# कीर्तन

[ ले नरसिंहपुरकर टी बी रामचंद्र गोस्वामी, बी. ए तंजावर ]

श्रीईशकृपेनें या वर्षी आमच्या मराठा एज्युकेशन फंड, मद्रास, या संस्थेला पचवीस वर्षे पुरी होऊन सव्विसाव्या वर्षाचा वाढदिवस साजरा करण्यात येत आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे मद्रास इलाख्यात महाराष्ट्रीय लोकांच्या उन्नतीसाठीं प्रयत्नपूर्वक उपस्थित केलेल्या अनेक सभा वगैरेपैकीं हा फंड चिरस्थायी होऊन यशस्वी झाला आहे याचे श्रेय स्वार्थत्यागपूर्वक चिकाटीनें पुढाकार घेतलेल्या आणि मदत करीत येणाऱ्या महाराष्ट्रीय प्रेमळ बंधुभगिनींचेच होय उत्तरोत्तर या संस्थेस सर्व लोकांची पूर्ण सहानुभूति आणि मदत मिळून शतसांवत्सरिक समारंभ-कार्य अव्याहत चालून सर्व बाजूनीं यश मिळावें असे श्रीईशाकडे प्रार्थितों

या मोठ्या समारंभाच्या प्रसंगी प्रसिद्ध होणाऱ्या लेखमालिकेंत कीर्तन या विषयावर एक लेख मी पाठवावा, अशी सूचना माझे नातलग आणि फंडाच्या मुख्य पुढाऱ्यांपैकीं एक, श्री रामचंद्रराव यांजकडून पत्रद्वारा झाली माझ्या डोळ्यांच्या श्रमामुळें मात्र नव्हे, तर माहिती वगैरे मिळणेंहि अशक्यच वाटल्यामुळे सुलभ नकाराचा जबाब पाठविण्याचें मनांत आलें होतें पण श्रीसमर्थांची ओवी--“ आपल्या शक्त्यनुसार ॥ भावें पुजावा परमेश्वर ॥ परंतु पुजूं नये हा विचार ॥ कोठेंचि नाहीं ॥ दासबोध १ ६-१ ३ ॥ स्मरणास आल्यानें माझ्या मनांत झालेला भाव चुकीचा आहे का बरोबर आहे हें पक्कें समजून घेण्याचा मार्ग हाच कीं, आपल्या मनाचे विचार मोठ्या जाणत्यापुढें ठेऊन विनंती करणें, अशा नम्र भावनेनें पुढें पाऊल टाकतो

“ कीर्तन ” हा विषय फार महत्त्वाचा आहे, पण याच्याबद्दल पाहिजे ती माहिती देणारे लेख किंवा वाडवडील माणसे हीं दुर्मिळ आहेत या दक्षिण प्रांतांत म्हणजे मद्रास इलाख्यांत कीर्तनपध्दति उत्तरेकडूनच आली आहे असें इकडील द्राविडी लोक प्रांजलपणे कबूल करतात उत्तरेकडेसुध्दां कीर्तनपध्दतीचें सांप्रतचें स्वरूप एकाएकीं स्वर्गातून एकदम उडी मारून आलेलें नसून कालदेशविद्यमानाप्रमाणें वेदकालीन स्वरबद्धमन्त्रात्मक ईश्वरस्वरूप वर्णन, स्तवन, व प्रार्थना इत्यादि दशेतून, नंतर श्रुत्यर्थ प्रतिपादक पुराणादि ग्रंथांतून तेंच कार्य पुढें चालून मग इतिहासकाव्याची भर पडून रामायणांत कुश-लवांनी रामयश ‘तन्त्रीलयसमन्वितौ’ म्हणजे स्वरबद्ध व तालबद्ध गायन केलें आहे तस्मात् संस्कृत ग्रंथावरून कीर्तनाचा एक

भाग म्हणजे संगीतानें भगवद्गुणवर्णनात आपल्या चित्ताकर्षक स्वभावानें मुख्यत्व कसें मिळविलें हें समजतें. कीर्तनकाराच्या स्थानाला श्रीनारदाची गादी असा मान आहे

तदनतर महाराष्ट्रभाषेचा विकास जोराने होत आल्यावर आमच्या साधुसत कवींनीं सस्कृत भाषेंतील रत्नभाडार मराठी भाषेनें खुले केल्यावर तर कीर्तनाचें स्वरूप फारच सुन्दर दिसू लागलें त्याला अनुगुण परमललित अशा वज्रभाषेचे म्हणजे हिंदीचें पाठबळ मिळाल्यावर कीर्तनाचा भाव तीनपटीनें म्हणजे साहित्य–सगीत कला यानीं सुशोभित होऊन कीर्तन आबालवृद्धाना अत्यत प्रिय व बोधप्रद होऊन राहिले आहे.

नवविधा भक्तीमध्यें कीर्तनाला दुसरें स्थान दिलें आहे. जसें:—

‘ श्रवणं कीर्तन विष्णोः स्मरणं पादसेवनम् ॥
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ ”

परतु श्रवण म्हणजे ऐकणें व ‘कीर्तन’ म्हणजे उच्चार करणें अथवा वर्णन करणें असें आहे. एकानीं म्हणजे गुरू किंवा जाणत्यानीं सागावें आणि ते दुसऱ्यानीं ऐकावें. जे ऐकलें तें इतरानाही सागून कळवावे असा भाव आहे समीपकाल पावेतों कीर्तनाचा विषय अध्यात्म आणि उदात्त विचार व गुण, श्रोतृजनाचे मनावर ठसविणारी भगवताची किंवा तद्भक्ताची चरित्रें होतात अनेक कारणानीं अर्वाचीन प्रसिद्ध स्त्रीपुरुषाचीं चरित्रें मुद्दाम घेतली नाहींत असें वाटतें कारण मागें राजकारणात परस्पर शत्रुभावानें वागलेले स्वदेशीय किंवा परदेशीय लोक परिस्थितींत फेरफार पडल्यावर आपापल्या जातीचा, धर्माचा किंवा व्यवहाराचा हा भेद विसरून एकदिलानें वागण्याच्या अत्यंत जरूरीच्या वेळीं तर हा मार्ग किंवा सम्प्रदाय अत्यंत घातुक होतो. लहान व तरुण किंवा अशिक्षित मडळींच्या मनावर तर फारच दुष्परिणाम होतो म्हणून अशी चरित्रे हरिहराच्या चरित्रवर्णनामध्यें दुष्यताच्या गोष्टीदाखल कार्यापुरतें सागणेंच हितावह म्हणून कुलपरपरागत साप्रदायिकानीं हा मध्यम रस्ता स्वीकारला.

‘ कीर्तन ’ या शब्दाचा अर्थ साधारणत ‘ सागणें ’ किंवा ‘ वर्णन करणें ’ असा आहे माणसाच्या मनावर भाव होण्याजोगे सागण्यास बोध अशी संज्ञा आहे. हा बोध अनेक प्रकारांनीं होऊ शकतो ग्रन्थवाचन, प्रवचनादि श्रवण, प्रकृति निरीक्षण, अथवा सत्संगति वगैरे साधनानीं मनुष्याला ज्ञान होऊन बद्ध, मुमुक्षुसाधक दशा ओलाडून सिद्धावस्था मिळते. कीर्तनाची खुबी अशी आहे कीं, कीर्तनकाराच्या सामर्थ्यानें या सर्व साधनाचा लाभ श्रेष्ठाना नियमित जागीं व वेळीं एकदम होतो. पद्धतीप्रमाणें प्रथमत· मगलाचरण म्हणजे इष्टदेवतेचें नमन, निरूपण म्हणजे पूर्वपदातील तत्त्व किंवाधर्म साधकबाधक प्रमाणासह थोडक्यात चटकदार प्रतिपादन, त्यानतर दृष्टान्तासाठीं हरिहराचे अवतारचरित्रवर्णन, मध्यें समयोचित भजन किंवा करतालिकेसह नामघोष, उपसहार, मगलारती आणि प्रसादवाटणी. अशी रूढी आहे.

ब्रम्हीभूत श्रीरामचंद्रबाबा मोरगावकर यांच्या इ. स. १८६४ च्या सुमारास तंजावरीं झालेल्या आगमनानें इकडील कीर्तनपद्धतींत पुष्कळ सुधारणा होऊन ती द्राविडी वगैरे लोकांसही पसत पडून कै. श्रीकृष्णभागवतानीं तामील भाषेंत कीर्तन करण्यास सुरुवात केली श्रीत्यागय्या स्वामींची तेलंगी पदें ज्याला इकडे 'कीर्तनै' म्हणतात), तामील भाषेची पदें वगैरेही म्हणून मराठीची साकी, दिंडी, पदे वगैरेवर अवलंबून इकडे उत्तम कीर्तन करतात. अशा कीर्तनकारापैकीं श्रीचिदंबर भागवत, श्री वैद्यनाथ भागवत, श्री अण्णास्वामी भागवत इत्यादि आहेत.

श्री मोरगांवकराच्या विजयापूर्वी इकडील मठातील स्वामी अथवा महंत भक्ती-पुरस्सर मराठी कवितेचा प्राय भरणा घेऊन कर्नाटक रागरागिण्या म्हणून कीर्तन करीत होते. हिंदुस्थानी चिजाहि म्हणत. सस्कृताचा जोर तितका नव्हता. बाजा किंवा पेटी नसून गोड एक किंवा जोडी तबोरे, मृदग ताल, झाज, सोरबत, फिडल्, सारंगी इत्यादि वाद्याची उपयुक्तता यथासौकर्य होती. काहीं द्राविडी कीर्तनपर अद्यापहि तबोराच वापरतात, बाजाचें नाव नाहीं.

या प्रसगीं श्रीमोरगावकर महाराजाबद्दल व त्यांच्या कीर्तनाबद्दल दोन शब्द सागणें गैर होणार नाहीं श्रीरामचंद्र महाराज याचा जन्म मोरगांवास झाला. लहा–नपणापासूनच त्याना विद्येचा व कीर्तनाचा छद ज्या वेळीं ज्या गावीं जे सस्कृत किंवा मराठी साहित्य किंवा कविता मिळेल ती सबध पाठ करावी, गाणेंही तसेच. आपल्या स्वसामर्थ्यानें आणि समकालीन कीर्तनकाराच्या कथेच्या श्रवण–मनन–अभ्यासानें हळु-हळु ते उत्तमोत्तम कीर्तनकार बनले श्रीगजाननाची उपासना करून ईश्वरप्रसादास पात्र झालें. तेव्हा ग्वाल्हेरचे शिंदेसरकार यानीं त्याना आपल्या राज्यात लष्करास मठ बाधून देऊन वर्षासन करून दिले तें अद्यापही त्याच्या पुत्रपौत्रापर्यंत चालू आहे त्याच्या तिघा चिरंजिवापैकी श्रीविष्णुबुवा मोरगावकर हे ततुल्य विख्यात कीर्तनकार होऊन श्रीमोरगावकरांच्या तंजावरमठात कायमचे राहून इकडचेच झाले असें म्हणता येईल श्रीमहाराजाचें नातू श्रीबाळुभय्या व राजभय्या मोरगावकर हेही उत्तम कीर्त-नकार व गवई झाले. साप्रत श्रीमोरगावकराचें पणतू श्रीयशवत राजाभय्या मोरगावकर हे दहाबारा वर्षे ग्वाल्हेरात आहेत.

वरील माहितीनें विषयातर झाले असें वाटेल पण तिचा कीर्तनपद्धतिशीं निकट सबध असल्यानें ती देणें जरूर होती आमचे तीर्थरूप श्रीभाऊस्वामी गोस्वामी श्री गोविंदबाळस्वामींच्या मठाचे अधिपती, हे श्रीमोरगावकर महाराजाचें मुख्य विद्यार्थी व शिष्य होते. श्रीमहाराजांनीं आपली कीर्तनकला परम प्रीतीनें व पूर्ण-पणें आपल्या शिष्यास दिली. यायोगें श्रीभाऊस्वामी यास जुन्या पद्धतीचे शिक्षण व प्राविण्य न मिळता बोली उत्तर पद्धतीची गाणें पूर्णपणें ग्वाल्हेरचे शुद्ध हिंदुस्थानी, मराठीबरोबर सस्कृत व हिंदी भाषेची गद्यपद्यात्मक कवितेच्या आधारानें उत्तम विवरण, बारीकसारीक काहाण्या, सारखा गोड आवाज इत्यादि मिळून या प्रांतातील

कीर्तनरीतीत एक क्रांतीच झाली असें म्हणता येईल इतर मठपती म्हणजे श्रीभिमराजस्वामीमठाचे श्रीरघुनाथ गोस्वामी, श्रीझोळीरामबावा मठाचे श्रीदेवगोस्वामी, श्रीआण्णाजीमठाचे श्रीत्यागराजस्वामी, श्रीसेतुबावा मठाचे श्रीसेतुरामस्वामी व दत्तसांप्रदायी श्रीलघुश्यामगोस्वामी हे सर्व जुन्या पध्दतीनेंच कीर्तन करितात. त्यांनीं उत्तरेकडच्या काहीं चालीं व पदें मात्र घेतली आहेत.

तंजावरीं श्रीमहाराजांना उदयकाल सर्वतोपरी ' न भूतो न भविष्यति ' असा झाला शेवटचे राजे श्रीशिवाजी महाराज हे १८५५ सालीं कैलासवासी झाले तरी त्यांच्या राण्यांपैकीं पधरासोळा राण्या हयात होत्या मगळवास व इतर नातलगांची श्रीमंत घराणीं पुष्कळच होती. षट्शास्त्रपण्डित विद्वान लोक, तसेंच कर्नाटकगायन वादनकलाप्रवीण लोकही बरेच होते. ते सर्व श्रीमहाराजाच्या कीर्तनास येत, व साहाय्य करीत. त्या कीर्तनाचा रंग कसा होता हें प्रत्यक्ष ज्यानीं पाहिले असे जे लोक अजून हयात आहेत ते सांगतात अतएव उत्तरदक्षिण कलाकौशल्यांत दळणवळण कितपत होते हें समजून येईल मृदंगविद्वानांपैकीं विख्यात कीर्तीचे कर्नाटक व हिंदुस्थानी संगीतास अनुसरून वाजविणारे श्री नारायणस्वामी अप्पा, श्री रामदासस्वामी, श्री सेतुरामराव इत्यादि, कर्नाटक गवयांपैकीं श्री महावैद्यनाथ अय्यर, पट्टणं सुब्रम्हण्य अय्यर तोडी सुन्दरराव इत्यादि, वाद्ये वाजविण्यात वीणा वैद्यनाथ अय्यर फ्ल्यूटशरभशास्त्री, फिडल गोविंदस्वामी पिल्ले, गोटवाद्यम् सखारामराव इत्यादि संगीतज्ञ कीर्तनास मदत करीत असत हिंदुस्थानी गाण्यांत गोंडठुमरी वगैरे म्हणणारें श्री. भय्याजी पुणताबेकर व ख्यालध्रुवपद वगैरेंत प्रविण असे श्रीसखारामबाबा यांची नावे प्रसिद्ध आहेत

कीर्तनास लागणारी चरित्रें तयार करून श्रीमहाराजास देणाऱ्या श्रीरंगात्मजदादा व तंजावरांतील वे श्रीनारायणाचार्य, वे. श्रीरघुनाथभट्ट इत्यादि विद्वज्जनांच्या कविता श्रीमहाराजांच्या संग्रहांत पुष्कळच आहे सांप्रत इतर धर्माच्या उपदेशकांनींही कीर्तनद्वारा बोध करण्यास सुरुवात केली आहे

या सत्पुरुषाच्या कीर्तनाचें वर्णन दुसऱ्या एका कारणानेंही जरूरीचें वाटते. कीर्तनपद्धतीबद्दल श्रीसमर्थांच्या श्रीदासबोध ग्रंथांत जे स्वरूप व नियम रेखाटले आहेत तसे इतरत्र कोठेंही आहेत असें वाटत नाहीं हे सर्व साहित्य श्रीमोरगावकराच्या कीर्तनांत सिद्ध होते गुरू अथवा उपदेशक वक्ता कसा असावा हे दशक ५ समास १–२, द १४ स ५ इत्यादि, अधिकारी, शिष्य, श्रोते, सभा, द. ५ स ३, द १ स. ५–८, द. २ स १–१०, द ३ स १–१०, द १८ स, ९–१० इ, विषय द ५ स. ४–६ इ., श्रवण द ४ स. १, द. १७ स. ३, द ७ स ८–९ इ, कीर्तन द ४ स २, द. १४ स ३–४, इ., इत्यादि कीर्तनाचे भाग व्यवस्थेशीर व विस्तरशः सांगितले आहेत. लेख वाढेल म्हणून नुसतें दिग्दर्शन केलें आहे.

कथेकरी लोक दोन किंवा तीन प्रकारचे असतात एक अत्यंत निस्पृही म्हणजे कीर्तन पैशासाठीं करीत नाहींत. निष्कामबुद्धीनें आपलें कर्तव्य म्हणून जनास ज्ञानोपदेश भक्तिपुरस्सर करणारे हे उच्च दर्जाचे झाले कीर्तन झाल्यावर जें कांहीं द्रव्य मिळेल त्यावरून ‘ यदृच्छालाभसतुष्ट ’ असणारे हे मध्यम दर्जाचे होत. कीर्तनापूर्वीच रक्कम ठरवून ‘मोलें कीर्तन’ करणारे अधम वर्गांत मोडतात. आधुनिक परिस्थितीकडे पहावें तर कीर्तन भगवद्भक्ताच्या अतिम हेतू किवा प्रयोजनापासून घसरत जाऊन चैनी मौज मारणाऱ्या तमाशा खेळासारखे वेळ गमावण्याचें साधन होत आहे. पूज्य भाव व परमार्थश्रद्धा, नाहीं इतकेंच नव्हे तर कथेमध्यें विडे बिडी वगैरेंचा थाटसुध्दा आढळतो. महाराष्ट्रकथेंत हा चमत्कार सुदैवाने अजून फार दिसून येत नाहीं.

श्रीमोरगावकराच्या नंतर त्यांच्या वशपरपरेचे समकालीन असे बरेच विख्यात कीर्तनकार व गवई इकडे आले व त्या सर्वांना आदरपूर्वक आश्रय देऊन हस्तें पर हस्तें सत्कार व बहुमान करण्यात श्रेष्ठ दर्जाचे प्रभू श्रीकृष्णस्वामी नाईक हे होते. श्रीकाशिनाथबावा मसूरकर, श्रीरामचद्रबावा चादूरकर, श्रीनानाबावा सुपेकर इत्यादि कीर्तनकार, रहिमतखानासारखे गवई, ढोलकवाद्यप्रवीण न्हन्नुमियांसाहेब हे सर्व नाईकांच्या वेळचे. नतर श्री. दुर्गाबाई बापट, श्री. विष्णु दिगबर पलुसकर वगैरेनीं तजावरास येऊन कीर्तन व भजन केलें. हें सर्व सागण्याचें कारण हेंच कीं, तजावरच्या स्वभावत: रसिकजनाना महाराष्ट्रभाषा, सगीत व वाद्यकलाचा लाभ होऊन त्याचा महाराष्ट्रपणा आजमित्तीपावेतों कायम राखण्यास व इतरत्र प्रसार करण्यास या कीर्तनाच्या लाटा फारच उपयोगी पडल्या आहेत. या सर्व प्रसंगीं द्राविडी कीर्तनकार व विद्वज्जन येऊन भाग घेत असल्यानें त्यानाही बहुमोल फायदा झाला आहे कीर्तनाचा फायदा व प्रयोजन श्रीसमर्थ वाणीनेंच सागून हा लेख पुरा करतो.

“ कीर्तने महादोष जाती । कीर्तने होय उत्तम गती ॥
कीर्तने भगवत्प्राप्ती । यदर्थी सशय नाहीं ॥ १ ॥
कीर्तने वाचा पवित्र । कीर्तने होय सत्पात्र ॥
कीर्तने प्राणिमात्र । सुशील होती ॥ २ ॥
कीर्तने अव्यग्रता घडे । कीर्तनें निश्चय सापडे ॥
कीर्तने सदेह उडे । श्रोत्या वक्त्याची ॥ ३ ॥
सदासर्वदा हरिकीर्तन । ब्रह्मसुत करी आपण ॥
तेणें नारद तोचि नारायण । बोली जेत आहे ॥ ४ ॥
म्हणोनी कीर्तनाचा अगाध महिमा । कीर्तने सतोषे परमात्मा
सकल तीर्थे आणि जगदात्मा । हरिकीर्तनीं वसे ॥

दासबोध—द. ४ स. २

# भारतवर्षांतील दाक्षिणात्य महाराष्ट्रीयांनीं केलेली मराठी सारस्वत सेवा

( लेखक—श्री० टी. बी. गोस्वामी नरसिंहपूरकर, बी. ए., तंजावर.)

मराठा एज्युकेशन फंडाच्या " रौप्यमहोत्सव " समारंभास प्रकट होणाऱ्या लेखमालिकेंत दुसरा एक लेख पाठविण्याची संधि मला मिळाली याबद्दल आनंद वाटतो. पण विषयाचे महत्व मनास आल्याबरोबर ते कांपते श्रीकालिदासकवीचे म्हणणें आहे कीं,

अपरितोषाद्विदुषा न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।।
बलवदपि शिक्षितानामात्मन्य प्रत्यय चेतः ।। १ ।।

मोठ्या गुरूपासून उत्तम प्रकारें शिकलेल्या समर्थ शिष्यालाही कृती करून दाखविणें व विद्वज्जनाच्या संतोषास पात्र होणें हें कांही सुलभ कार्य नव्हे, कारण कीं, मन समयांत फार दगा देणारें आहे. तेव्हां या 'लहान तोंडी मोठा घास' घेण्याचे कारण व त्याचा भाव श्रीमयूर पंताच्याच वाणीनें वाचकांपुढें ठेवतो—

प्रभुस्तुति न ठाउकी परि तिच्या महाकामुका ।
मला कृपण मारितो बहु सकाम हाका मुका ।।
म्हणा मनिं असे कसे प्रथम नीट ये लेकरा ।
हळुहळु पटुस्वये सुपथिं लावियेले करा ।। — केकावली.

या प्रकारें नम्रतेनें प्रार्थना करीत लिहिणेचें मी धाडस करितो. श्रीभगवतानीं आपल्या सर्व सृष्टीमध्यें पुष्कळ चमत्कार दाखविले आहेत. त्यातलाच हिंदुदेश हा एक आहे. या भारतमातेचें सौंदर्य महत्व श्रीबाणकवीसारख्यानींच वर्णावें. आमच्या मातृभूमीचें विराट स्वरूप पाहिलें असता सहज दिसून येते कीं, शिरोभागासारिखा ' अनंतरत्नप्रभाव ' हिमालय पर्वत, गंगा, यमुना, सिंधू अशा नद्या म्हणजे रक्तवाहक हृद्देशासमान उत्तर हिंदुस्थान, सर्व देहास अन्न म्हणजे महाराष्ट्र भाषा व धर्म पुरवून पोषण करणाऱ्या पोटासारखा मध्य हिंदुस्थान आणि पादस्थानी दक्षिण हिंदुस्थान असे चार भाग प्रकृतिसिद्ध आहेत. हिंदुस्थानच्या या सर्व भागामध्यें महाराष्ट्रियांची अभिव्याप्ती असून हिंदुस्थानच्या बाहेरही सर्वत्र आमचे स्वजन राहात आहेत. एवढ्या मोठ्या बृहन्महाराष्ट्रामधून आमच्या विषयाची भूमिका केवळ दक्षिणेपुरतीच रेखाटलेली आहे. तथापि हेंही कांहीं सामान्य विस्ताराचें नाहीं, अर्थात् मराठी सारस्वत तेवढेंमोठें व्यापक आहे.

प्रस्तुत लेखक मद्रास हायकोर्टांत तामील व मराठी या दोन भाषांचें भाषांतरकार होते. त्यावेळीं मद्रास इलाख्यांतील सर्व जिल्ह्यांतून भाषांतरासाठीं मोडी लिपींत लिहिलेल्या अनेक सनदा, कागदपत्र, रोखे, पैमाष, हिशेब वगैरे येत होतीं. त्या सर्वांत थक्क करण्यासारखे व ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचें एक वैशिष्ट्य घडलें तें प्रत्येक महाराष्ट्रियानें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. म्हणून तें सांगणें जरूर आहे. कारण यापासून महाराष्ट्रियांची सत्ता कुठपर्यंत गेली व त्याचा भगवा झेंडा किती उंच फडफडत होता तें सर्व कळून येईल.

हिंदुस्थानाच्या दक्षिण भागात तंजावरच्या दक्षिणेस मदुरा म्हणून एक पुराणेतिहासप्रसिद्ध क्षेत्र आहे. अद्यापिही कला, व्यापारधंदे वगैरेंने मोठ्या चळवळीचें हे नगर आहे. भारतीय शिल्पकलाकौशल्य दाखविणाऱ्या मोठमोठाल्या इमारती तेथे आहेत. त्यांत उत्तम असे जे श्रीमिनाक्षी सुंदरेश्वराचें भव्य देवालय आणि पांड्य राजांनीं बांधलेला मोठा वाडा प्रेक्षणीय आहे. या देवालयातर्फे मद्रास हायकोर्टात एक दस्तऐवज दाखल करण्यात आला. ( खटला नंबर वगैरे टिपलेला रोखा हरवला. १९१० च्या सुमारचा असावा. ) कॉपी स्टॅम्पावर पुरातन मोडी अस्सल तालिक, लिहिणार द्राविडी अय्यर, विषय एका माणसाने देवालयाच्या चर्मकर्त्यांस करारनामा लिहून देणेचा. भाषा कोणती ? तर तामील ! ! ! आता ही आमच्याकडे शुद्ध तामील भाषा आणि तिचे कट्टे अभिमानी यांच्या केन्द्रस्थानातली ही गोष्ट आहे. रामनाथपुरचे राजे श्रीविजय रघुनाथ सेतुपती पांडेन यांनीं शके १६३४ त केलेली दानशासनाची तालीक आहे. भाषा मराठी मिश्र तामीळ, लिपी मोडी, अस्सल लेखक कुपमुत्तु ( शुद्र ) इत्यादि प्रकारचा आहे. महाराष्ट्राचा दिग्विजय कसा होता ? महाराष्ट्रियांची वसाहत कितपत पसरली होती ? हे जेव्हा कळून येतें तेव्हा मात्र सारस्वताचा शिरकाव तेवढाच मोठा आहे म्हणून कळते एवढ्या मोठ्या रत्नाकराचे मैथन करून सारस्वत रत्ने बाहेर काढून त्याचा खुलासेवार इतिहास लिहिण्याचे काम एकट्या सामान्य मनुष्याच्या हातून तडीस जाणे शक्य नाहीं म्हणून आम्ही तंजावर राजवाड्यांतील सरस्वती महाल ग्रंथसंग्रहातून मिळणाऱ्या हकीकतीवरून यथाशक्ति संक्षेपाने लिहितो. शोध व चिकित्सा करण्याला पुष्कळच जागा आहे. भारतीय संस्कृती रक्षण करणाऱ्या मोठ्या राज्यापैकीं चोळवंशीयानंतर विजयानगरचे राज्य एक मुख्य होय त्यातील एका विख्यात राजाने आपला जावई चौवन म्हणजे शेवप्पन व आपला सभापंडित गोविंद दीक्षित या उभयतांना पाठवून तंजावरचें राज्य स्थापन केले. ( श्री कामकोटि पीठाधिपति जगद्गुरु हल्लींचे श्रीशंकराचार्य यांनीं भाषांतरासाठीं पाठविलेल्या खतात यांचे फार चांगले वर्णन केले. विषयांतराच्या भीतीनें, अन्वेषणकाराकडे सूचना देऊन राहाणे भाग पडते ) तदनन्तर उपरिनिर्दिष्ट मदुरेच्या पांड्य नाइकाचे तंजावरच्या नाइकाशीं युद्ध होऊन पांड्याचा विजय झाला. ( याची पुरी हकीकत वही नंबर २१२२ त दिली आहे ) यांच्याकडूनच मराठ्यांनीं तंजावर आपलेसे करून घेऊन राज्य स्थापिलें.

सरस्वती महालातील संग्रह वरील सर्व नाईक व मराठे राजे यानी आपापल्या काळीं केलेला आहे. नाईक राजांनीं केलेला संग्रह, ग्रंथाक्षरी ( एक प्रकारची पूर्ण वर्णांची तामील लिपी ) तेलगी व तामिल्ल लिपींत, संस्कृत, तेलगी व तामिल भाषेचा ताडपत्रावर आहे. मराठ्यांनीं त्यात मराठी ग्रंथांचीहि भर घातली. हे ग्रंथ ताडपत्रावर नसून कागदावर आहेत. त्यातहि काहींएक श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनीं आपल्या दासबोधात वर्णिलेल्या लेखनपद्धतीला हुबेहूब अनुसरलेले असून बहूमोल व प्रेक्षणीय आहेत. या ग्रंथाची यादी तीन भागात छापली आहे. सरस्वती महालातील दाक्षिणात्य लेखकांच्या प्रबंधात मुख्यत्वेकरून मोठा संग्रह म्हणजे वेदान्तग्रंथाचा आहे.

पूर्वकालीन ग्रंथकाराचें लेख, बखरी, लावण्यावाचून प्रायः अध्यात्मपरच आहेत, श्रीभगवानांनीं आपल्या गीतेत विभूतियोग सांगतांना " अध्यात्मविद्या विद्यानाम् " असें म्हणून सर्व विद्येमध्ये अध्यात्मविद्याच श्रेष्ठ मानली आहे. हे ध्येय पुढे ठेवून " मी कोण " " कोऽहम् " " कथमिदं जातम् " हें जग कसे झाले " को वा कर्तास्य विद्यते " ? याचा कर्ता कोण आहे, म्हणजे जीव, जगत् व ईश्वर यांचे स्वरूपज्ञानच खरे ज्ञान असें जाणून त्याच्या पाठीमागेच लागून अनुभव घेऊन तें इतराच्या उपयोगासाठीं म्हणून ग्रंथात नमूद करून ठेविले आहे. या ग्रंथसंग्रहाला अनुकरणात्मक पोपटाचे भाषण असे म्हणणारे आहेत. पण अंकगणिताकडे

पाहिले तर वरावर्दीचे उत्तर जर बरोबर बिनचुकीचे असेल तर तें एकच असणार. जसा प्रत्येक फुलाचा वास व सौन्दर्य विविध प्रकारचें असून बुद्धीच्या विकासाला कारणीभूत होते. तद्वतच साधुसताच्या अनुभव ग्रथाची नोंद ह्वे.

" आम्ही कोण आहो " हे आपण महाराष्ट्रीय विसरलो. म्हणूनच आपणा सर्वास ही अवनती प्राप्त झाली आहे. परमार्थ सपादण्यास वेदान्तज्ञान जरूर आहे. सरस्वती महालातील मराठी ग्रथ ( १ ) पुराणें ( २ ) रामायण ( ३ ) भारत ( ४ ) भागवत ( ५ ) कथाकल्पतरू हे सर्व धार्मिक या मथळ्यात येतात. मानवी जन्माचे वैशिष्ठ्य आत्मविचार व आत्मज्ञान सपादन यात आहे हें मिळण्यास स्वधर्माचा पाया लागतो, म्हणून तो सर्व दर्जाच्या लोकाना अधिकाराप्रमाणें घेऊन साध्य करून घेण्याचा मार्ग दाखविणारे रामायणासारखे ग्रथ लिहिले गेले. यामध्यें प्रपच सुखाने कसा चालवावा व भक्तीच्या अवलबनाने परमार्थ मार्ग कसा सुलभ आहे हे दाखविले आहे.

वरील विभाग पौराणिक इतिहासाचा असून नतरचा म्हणजे महालाच्या यादींत वर्ग सातवा म्हणून आहे. तो शुद्ध ऐतिहासिक किंवा बखरींचा आहे हिंदुस्थानात ऐतिहासिक ग्रथाचा अभाव म्हणून पाश्चात्य लोक एक टोला मारतात, पण त्याचें लक्ष आमच्या रामायण–भारतादि ग्रथाकडे पूर्णसे गेलेले दिसत नाहीं ज्या इतिहासाबद्दल एवढा बोभाटा करितात व सर्व इतिहासग्रथात होणाऱ्या चर्वितचर्वणाचे फळ म्हणजे राजशास्त्र ( Politics or Political Science ) याची मूलतत्वे पूर्वपक्ष खंडून सिद्धाताने यात माडली आहेत म्हणूनच कीं काय आमच्या ग्रथकारानीं तिकडे थोडे दुर्लक्ष केले असेल.

पुढे जे विभाग वर्ग (८) काव्य (९) नाटक (१०) काहण्या व कथा व (११) स्तोत्रें यात दाक्षिणात्य कार्य फार मोठे नाहीं तरी नमुन्यादाखल काहीं दाखविता येईल. बाकीचे जे वर्ग (१२) कोश (१३) वैद्यक (१४) कामशास्त्र व (१७) प्रकीर्ण याबद्दल माहिती ग्रथकाराच्या माहितीबरोबर दिली आहे. वर्ग (१५) सगीत व (१६) धार्मिक या विषयावरचे इकडचे मराठी ग्रथ मिळाले नाहींत.

हा सग्रह बहुतकरून पद्यात्मक म्हणज ओवीबद्ध ग्रथ यांचा मोठा भरणा, नतर श्लोक, पदे व अभग इत्यादिकाचा भरणा, गद्यात्मक फारच थोडा. कवितेच्या भाषेत मायलेकी ज्या सस्कृत व मराठी याचेच साम्राज्य, सुनेचा म्हणजे अन्य भाषेचा कारभार नाहीं. कविजन सस्कृतात व्युत्पन्न अथवा सुशिक्षित असल्याने वाणी सरळ पदान्वयार्थालकाराने नियमित आहे उतारे देण्यानें वाचकास फार सतोष होईल, पण शक्तीने बसून काम करणे शक्य नाहीं. बखरींची भाषा जुनी पूर्वकाळाची आहे. काव्याची भाषा रामदासकालीन शुद्ध मराठी आहे. प्राचीन सग्रह बहुधा हस्त-लिखित पोथ्याचा व बह्याचा तर नूतन प्रायः छापील पुस्तकाचा आहे.

वरील प्रमाणे महालातील दाक्षिणात्य ग्रथाचे रूप, विषयक्रमाने थोडक्यात सागितले. आता ग्रंथकर्त्याकडे वळू व ओघानें ग्रथाचीही माहिती मिळेलच.

वरील सर्व विषयावर ग्रथ आहेत पण अनेक जागीं कवीचे नाव इत्यादि काहींच दिले नाहीं म्हणून कवी ' अनाम ' असें यादींत दाखविलें आहे. असे ग्रथ पुष्कळ आहेत. लहानमोठ्यापैकीं विजय भगवद्गीताटीका, वाक्यसुधा, सतसिद्ध, ज्ञानदेवी पदव्याख्या प्रकाशिका, अनुभवामृतटीका इत्यादि वेदान्त; व्रत वगैरे वर्णन, पुराण, भावार्थरामायणाची अनुक्रमणिका इत्याहि रामायण, धर्माधर्म इ० भारत, शिवाजी महाराजाचे पितर, इतिहास, कादबरी कथा इत्यादि; आदित्य हृदय इ० स्तोत्रे, हृदयदीपक, निघटु, अश्वगज, वैद्य इ० वैद्यक, मदन सजीवन इ० कामशास्त्र अश्वासबद्दल इ० प्रकीर्ण अशा बऱ्याच ग्रथाच्या लेखकाची नावे उपलब्ध नाहींत.



**टी. बी. रामचंद्र राव बी. ए.,**
भाऊस्वामी मठ, तजावर



**टी. आर. ज्ञानसागर**
फ्लूट वाजविणारे, मद्रास.



डॉ. के. वासुदेव राव एम्. डी , एम्. आर. सी. पी.,
टी. डी डी., डॉयरेक्टर, क्षयरोग इस्पिताळ, मद्रास



रावसाहेब राजा चरित्र विशारद
सी. हयवदन राव
वृत्तपत्रव्यवसायी, म्हैसूर

आता कवींची नावे माहीत आहेत अशा ग्रथाचा विचार करू. महालाची यादी भाग १ व २ यातील दक्षिणोत्तर ग्रथकारांची सख्या पर्याय नावे वजा केली तर २५० तरी भरेल. यातून निश्चयेकरून उत्तरेकडचे काव्यकर्ते गाळले तर, सदिग्ध व निःसदिग्ध असे दक्षिणात्य कवी कमीत कमी पाऊणशेवर असतील व याचे ग्रथ सुमारे ३०० वर असतील, हे सर्वही सपूर्ण लिहिणेस मोठे एक पुस्तक लागेल. याकरिता साप्रत यातही निवडानिवड करून वाचकाच्या श्रमाकडे लक्ष देऊन, मुख्य वाटणारे तेच घेऊन माहिती दिली आहे.

पहिल्या प्रथम श्रीभीमराजस्वामी, मेरुस्वामी, माधवस्वामी, इत्यादिकाबद्दल सागणेच्या पूर्वी थोडा इतिहासाचा दाखला देणे आवश्य आहे. श्रीसमर्थ रामदासस्वामी आपल्या पृथ्वीप्रदक्षिणेत अनेक तीर्थाचे दर्शन घेत देशाची व लोकाची दुर्दशा निवारण करण्यासाठी श्रीकडे प्रार्थना करीत असताना श्री छत्रपती महाराज तोरणादि किल्ले मुसलमानापासून हस्तगत करून घेत होते. उत्तरेकडे असे असता दक्षिणेत श्रछित्रपतींचे बधू व्यकोजीराजे यानी दक्षिणप्रांत काबीज करून तंजावरात महाराष्ट्र राज्य स्थापन केले. ही गोष्ट इ. सन १६७६ ( शके १५९८ ) च्या सुमारास घडली, तेव्हा दक्षिणप्राती आमच्या बऱ्याच लोकानी येऊन वसाहत केली तत्पूर्वीही यावनी राज्यात सुभेदारी वगैरे मिळविलेले मराठे पुष्कळच होते आसेतुहिमाचल तीर्थयात्रेस निघालेल्या मडळीतील काही लोक परमपवित्र कावेरी तीरावर विद्यमान देवालयादिकाच्या योगाने रमणीय वाटणाऱ्या जागी निवातपणे राहून, जन्म सार्थक करून घेण्याच्या उद्देशाने राहिले होते याविना आणखी एक प्रकार आहे. तंजावरप्राती श्रीसमर्थ आले तेव्हा श्रीव्यकोजी महाराजानी प्रार्थना केली "श्रीगुरूनी आपल्याजवळच राहावे" श्रीसमर्थानी राजाला सागितले की "ते साध्य नसल्याने आपल्या समान मान्य अशा शिष्यास तुमच्याजवळ राहून श्रीरामोपासना चालविण्यास पाठवून देतो." त्याप्रमाणे श्रीभिकाजीबावा शहापुरकर, मौनिबावा व राघवदास असे तीन शिष्य त्यानी पाठवून दिले श्रीभिकाजीबावाचा मठ तजावरास आहे. श्रीमौनिबावा शिष्य परपरेचा श्रीमेरुस्वामींचा मठ मन्यारगुडीत व श्रीराघवदासाचा मठ तजावरच्या पूर्वेस मारगुडीजवळ कोन्नूर ग्रामी आहे. दाक्षिणात्य मराठी सारस्वताच्या सेवेत वरील सत्पुरुषाचा खुद्द किंवा तच्छिष्यपरंपराचा कार्यभाग फार प्रचड आहे म्हणून हे वर्णन केले. आता त्याच्याबद्दलची विशेष माहिती सागू

(१) **श्रीभीमराजस्वामी**—याचा जन्म सुमारे शके १५६४. समाधी शके १६१३. वर सागितल्याप्रमाणे समर्थाच्या आज्ञेवरून शहापुरकर तजावरास शके १५९९ त आले व मठ करून भक्तिपुरस्सर श्रीरामसेवा, पूजा. भजन, कीर्तन, भिक्षा वगैरे गृहस्थधर्मामध्ये राहून त्यानी चालविली. श्रीसमर्थानी दिलेली मारुतीची मूर्ति श्रीरामचक्र, झोळी, काठी इत्यादि या मठात अद्यापि आहेत. या मठाच्या शाखा तीन–(१) श्रीगोविंद बाळस्वामी मठ अथवा भाऊस्वामी मठ (२) श्रीझोळीरामबावा मठ अथवा देवगोस्वामी मठ (३) श्रीअण्णाजीबावा अथवा आत्माराम गोस्वामी मठ. श्रीभिकाजीमहाराजाची समाधि करुतटागुडीत जुन्या मोठ्या रस्यावर आहे. मठात श्रीसमर्थांची एक तसबीर आहे.

या सत्पुरुषानें केलेला मुख्य व मोठा ग्रथ म्हणजे श्रीसमर्थ चरित्र, पदें वगैरे याच्या ह्यातींत तजावरच्या गादीचे श्रीवेकोजी, शहाजी, शरफोजी, तुकाजी व बाबासाहेब असे पांच राजे झाल्यावर श्रीप्रतापसिंह राज्यारूढ झाले. त्यानी श्रीभिकाजीमहाराजांस वाड्यांत येऊन 'अनुग्रह द्यावा' असे सागून पाठविले, पण ते अति निस्पृह, जाणार कुठले ! हीच गोष्ट श्री सेतुबावास्वामी याच्या मठाचे मूल कारण.

(२) **श्रीमेरुस्वामी**—श्रीभिकाजीबावा शहापूरकरांबरोबर आलेले श्रीमौनीबावा यांची कविता जरी उपलब्ध नाहीं तरी त्याचे शिष्य श्रीअनंतमौनी यांची पदें वगैरे पुष्कळ आहेत.

या अनंत मौनींचे शिष्य मेरुस्वामी. त्यांचा मन्यारगुडींत मठ आहे. शके १६९० च्या सुमाराचा हा मठ असू शकेल. यांनीं केलेले मोठे ग्रंथ वेदांतविषयाचे (१) भीमोपदेश (२) राम सोहळा (३) अवधूतगीता इत्यादि; अनंत वाल्मीकि रामायण (हरिहर नाटक), व स्तोत्रें आहेत. यांत समर्थाष्टक, रामदास-स्तवन मुख्य.

(३) **श्रीमाधवस्वामी**:—पूर्वोक्तरीतीनें श्री शहापूरकरांबरोबर, आलेले दुसरे रामदासी जे राघवदास त्याचे शिष्य श्रीमाधवस्वामी— शके १६–१७ व्या शतकाच्या दरम्यान होते असें ग्रंथांत दिलेल्या माहितीवरून सिद्ध होते. कुंभकोणासमीप श्वेतारण्य क्षेत्र जे गौरीमायोर (सांप्रतचे मायवरम) या जवळ विद्यमान कावेरी तीरीं त्रिवदूर ग्रामांत राहणारे रामोपासक अद्यापि विद्यमान मठांतील श्रीसीतालक्ष्मण हनुमत्समेत विराजमान श्रीरामचंद्रापुढें लिहलेले ग्रंथ— योगवाशिष्ठादि वे०; रामायण ७ कांडें, भारत, गणेशपुराणादि; स्फुट प्रकरणें ग्रंथकार मोठे व्युत्पन्न, भगवद्भक्त, प्रासादिक वाणीचे श्री एकनाथ दौहित्र श्री माधव त्यांची मुलें, राम, पंडित राम; दुसरे कृष्णपंडित, तिसरी कन्या, (हिचे नातू आबाजीपंत)

**वंशवृक्ष**—ऋग्वेदाश्वलायन आत्रेयगोत्र — विश्वामित्रगोत्र

- विश्वनाथ — (श्रीजनार्दनस्वामीचे शिष्य) श्रीएकनाथ महाराज
  - नागनाथ यांची स्त्री ——— उमा कन्या (विवाहसमयीं श्रीमहाराजांच्या पूजेतली श्रीकृष्णाची मंगलमूर्ती दान केलेली सांप्रत तिमंगुडींत आहे असे कळतें.)
    - सिद्ध
    - माधवस्वामी—रमा (बाई)
      - राम (रामा पंडित)
      - कृष्ण पंडित
        - वासुदेव
      - कन्या (तिमगुडींत नवऱ्याचे घरीं)
        - पुत्र
          - अंबाजी पंडित

(४) **रामा पंडित** अथवा पंडित माधवात्मज. सदरहू त्रिवदुरा ग्रंथरचना तंजावरचे श्री. शरफेंद्र महाराजांच्या कालाचे (१६३८–१६५०) यांच्या पांडित्याबद्दल श्री. वासुदेव पंडित, भागवत ९ स्कंधांत वर्णन करितात कीं—तर्क, व्याकरण, मीमांसा-सांख्यप्रवीण, काव्य–नाटकालंकार वृत्त संगीतनिपुण, वेदांतशास्त्री इत्यादि सद्विद्येनें मंडित पंडित असें यांचे मुख्य ग्रंथ—रामामृततरंग, मदालसोपाख्यान, हरिवंश, भागवत स्कंध १ व १० वर टीका, श्रुतिगीता स्तोत्रें धर्म इत्यादि.

(५) **वासुदेव पंडित**—रामा पंडितांचे भाऊ जे उत्तम उपन्यासकर्ते कृष्ण पंडित यांचे पुत्र. भागवत ९ स्कंध टीकाकार. श्री. तुळजेंद्र महाराजाचे कालीन (शके १६८७–१७०९).

(६) **अंबाजी पंडित**—श्रीमाधवस्वामी यांचे · चे नातू, म्हणजे श्रीमाधवस्वामी यांचे देहिमाचे पुत्र. अंबिका कुलदेवता म्हणून अंबाजी असें नांव. या कवींनी आपल्या वंशाची वरील माहिती आपल्या भागवत अष्टमस्कंधांत दिली आहे. हे दुसरे शरफोजी महाराजांच्या कालांत होते (शके १७२२-१७५४). यांचे वडील श्रीराघवदास यांनीं केलेली श्रीसमर्थांवरची आरती वगैरे आहे. यांत खुबी अशी आहे कीं तंजावरच्या सर्वच राजांच्या वेळेस परंपरा पंडित व ग्रंथकार होते हे विशेष आहे.

( ७ ) विठ्ठल—या कवीबद्दलची माहिती विशेष दिसत नाही. याचा मोठा ग्रंथ म्हणजे भक्तविलास अथवा शिवभक्त महात्म्य. हा ग्रंथ शके १७०९ सालं श्री. प्रतापसिंहपुत्र श्रीशरभोजी राजाच्या केलेस आज्ञेने लिहिला असे ते म्हणतात. पंचनदमहात्म्यादि ग्रंथही केले आहेत.

( ८ ) रुक्मांगदाधर—हे मेदिनीकर वंशाचे. श्रीनृसिंह पुराणादि ग्रंथ, भारत, हरिवंशशेष धर्मटीका व कृष्णामृत या ग्रंथाचे लेखक.

( ९ ) श्रीमुकुंदस्वामी—श्रीरामदासी श्रीभिकाजी महाराजाचे शिष्य श्रीगोविंद बाळस्वामी मठाधिपती, तंजावर, याचे हे पुतणे होत हे ऋग्वेदी, आश्वालयनसूत्र, मुद्गल गोत्र, नरसिंहपूरकर आडनावाचे श्रीमुकुंदस्वामींचा मठ करुतट्टागुडीत आहे. हे या याद्यांच्या लेखकाचे पूर्वज याचा मोठा ग्रंथ म्हणजे श्रीरामकृपाविलास ( सप्तकांड रामायण कथा ), ओव्या थोड्या आवलचक आहेत, रचना प्रासानुप्रासाद्यालंकृत आहे. देवभक्तानुवाद हा दुसरा ग्रंथ; पदें इत्यादि अनेक आहेतच.

( १० ) आता तंजावरचे राजेही कविता करणारे होते. त्यात श्रीशहाजी राजे व प्रताप-सिंह मुख्यत्वें नाटककार होत. श्रीप्रतापसिंहाची नाटकें प्रबोधचंद्रोदय, पार्वतीकल्याण, मित्रविंदा-परिणय इत्यादि संस्कृत रूपकाचे नियमबद्ध नसले तरी मराठी भाषेच्या प्रकारांतराची यात माहिती मिळते. याप्रमाणे मराठी यादीच्या १—२ भागातील माहिती दिली आहे.

( ११ ) कविवर्य श्रीरघुनाथ पंडिताबद्दल वाचकाचे लक्ष विशेष असले पाहिजे. विविध-ज्ञानविस्तार मासिकात लेख पाठविणारे माझे मित्र श्री. अ. का प्रियोळकर बी. ए. मुंबई, हे ह्या कवीचे मोठे अभिमानी असून फार अन्वेषणकार्यधुरंधर आहेत. बहुत श्रमानें रघुनाथ पंडिताचें प्रसिद्ध काव्य जे "नळदमयंती स्वयंवर" त्याच्या ठिकठिकाणातील हस्तलिखित प्रति गोळा करून रंगीत सुंदर चित्राक्षह तयार केलेल्या छापील पुस्तकात सप्रमाण प्रतिपादन करितात की, हे रघुनाथ पंडित दक्षिणेचे श्रीछत्रपती शिवाजी महाराजाच्या अष्टप्रधानातील एक होते. दमयंती-स्वयंवराची योग्यता संस्कृत महाकाव्य लक्षणानीं युक्त मराठींत निरुपम काव्याची आहे. इत्यादि या त्याच्या ( श्री. प्रियोळकराच्या ) विधानाला ठाम सिद्धांत म्हणत नाहींत पण तद्विरुद्ध प्रतिपादनयुक्त असेल तर त्याचाहि विचार करता येईल असे ते म्हणतात. मराठी भाषेचा अभिमान बाळगणारे सर्व आपले लक्ष या महाकाव्याकेड दिल्यावाचून राहू नये. औषधचिकित्सा कामशास्त्र वगैरे किरकोळ विषयावर लेख आहेत.हे काव्याच्या धर्तीचे नसले तरी मराठींत आहेत म्हणून नामनिर्देशाने त्याचा उल्लेख केला आहे.

आता विचारहि म्हणजे मराठी यादीचा भाग तिसरा. हा संग्रहही जबरदस्तच आहे, हा शुद्धलिखित वह्याचा आहे. अनेक पदे अभंग याचे येथे स्फुट किंवा प्रकरणात्मक आहेत. यात वाचकानीं अवश्य अवलोकन करावी. ती वही ठोकळ क्रमांक २१२२ ( जुना वर्ग क्रमांक ) इच्यात श्री. छत्रपति महाराजाचे गुण, मराठ्यांची घराणी गडाची नावें, मोंगलराजे, रजपुत-घराणी, अश्वजातींची नावे इत्यादि १५० वर विषय आहेत या लेखात माहिती दाखल दिलेली जुनी बखर व इतरही आहेत.

वरील संग्रहाबाहेर पुष्कळ काव्यस्फूर्तीचे लेखक श्री. भाऊस्वामी गोस्वामी इत्यादि पौरा-णिक चरित्रकार, उटके गोविंदा, गंगारामादि सवाई मौजेतर्फे लावण्या ग्रथणार सांगण्यात आनंद वाटतो. स्फुट लहान काव्ये, पदें, लावण्या रचणार स्त्रीवर्गही बराच आहे. हे अद्यापि गुप्तप्राय आहे त्यांची संमति घेणेस अवधि नसल्याने नावे दिली नाहींत,

हुसेनांबरः-आमच्या वाचकाच्या नीट लक्षात येण्यासाठीं या लेखाच्या पहिल्यानेच मधुरेचे श्री. मीनाक्षी देवालयाचे पत्र द्राविडी भाषा, मोडी लिपींत, एक, व दुसरे रामनाथपूरच्या राजाचे दान शासन मराठीमिश्र तामिळ भाषा, मोडी लिपींत एक, लेखक अनुक्रमे तामिळ ब्राह्मण व शूद्र, अशा दोन पत्राचा दाखला दिला. आता दुसरी एक विचित्र आणि कौतुकहि गोष्ट म्हणजे हुसेनाबर व त्याचा ग्रथ मला आवश्य वाटून त्याबद्दलची माहिती त्याच्या ग्रथात वर्णन केल्याप्रमाणे उद्धृत करून येथे दिली आहे जीर्ण पुरातन प्रतींतूनः—

XXश्री गणेश शारदा सदगुरुनमन XX तया सच्चिदानद
श्री गुरुते ॥ साष्टाग नमस्कार ॥ ५ ॥
श्लोक—याकुतावर खानोऽभूद्बराबर खानतः ।
तत्पुत्रोऽस्ति जगद्वद्यो हुसेनाबर खानराट् ॥ ४ ।। XX
ओवी—वदानाच्या शिरोमाणि । ब्रह्मज्ञानी याचा मुकुटमणि ।
म्हणोनि हुसेनाबर खानजनी । प्रसिद्ध असे ॥ ७ ॥ XXX
तेणे हे भगवद्गीतेची टीका । करिजे ब्रह्मबोध
होवयानिका । उपकारार्थ सर्व लोक । नावे
अबर हुसेनी ॥ १० ॥

अच्युताश्रम निवृत्ति नार्थादिकानि गीतेची प्रतिश्लोकी एक एक ओवी केल्याने XX श्लोकार्थ सपूर्ण नसे ॥ ११ ॥ म्हणून शकराचार्यांचे भाष्य व श्रीधरस्वामींचे व्याख्यान पाहून नतर अबर खानानीं श्लोकार्थानुसार हीं महाराष्ट्रीय भाषेत टीका केली आहे वाक्यार्थ विचारून तात्पर्य येथे लिहिलें आहे ॥ ओ. ११-१४ ॥ XXX लिहिले असे नारायणे ॥

॥ शके ( १५७५ ) पघराशे पचाहत्तरि । विजयनाम संवत्सरीं । आश्विन शुद्ध दशमीं सोमवारीं । अबर हुसेनी टीका सपूर्ण जाली ॥ ८६ ॥ इति ॥

श्रीशके १५७६ जयनाम सवत्सर, दक्षिणायण शरदतौ आश्विन शुद्ध तृतीया सोमवारी चजीमध्ये लिहिले बाळाजी त्रिमलेन ॥ श्लोक ७०० ओव्या ८१६

" देह त्यागिता किर्ति मागे उरावी " हे ध्येय सफल होण्याला, व आमची धर्मनिष्ठा, धर्माचरण वाढून स्वार्थत्यागपूर्वक कामचरणाचा मार्ग दाखवून सुखाचा लाभ करून देण्याला श्रीगीतादि ग्रंथच समर्थ आहेत. तरी त्याचे श्रवण पठण मनन इत्यादि अवश्यमेव केले पाहिजे हे कठरवाने सागून ग्रंथही निर्माण केले. हीच आमच्या महाराष्ट्रीय महात्म्याचीं " भारतीय सेवा "

तजावर सरस्वती महालातील मोडी सग्रह कलेक्टर वगैरे आफिसातील लेख इतरत्र घरोघरीं, दडून राहिलेले ग्रथादि सर्व मराठी भाषेचे आहेत तेव्हा एका अर्थानें तेही सारस्वतात दाखल होऊ शकतील. अन्वेषणाई आहेत हे टिपून ठेवले पाहिजे या लेखकाच्या, सस्कृत पडित रत्न श्रीसुब्रह्मण्य शास्त्री याच्या पूर्ण सहाय्याने परमपूज्य लोकमान्यानीं आपल्या गीतारहस्याचे तामिळ भाषातर करविले श्रीसरस्वती महालाचे अधिकारीवर्गानी या हातून पूर्वोक्त मराठी ग्रथाची बायजवार यादी तयार करविली. आता याच हातून त्या यादींचे स्वरूप यथाशक्ती वर्णन करविण्याची सधि मराठी एज्युकेशन फड, मद्रास या सस्थेनें आणिली. या सर्वांस माझे कृतज्ञतापूर्वक नम्रतेचें वदन आहे न्यूनाधिक्य क्षतव्य आहे सर्व महाराष्ट्र, उत्तरोत्तर " आनदवन भुवन " होऊन सर्व महाराष्ट्रीयाचा सर्वत्र जयजयकार असो.

शान्तिः पुष्टि तुष्टिश्चास्तु

# महाराष्ट्र धर्म

[ ले: श्री. एन. केदारीराव, एम. ए. एल. टी , असिस्टंट प्रोफेसर प्रेसिडेन्सी कॉलेज, मद्रास.]

प्रत्येक सुबल राष्ट्र परिस्थित्यनुसार कोणाच्या तरी ध्येयाप्रमाणें वागून तेंच ध्येय समजू लागतें. उदाहरणार्थ प्राचीन ग्रीसमध्यें स्वातत्र्य, रोममध्ये कायदा व सुव्यवस्था, ग्रेटब्रिटनमध्यें व्यापारांत किर्ती ही त्याला विशिष्ट जनतेंत ध्येयें होतीं. अशा रीतीने पाहूं गेल्यास मराठ्याचें ध्येय काय होतें याचा आपण विचार करूं

या प्रश्नाचें उत्तर खरोखर श्रीशिवछत्रपतींनींच दिलें आहे. देश व धर्म यांची सेवा हेंच त्याचें व्रत होतें रणक्षेत्रावर काय किंवा शाततेच्या काळांत इतर कारभार करण्याचें प्रसंगी त्यांची अलोट बुद्धिमत्ता, चातुर्य व ध्येयवादीपणा दिसून येतो. या त्याच्या गुणाचें बरेचसें श्रेय त्याचे गुरु श्रीसमर्थ रामदास स्वामी यानाच आहे. श्रीशैलपर्वतावर घडलेली हकीकत वाचून कोणाचें हृदय उचबळून येणार नाहीं! शत्रू आपला पाठलाग करीत आहे हें महाराजांना माहीत होते त्याच्या कचाट्यांतून सुटण्यांत यश आलें तरी मनाला फार त्रास होई राजे म्हणून त्या धामधुमीच्या काळात शेजारीं स्वस्थ बसून देणार नव्हते व परमार्थासाठीं काहींही करण्यास फुरसद नव्हती म्हणून श्रीशैलपर्वतावरील देवळात आत्मबलिदान देण्याचें ठरवून त्यांनीं तलवार म्यानातून बाहेर काढली, इतक्यात श्रीभवानी देवीनें त्यास आपल्या निश्चयापासून परावृत्त केलें अशी दंतकथा आहे.

किंवा राज्यकारभाराच्या त्रासास कटाळून त्यानीं गुरू रामदासास राज्य अर्पण केलें ही दतकथा घ्या. रामदासस्वामींना आपल्या शिष्याच्या चमत्कारिक वर्तनाचें फार आश्चर्य वाटलें. आपल्या मधुर उपदेशानें त्यानीं शिवाजीचे मन वळविलें. ते म्हणाले “ शिवबा, तू क्षत्रिय आहेस, दुर्जनापासून दुबळ्याचें संरक्षण करणें तुझा धर्म आहे. कांहीं झालें तरी, स्वधर्म सोडता कामा नये मोक्षसाधनाचे इतर मार्ग तुला सोपें वाटत असतील, पण आपले कर्तव्यकर्म करीत राहणें हाच मोक्षप्राप्तीचा खरा मार्ग आहे. ते कदाचित दिसावयाला अवघड असेल, पण निराश होऊं नकोस. निराशा व मृत्यू समोर आला तरी आपण आपला धर्म सोडूं नकोस ”

हा प्रसंग शिवाजीच्या आयुष्यात आणीबाणीचा होता पण श्रीकृष्णानें अर्जुनाच्या मनातील शंकाकुशंकांचे गीतामृताने जसें निराकरण केलें, तसेंच श्रीसमर्थांनीं शिवाजी महाराजांच्या शकांचें निरसन करून त्यांस आपला राजधर्म पूर्ववत् पाळण्यास सांगितले.

असें झालें तरी एकदां दिलेलें दान शिवाजीस परत घेतां येईना. म्हणून राजानें स्वामींच्या नांवानें राज्य कारभार चालविण्यास अनुज्ञा दिली. अशा रीतीनें पुष्कळ हिंदु राजे प्रचंड शक्तीपुढें आपले लघुत्व कबूल करतात. सध्यासुद्धां पदुकोट्याचे महाराज स्वतःला श्री बृहदम्बेचे दास म्हणवतात व त्रावणकोरचे महाराज आपले राज्य आपले कुलदैवत जे श्रीपद्मनाभ त्याचे दास म्हणूनच चालवितात. देवाचे प्रतिनिधी या नात्यानेंच राजे आपले काम करीत असतात.

शिवाजी स्वतः निस्सीम देवभक्त होता इतर कामांतून फुरसद काढून एकादे भजन चालू असेल तर त्या भजनी मंडळींत तो मिसळे. संत तुकारामाचीं भजनें ऐकून लोकांचीं मनें भक्तीनें उचंबळून जात, व हीं भजनें ऐकण्यास तो कधीं कधीं जात असे. हे त्याच्या शत्रूंना कळले तेव्हां त्यांनीं शिवाजीला अशा एका प्रसंगीं पकडण्याचा घाट घातला पण ईश्वराची लीला अगाध आहे व त्यानेंच आपल्या भक्तास वाचविलें. शत्रूच्या शिपायांनीं दुसऱ्या कोणास शिवाजी समजून त्याचा पाठलाग केला व खरा शिवाजी तर एका बाजूसच राहिला परमेश्वर आपल्या भक्ताचें संरक्षण करतो याचा हा एक पुरावाच आहे. कारण गीतेंत म्हटलेच आहे कीं,

> अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ॥
> तेषां नित्याभियुक्ताना योगक्षेमं वहाम्यहम् ॥

शिवाजी महाराजाच्या पाठीमागून आलेल्या मराठ्यांत त्याच्याइतके चातुर्य व ध्येयवाद नव्हता, पण बीजारोपण चांगले झाल्यामुळें वृक्ष वाढून त्यास फळें आलीं. पहिले तिन्ही पेशवे नामांकित मुत्सद्दी व सेनापती होते. त्यानीं साम्राज्याची वाढ केली, इतकेंच नव्हे तर जिंकलेला भाग अधिक भरभराटीस आणला नाना फडणवीस आपल्या मुत्सद्दीपणाबद्दल प्रसिद्ध होता वास्तविक रीतीनें पाहिले असतां पेशव्यांना राजाची सत्ता होती, पण ते साधेपणानें राहात व आपल्या उदाहरणानें आपल्या अनुयायांत असामान्य धैर्य उत्पन्न करीत. लढाईत ते शूर होते, राजकारणाच्या वाटाघाटी करण्यात ते कोणालाहि हार जाणारे नव्हते. धाडस अंगिकारून नवे नवे मुलूख जिंकण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. शांततेच्या काळांत मुलुखांत सुराज्य चालवून साहित्य व कला यांना ते उत्तेजन देत. हा काल विचारस्वातंत्र्याचा असल्यामुळें कवि व तत्त्ववेत्ते, चित्रकार व मूर्तिकार, गवई व कीर्तनकार या सर्वांची यावेळीं भरभराट झाली. साधारण जनतेचीहि स्थिति चांगली होती; कर जाचक नव्हते व जनतेला आपले उद्योगधंदे शांततेनें चालवतां येत होते. रामदास व तुकाराम याशिवाय नामदेव, एकनाथ व मोरोपंत यांच्या कविता अभंग वगैरे सर्वांच्या तोंडीं असून लोकांत स्वातंत्र्याचें वारे खेळत असे.

स्त्रियांना दिलेलें स्वातंत्र्य हें एक महाराष्ट्राचें वैशिष्ट्य होतें. संगीत व कला सोडून दिली तरी हिंदी राजकारणांत सुद्धां स्त्रिया भाग घेत. राजाराममहाराजांची

पत्नी ताराबाई, अहल्याबाई होळकर व झांशीची शूर राणी लक्ष्मीबाई यांचीं नांवे सर्वत्र महशूर आहेतच. सोनाई व भोजाई या मोठ्या देवभक्त होत्या व त्यांचीं नांवेंही प्रसिद्ध आहेत या ग्रंथातील चरित्रावरून असें दिसून येईल कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील मराठ्यानींहि आपली परपरा सोडली नाहीं, व कालमानाप्रमाणें तेही महाराष्ट्रधर्म पाळण्याचा प्रयत्न करीत आहेत. सर माधवराव व दि. ब. रघुनाथराव यांच्यासारखे थोर मुत्सद्दी या समाजांत उत्पन्न झाले, कांहींनीं शिक्षणकार्य व विद्वत्ता यात नांव मिळविले; संगीतज्ञही दक्षिणेत झाले आहेत. सामाजिक सेवे-सारखें पवित्र कार्य मराठा एज्युकेशन फडासारख्या संस्था तत्परतेनें करीत आहेत. भक्तिमार्गही इकडील कीर्तनकारानी चालू ठेवला आहे. जोपर्यंत इकडील मराठ्यांनीं देशहिताकरितां सेवास्वार्थत्यागाचें व्रत पुढें चालवून आपली तेजस्वी प्राचीन संस्कृति अबाधित ठेवण्याचे प्रयत्न सोडले नाहींत, तोपर्यंत त्यांची भावी स्थिति पूर्व वैभवास साजे-शीच राहील याबद्दल कोणीहि शका बाळगण्याचें कारण नाहीं.

मराठ्यांमध्यें एकीचा अभाव हा मोठा दुर्गुण आहे हें निःपक्षपाती इतिहास-कारांस चटकन् दिसून येते. याच कारणामुळें आपल्या साम्राज्याचा नाश झाला. इतकें झालें तरी आपण अद्यापि कांहींच बोध घेतला नाहीं असें दिसते. जर सर्वांच्या कल्याणाकरता आपण आपले खाजगी भेदभाव विसरून जाऊन सहकार्याचा धडा घेतला व एकजूटीनें वागूं लागलों तर आपणास आपल्या भविष्यकालाबद्दल बिलकूल भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

सारांश इतकाच कीं, आपला देश व संस्कृति यांच्या विपन्नावस्थेंत तरी आपण एकजुटीने वागू या; कारण अशानेंच सध्यांच्या स्पर्धाक्षेत्रात व तीव्रतर जीवन-कलहांत आपण जगूं शकूं.

सह ना अवतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सहवीर्यं करवावहै ॥
तेजस्विनावधीतमस्तु ॥